**अनुभवामृत**

**प्रकाशक**
श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ
मु.पो. परंडा, जि. उस्मानाबाद – ४१३ ५०२.



**प्रकाशन दिनांक :**
५ एप्रिल २०१३

**मुद्रक व टाईपसेंटिंग**
प्रतिमा ऑफसेट
अजित ठोंबरे
देवगिरी इस्टेट, कोथरूड, पुणे.

किंमत : रुपये २००/–



*ब्रह्मलीन परमहंस परिव्राजकाचार्य श्रीसद्गुरूपरमपूज्य*
*श्री प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज*
*आणि*
*परमप्रिय रामभैय्यास्वरूप प.पू. स्वामी तेजोमयानंदजी*
*यांच्या चरण कमली सादर सप्रेम समर्पण...*

चरणरज- कमाताई (कमलताई वैद्य)

*तेरा तुझको अर्पण*
*गुरुद्वादशी, रविवार ११/११/२०१२*

*गुरुद्वादशी*



ॐ

# अभिनंदन

'सत्संगति दुर्लभ संसारा' या अभिनव आत्मकथनपर अशा ग्रंथानंतर वयाची ८५ वर्षे ओलांडल्यानंतरही सादर होणारे 'अनुभवामृत' हे खरोखरच सकृत्दर्शनी पाहता 'अमृतानुभव' आहे असे म्हणणे योग्य ठरणार आहे. जीवनाच्या एक विशिष्ट टप्प्यानंतर हे अशा स्वरूपाचे कार्य खरोखरीच नव्या पिढीसाठी आणि वाचकांसाठी अमृताचा अनुभव आहे असे म्हणणेच योग्य होईल.

मागील पुस्तकात राहून गेलेले म्हणून 'अनुभव' असे जरी स्पष्टीकरण डॉ. कमलताईंनी केलेले असले तरी या सर्व अनुभवाच्या सिंचनाशिवाय त्याचे आत्मकथन पूर्ण होऊ शकलेच नसते. कदाचित् हे सारे साधण्यासाठीच लेखनशारदेने त्यांच्या मागील कथनात तो अपुरेपणा ठेवला असावा. पूर्ण विकसित फुलाचा आस्वाद हा अर्धवट फुललेल्या फुलापेक्षा अधिक प्रसन्नदायी, विलोभनीय व आनंद प्रदान करणारा असतो, तसेच प्रस्तुतचे लेखन आहे असे मला मनोमन वाटते.

श्री. कमल निलंगेकर, दांडेकर मंडळी, श्री. नातूशेट, श्री. स. ल. परांजपे, डॉ. सौ. ऊर्मिला जामदार, पटवर्धन, श्री. द. स. हर्षे, इत्यादी कितीतरी असंख्य मंडळी संपर्कात आल्यानंतर त्यांच्या छोट्या छोट्या गोष्टी, प्रसंग आणि घटनांना लेखिकेने आपल्या उदार व उदात्त स्वाभाविक वृत्तीतून शब्दांच्या मखरात बसविले आणि त्यांचे महत्त्व लीलया वृद्धिंगत केले. खऱ्या आध्यात्मिक साधकाचे हे फार महत्त्वाचे लक्षण डॉ. कमलताईंच्या लिखाणातून वारंवार प्रत्ययाला येते. कुठेही स्वतःची मिरासदारी नाही.

परंतु दुसऱ्यांचे भलेपण, मोठेपण अत्यंत समयोचित शब्दात साकारून सारस्वत वैभव वाचकांसाठी मुक्तपणे उधळले आहे.

केवळ संपर्कातील मंडळींच्या स्निग्ध साहचर्याची अनुभूती यात संकलित केलेली नसून प्रसंगोपात्त सुचलेल्या विविध काव्यसुमनांची अंजली देखील डॉ. कमलताईंनी अत्यंत भावुकपणे अर्पण केली आहे. त्यांच्या ठायी वसणाऱ्या शारदेच्या विविध प्रतिमा, प्रतीकांचा आस्वाद घेताना मन अत्यंत पुलकित होते. मूळच्याच भावुक स्वभावाला तितक्या नाजूक शब्दप्रपंचाने त्यांनी आभूषित केले आहे. त्यामुळेच हे सर्व वाचन करताना 'सत्संगति दुर्लभ संसारा'चे 'गोमटे रूप शब्द साजिरे' असे करून डॉ. कमलताईंनी आपल्या आत्मिक समाधानाची जशी उच्च पातळी गाठली त्याचप्रमाणे वाचक, भक्त आणि साधक यांना या गोमट्या रूपातून उज्ज्वलतेचे, दिव्यत्वाचे दर्शन घडविले आहे. डॉ. कमलताईंच्या या अपूर्व योगदानाबद्दल मन:पूर्वक धन्यवाद!

धर्मश्री, पुणे
वसन्तोत्सव
दि. २७/३/२०१३

**श्रीज्ञानेश्वरपदाश्रित**
स्वामी गोविंददेवगिरि

* * *

# अनुभवामृताची गोडी

डॉ. कमलताई वैद्य यांनी आत्तापर्यंत केलेली ग्रंथनिर्मिती पाहाता तिचं स्वरूप 'अफाट' याच एका विशेषणाने सांगता येईल. प.प.प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे चरित्र, श्रीतुलसीदासांचे चरित्र, प.प.प्रज्ञानानंद स्वामींचे पद्यबद्ध चरित्र, स्वामी चिन्मयानंदांचे पद्यबद्ध चरित्र, दासबोधाचा गद्यानुवाद, वाल्मिकी रामायणाचा मराठीतील अनुवाद, श्री. मधुसूदन सरस्वतींच्या भक्तिरसायन या ग्रंथाचा मराठी अनुवाद, प.प. प्रज्ञानानंद स्वामींच्या रामचरित मानस गूढार्थचंद्रिका या आठ हजार पृष्ठांच्या टीकेच्या सातशे पानी प्रचंड प्रस्तावनेचा हिंदी अनुवाद, अलिकडेच प्रसिद्ध झालेले 'सत्संगीत दुर्लभ संसारा' हे आगळ्या वेगळ्या प्रकाराचे आत्मकथनपर पुस्तक इ. लेखनविस्तार हा वरील विधानाचा सज्जड पुरावा आहे. प्रस्तुतच्या 'अनुभवामृत'या पुस्तकाने वरील वाङ्मयविस्तारात भरच पडली आहे. लेखन हा कमाताईंचा नित्याचा परिपाठ झाला आहे. 'दिसामाजि काहीतरी ते लिहावे', हा समर्थांचा उपदेश आज ८६व्या वर्षीही त्या व्रतस्थपणे आचरणात आणत आहेत. एवढी चिकाटी या वयात दुर्लभच आहे.

प्रस्तुतचा ग्रंथ हा उपरोक्त 'सत्संगति दुर्लभः' या ग्रंथातूनच स्फुरलेला त्याचा पुढील भाग आहे. 'सत्संगति दुर्लभः' या ग्रंथात त्यांनी संपर्कात आलेल्या अनेक व्यक्तींचे कृतज्ञतापूर्वक स्मरण केले आहे. तो प्रकाशित झाल्यानंतर कमाताईंच्या लक्षात आले की, अजून कितीतरी व्यक्तींबद्दल लिहायचे राहून गेलेले आहे. त्यांच्या मनाला त्याबद्दल चुटपूट लागून राहिली. त्यातून या ग्रंथाची निर्मिती झाली. त्यात त्यांनी चुकून राहून गेलेल्या त्या व्यक्तींच्या कृतज्ञतापूर्वक स्मरणाने त्या ग्रंथाचा अनुशेष भरून काढला आहे. त्यातही पूर्वोक्त ग्रंथाप्रमाणे नातेसंबंधातील व्यक्ती, गुरुपरिवारातील व्यक्ती आणि प्रसंगपरत्वे संपर्कात आलेल्या इतर अनेक व्यक्ती असे तीन विभाग केले आहेत. या ग्रंथाच्या दुसऱ्या विभागात कमाताईंनी आपल्या आध्यात्मिक जीवनातील गूढ अनुभव व्यक्त केले

आहेत. त्याचबरोबर प्रज्ञानानंद स्वामींच्या शिष्यपरिवारातील अनेक व्यक्तींचे पारमार्थिक अनुभवही त्यांनी त्यात समाविष्ट केले आहेत. परंड्याचे हंसराज स्वामी म्हणत असत 'एकट खाणे मज न रुचे' त्याचप्रमाणे कमाताईंना आपल्या एकटीचे अनुभव सांगणे अपराधीपणाचे वाटले असावे, म्हणून त्यांनी आपल्या गुरुबांधवांनाही या अनुभवकथनात समाविष्ट करून घेतले आहे. हा अनुभव कथनाचा भाग माझ्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा आहे. सर्वसाधारणपणे आपले परमार्थातील अनुभव सद्गुरूंखेरीज इतरांना सांगू नयेत असा संकेत आहे. कमाताईंना तो माहीत नव्हता असे नाही. पण त्यांनी यावर साधक बाधक विचार करूनच हे अनुभव सांगण्याचा निर्णय घेतला. असे अनुभव इतर साधकांना मार्गदर्शक ठरतात. बऱ्याच वेळा साधकांना आपल्या साधनेच्या काळात या प्रकारचे अनुभव येत असतात. पण ते कुठे सांगायचे नसल्याने त्यांची कुचंबणा होते. सद्गुरूंपुढे सांगावेत, तर सद्गुरू जवळ नसतात. तेव्हा पुढे काय करायचे असा त्यांना संभ्रम पडतो. या ग्रंथातील अनुभव-कथनाने त्यांना मार्गदर्शन मिळू शकते. कमाताईंच्या या निर्णयाबद्दल त्यांचे अभिनंदन करावेसे वाटते. संगीतातील अधिकारी लोक स्वत:ची गुरूप्राप्त विद्या इतरांना देण्यास तयार नसतात. त्यामुळे संगीतातील अनेक उत्तमोत्तम चिजा, त्यातील अनेक बारकावे त्यांच्याबरोबरच लयाला जातात. अध्यात्मातील व्यक्तींनीही आपले अनुभव स्वत:पुरते राखून ठेवू नयेत. त्यात इतरांनाही सहभागी करावे असे वाटते. म्हणूनच समर्थ रामदास स्वामी म्हणतात,

*''आपण येथेच्छ जेवणें । उरलें ते अन्न वाटणें ।*
*परंतु वाया दवडणें । हा धर्म नव्हे ।।*
*तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तें चि ज्ञान जनास सांगावें ।*
*तरतेन बुडों नेदावें । बुडतयासी ।।'' (दासबोध १२.१०.१-२)*

रामकृष्ण परमहंसांनी नरेन्द्राने 'तुम्ही देव पाहिला आहेत का?' असा प्रश्न विचारल्यानंतर त्याला 'हो मी देव पाहिला आहे. मी तो तुला दाखवू शकतो' असे स्पष्ट सांगितले. त्यांनी आपला अनुभव सांगितला नसता तर नास्तिकतेकडे झुकलेल्या नरेन्द्राचा विवेकानन्द झाला नसता. अधिकारी व्यक्तीने आपले अनुभव सांगून इतर जिज्ञासूंना मार्गदर्शन केलेचे पाहिजे.

तेव्हा कमाताईंनी घेतलेला अनुभव–कथनाचा हा निर्णय अतिशय योग्यच आहे, असे म्हणावेसे वाटते. या अनुभवकथनाचेही तीन भाग आहेत. पहिल्या भागात कमाताईंच्या ध्यानसाधनेतील अनुभवांचा समावेश आहे. दुसऱ्या भागात, सत्पुरुष, तीर्थक्षेत्रे, देवतांची मंदिरे यांचे दर्शन होताच कमाताईंना गहिवर येतो, त्यातून काही साक्षात्कार होतात. या प्रकारचे त्यांचे अनुभव आहेत. आणि तिसऱ्या भागात इतर गुरूबांधवांचे अनुभव संग्रहित केले आहेत.

या ग्रंथाचा तिसरा भाग काव्यरचनेचा आहे. सतत लेखन चालू असल्याने काव्यरचनेचाही छंद कमाताईंनी जोपासला आहे. अनेक प्रकारचे काव्य त्यांना स्फुरले आहे. ते सर्व काव्य या भागात समाविष्ट झालेले आहे. ते विविध प्रकारचे असले तरी त्यातून भक्तिरसाचे एकच सूत्र आढळते. भवभूती म्हणत असे, 'एको रसः करुण एव' कमाताईंच्या या सगळ्या कवितांमध्ये 'एको रसो भक्ति–देव!' हाच अनुभव येतो. अखंड भक्तिपरता हा त्यांचा स्वभावधर्म आहे. त्या भक्तीच्या विविध छटा, त्यांचे भिन्न भिन्न आविष्कार या विभागात अभिव्यक्त झालेले आपल्याला दिसतील.

या तीनही विभागात कमाताईंनी या ना त्या प्रकारचे अनुभवकथनच केलेले आहे. म्हणून 'अनुभवामृत' हेच नाव या लेखनाला शोभते. या सर्व अनुभवकथनातून 'सत्संगति दुर्लभ...' या ग्रंथातल्याप्रमाणेच कमाताईंच्या कृतज्ञता बुद्धी, आपल्या संपर्कातील सर्व व्यक्तींबद्दलची आपुलकी आणि जिव्हाळा, प्रामाणिकता, सर्वांबद्दल प्रेमभाव, परनिंदापराङ्मुखता, विनम्रभाव इ. गुणांचा प्रत्यय येतो. कमाताईंनी असेच लिहित राहावे. त्यासाठी परमेश्वर त्यांना दीर्घ आयुरारोग्य देवो, त्यांनी आपल्या अनुभवांचा मेवा सर्वांना भरभरून वाटावा हीच परमेश्वराच्या चरणी प्रार्थना.

दि. ५/४/२०१३

**कल्याण काळे**
ए–५, प्रज्ञानगड, नवश्या मारुतीगल्ली, वीटभट्टी,
सिंहगड रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष : ०२०–२४२५३१३६

* * *

॥ श्रीसद्गुरु प्रसन्न ॥

॥ राम ॥

# साधकांशी हितगुज

एक भगवंताशिवाय दुसरी वस्तूच नाही. म्हणून मी, तूं किंवा इतर सर्व जे काही चालते ते फक्त व्यावहारिक पातळीवरून चालत असते अशी श्रीसद्गुरुकृपेने दृढ भावना होणे आवश्यक असते. तशी ती झाली तर मग कुठल्याच चांगल्या वा वाईट गोष्टीसंबंधी काहीच वाटत नाही. त्या सर्व गोष्टींचे महत्त्व फक्त व्यावहारिक पातळीवरून असते. पण जसे प्राथमिक वर्णमाला शिकल्याशिवाय भाषेचे ज्ञान होऊ शकत नाही, तसे अंतिम सत्य जाणण्यासाठीही थोडा फार प्रयत्न करावाच लागतो. श्रीसद्गुरुकृपेने या मार्गावरून वाटचाल करतांना काही गोष्टीमुळे मला जो परमानंद लाभला तसा तो इतर साधकांना लाभावा या इच्छेने हे लेखन केले जात आहे.

खूप वेळां सांगितले जाते की जप करावा, मानसपूजा करावी पण बरेच साधक अशी तक्रार करतात की आमचे मन एकाग्र होत नाही, तसेच मानसपूजा कशी करावी किंवा भगवंताशी संवाद कसा साधावा हे ही कळत नाही. त्यावर श्रीसद्गुरू सांगत की देवाशी नाते जोडा म्हणजे प्रेम उत्पन्न होईल. पू. स्वामी रामसुखदासजी सांगत की सतत पाच पाच मिनिटांनी 'हे भगवन् मी फक्त तुझा –तुझी आहे आणि फक्त तूच माझा आहेस' असे म्हणत जा अगदी मोठ्याने म्हणलात तरीही हरकत नाही. विभीषणाला श्रीरामप्रभूनी आश्वासन दिलेले आहे की, ''कुणी एकदांही जर मनापासून 'हे भगवन् मी तुझा आहे' असे म्हणेल त्याला मी सर्व पापातून, संकटातून मुक्त करतो!'' मग आपण जर पाच पाच मिनिटांनी मनापासून असा धोसरा लावला तर ते आपल्याकडे कसे दुर्लक्ष करु शकतील? ''प्रथम असे करू लागलो की आपण दंभ करीत आहोत, नाटक करीत आहोत, असेही वाटू शकते. पण संतांच्या वाक्यावर दृढ विश्वास असेल तर

आपोआप प्रेम उत्पन्न होऊ लागते. आणि रामाला तर फक्त प्रेमच हवे असते.

भगवान् सर्व व्यापक आहेत म्हणजे ते मूर्तीतही असतात. तेव्हा, घरांतील देवाची पूजाही तेथे प्रत्यक्ष ते आहेत अशा भावनेने करावी. श्रीसद्गुरू म्हणत, 'यथा देहे तथा देवे.' पूर्वी अनेक घरांतून देवांच्या मूर्ती उजळतांना चिंच, रांगोळी लावून उजळल्या जात. पण श्रीसद्गुरूंच्याकडून हे ऐकल्या-पासून लिंबू, शिकेकाई, गरम पाणी लावून त्या उजळल्या जातात. कधी हातून मूर्ती पडली तर चटकन हृदयाशी लावून बालकाप्रमाणे मुका घेऊन परत तिला स्नान घालून ती जाग्यावर ठेवावी. तसेच माणसाला नेहमी नाविन्याची आवड असते. त्यांत मन रमते म्हणून मानसपूजेतही नाविन्य आणले तर मन रमते आणि आनंद होतो. उदाहरणार्थ, सोमवारी देवाला पांढरी वस्त्रे, मोत्याचे दागिने, मंगळवारी पोवळ्याच्या रंगाची वस्त्रे पोवळ्याचे दागिने, बुधवारी हिरव्या रंगाची वस्त्रे पाचूचे अलंकार, गुरुवारी मोतिया रंगाची वस्त्रे, पुष्कराजचे दागिने, शुक्रवारी फिकट पिवळी वस्त्रे, हिऱ्यांचे दागिने, शनिवारी निळ्या रंगाची वस्त्रे, नीलमण्याचे अलंकार तर रविवारी गुलाबी वस्त्रे व माणकाचे अलंकार तसेच रोज नवनवीन पक्वान्नांचा नैवेद्य अशा प्रकारे मानसपूजेत नवग्रहांना जी रत्ने प्रिय त्यांचा उपयोग केला तर मन रमते व वेगळाच आनंद मिळतो. हे अनुभवावरून सांगितले जात आहे.

तसे जेव्हा मनांत येईल तेव्हा आपला परम सुहृद म्हणून देवाशी जे वाटेल ते बोलावे. ते इतरांना कळेल अशी भीतीही नसते. एकदा दसऱ्याला मी रामभैय्याला म्हटले की आज दसरा आहे तर माझ्या मस्तकावर हात ठेवून मला आशीर्वाद द्या ना! आणि हे ऐकून लक्ष्मणभैय्या माझ्याकडे पाहून हसू लागले. तेव्हा मला त्यांचा राग आला आणि मी चक्क रामभैय्यांचा उजवा हात पकडून माझ्या डोक्यावर ठेवला आणि लक्ष्मणभैय्याकडे मुद्दाम चिडवण्यासाठी पाहिले तो काय, मी फाजील सलगी केल्याने ते रागावले होते त्यांचा चेहरा लालीलाल झाला होता. पण रामभैय्यांच्या धाकामुळे ते काहीच बोलले नाहीत. पण माझ्या लक्षात माझी चूक आली आणि मी त्यांची मनांतल्या मनात क्षमा मागितली. तेव्हा कुठे स्वारीचा राग

गेला! तर मानसपूजेमध्ये अशा गंमतीही घडतात.

कधी कधी मी कल्पना करते की चित्रकूटला पर्णकुटीच्या शेजारी वडाच्या पारावर रामभैय्या, सीताभाभी बसली आहेत आणि मी खार बनून शेजारी झाडावर खाली वर करते आहे. मध्येच मी त्यांच्या जवळ जाते आणि रामभैय्या मला हाताने काही फळे खाऊं घालत आहेत. द्रोणात पाणी भरून माझ्या पुढे पाणी ठेवत आहेत आणि मी ते लपलप् करून पिऊ लागले की माझ्या पाठीवरून हलकेच हात फिरवीत आहेत. मी तेथे मातीत उठलेल्या पावलांच्या चिन्हांवरून गडबडा लोळत आहे. तर कधी मोर बनून पिसारा फूलवून त्यांच्यापुढे नाचत आहे, कधी हरणाचे पाडस बनून सीतावहिनीच्या पदरास तोंडात धरून तिच्या मागे मागे हिंडत आहे. खरेच असे प्रयोग करून तर पहा; काय परमानंद मिळतो तो!

कृष्ण भक्त असाल तर गोपी बना, अर्जुन वा उद्धव बना आणि पहा! शिवभक्त असाल तर नंदी बना, भुजंग बना, डमरु बना. काहीही बना आणि भगवंताच्या सान्निध्याचा परमानंद लुटा. गणेशभक्त असाल तर तुम्हाला अनुभव येईल की ते त्यांच्या सोंडेने तुम्हांला गोंजारत आहेत. आनंदाचे अनेक पर्याय साधकांपुढे खुले आहेत. मी एकदा प.पू. स्वामी तेजोमयानंदजींना विचारले होते की, ''अशी मनोराज्ये कारणे योग्य आहे का?'' तेव्हा ते म्हणाले होते की, ''व्यावहारिक जगतात रमण्यापेक्षा हे फारच उत्तम आहे. तुम्ही चित्रकूट विहार करा आणि मलाही (पत्राद्वारे) करवा!'' यावरून आपल्याला याचे महत्त्व निश्चितच कळेल!

आपण प्रयत्न केले तरी श्रीसद्गुरुंच्या आणि भगवंताच्या कृपेनेच ते सफल होऊ शकतात याची पूर्ण जाणीव पाहिजे आणि तशी ती व्हावी म्हणून कळवळून प्रार्थना करण्याशिवाय दुसरा इलाज नाही. कारण प्रेमभक्तीशिवाय अंतरंगातील मळ जाऊ शकत नाही. आणि रामभैय्या म्हणतात ज्याचे मन निर्मळ असते त्यालाच माझी प्राप्ती होते. 'सर्वांभूतीं भगवद्भाव' हे अंतिम साध्य आहे हे नेहमी लक्षात ठेवावयास हवे. त्यासाठी प्रथम आपल्या परिवारातील लोकांपासून सुरुवात करायला हवी. अगदी प्रथम मातृदेवो भव, पितृदेवो भव अशी शास्त्राज्ञा आहे. येथपासून सुरुवात करायला हवी. पुंडलिकाच्या या भावनेमुळेच परब्रह्म त्याच्या भेटीला आले.

श्रीसद्गुरूंचा निवास आमच्या घरी होता तेव्हा ते मुलांना रोज आम्हां उभयतांच्या पायावर डोके ठेवून नमस्कार करायला लावत असत. आणि स्त्रियांना त्यांची आज्ञा असे की पतीला परमेश्वर समजून रोज त्यांनी अत्यंत आदराने प्रेमाने त्याच्या पायावर मस्तक ठेवून नमस्कार करावा. आई-वडील, पती यांना कधीही उलट उत्तरे देऊ नयेत. यथाशक्ति सेवा करावी. आज्ञापालन करावे. कुणीही व्यक्ती निर्दोष असूच शकत नाही. विधात्याने सर्व विश्वच गुणदोषमय केले आहे. म्हणून हे लक्षांत घेऊन आणि आपल्यात ही दोष आहेतच हे जाणून प्रत्येक व्यक्तीवर त्याच्या गुणदोषांचा विचार न करतां प्रत्येकाच्या हृदयात भगवंताचा वास आहेच आहे हे जाणून प्रत्येकावर मनापासून प्रेम करण्याचा अंत:करणापासून प्रयत्न साधकाने केलाच पाहिजे. त्या प्रयत्नांना तात्काळ जरी यश आले नाही तरी निराश न होता असा प्रयत्न करावा. आणि प्रत्येकाच्या हृदयात भगवंताचा निवास आहे हे त्रिकालाबाधित सत्य असल्याने कालांतराने का होईना प्रतिसाद मिळतोच मिळतो, असा अनुभव प्रत्येकाला आल्याशिवाय राहाणारच नाही ही मनात खात्री बाळगावी. अधिक काय बरे सांगावे? सहज आठवले म्हणून एक अनुभव सांगावसा वाटतो. एकदा विमलताई जोशी माझ्या विहीणबाई आणि मी भैरवनाथ ट्रॅव्हल्सतर्फे उत्तर भारताच्या यात्रेला निघालो होतो. श्रीसद्गुरुकृपेने रामनामस्मरण सतत व्हावे असा प्रयत्न तर होतच होता. पण एकनाथी भागवताचा प्रभाव म्हणून 'सर्वाभूती भगवद्भाव दृढ व्हावा' असा प्रयत्नही चालू असतो. यात्रेत काशीला मुक्काम झाला. संयोजकानी एक नाव ठरवली आणि श्री काशीविश्वेश्वराचे दर्शन झाल्यावर त्या नावेतून आम्हांला काशीतील सर्व घाटांचे दर्शन घडावे अशी व्यवस्था केली होती. निरनिराळे घाट बघत बघत भजन करीत आम्ही जात होतो. तोच एका ठिकाणी एक बेट होते तिथे नाव थांबविण्यात आली व आम्हांला सांगितले गेले की येथे उतरून तुम्ही पार्थिव शिवपूजन करू शकता. तेव्हा सर्व यात्रेकरू खाली उतरले व तेथे वाळूची शिवलिंगे करून सर्वांनी त्याची पंचोपचार पूजा केली. खरे तर आमच्या जवळ पूजेचे साहित्य नव्हते पण सहप्रवाशांनी साहित्य दिले व आम्हीही वाळूचे लिंग करून पंचोपचार पूजा केली.

नंतर श्रीसद्गुरूंच्या कृपेने मला अशी प्रेरणा झाली की येथे या सहप्रवाशांच्या रूपात साक्षात् शिवपार्वती उपस्थित आहेत तर त्यांची पूजा करून परमानंद प्राप्त करावा. म्हणून मी सर्वांना विनंति केली की जी जोडपी असतील त्यांना एकमेकाशेजारी उभे राहावे व जे एकएकटे आले असतील त्यांना एकमेकापासून जरा दूर उभे राहावे. मला त्या सर्वांचे शिवपार्वती समजून दर्शन घ्यावयाचे आहे. आणि त्याप्रमाणे सर्व सहप्रवासी रांगेत उभे राहिले. मी ओळीने प्रत्येकाच्या चरणाला स्पर्श करून शिवपार्वती भावाने अत्यंत प्रेमाने त्यांचे दर्शन घेण्यास सुरुवात केली आणि याला जो प्रतिसाद मिळाला तो आज जरी आठवला तरी अंत:करण भरून येऊन डोळ्यातून अश्रू गळू लागतात. जशी जशी मी पुढे सरकू लागले तसे तसे सर्वांच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. भगिनींनी मला प्रेमाने मिठ्या मारल्या. त्या सर्वांची अंत:करणे भरून आली होती आणि त्यात आश्चर्य काहीच नाही कारण की सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात स्थित असलेल्या त्या कारण रहित दयाळू भगवंताकडून प्रतिसाद मिळाल्याखेरीज कसा राहील? म्हणूनच एकनाथ महाराज म्हणतात की,

*'भाव तोचि देव । भाव तोचि देव।*
*ये अर्थी संदेह । धरू नये ।।'*

असो. श्री सद्गुरूकृपेने जसे स्फुरले तसे लिहिले गेले आहे. वाचक रूपाने रामभैय्या ही वाङ्मयीन पूजा गोड मानून घेतील अशी खात्री आहे.

**== हरि: ॐ तत्सत् ==**

* * *

# अनुक्रम



* * *

# अनुशेष

॥ श्री सद्गुरु प्रसन्न ॥

॥ राम ॥

## अनुभवामृत

श्री सद्गुरुकृपेने 'सत्संगति दुर्लभ संसारा' हे पुस्तक प.पू. स्वामी गोविंददेवजी गिरी यांच्या शुभहस्ते जयसिंगपूर येथे २६/१२/२०१२ रोजी आणि प.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्या शुभहस्ते 'चिन्मय विभूति' कोळवण येथे दि. ३०/१२/२०१२ रोजी प्रकाशित झाले. खरोखरच रामभैय्याच्या असीम कृपेनेच हे शक्य झाले. डॉ. कल्याण काळे व श्री. सातवळेकर यांची खूपच मदत झाली. शिवाय श्री. अजित ठोंबरे यांनी अगदी थोड्याशा वेळांत व्यवस्थित काम करून दिले. त्यामुळेच हे शक्य झाले. पण पुस्तक पाहिल्यावर असे लक्षात आले की किती तरी आवश्यक मजकूर राहून गेला आहे. शिवाय सौ. रेखाचे म्हणणे असे पडले की मी त्या पुस्तकांत माझ्या अनुभवांसंबंधी काहीच लिहिले नाही. त्यांचे वर्णन वाचले तरी साधकांनाही प्रेरणा मिळेल म्हणून मी 'अनुभवामृत' लिहावे. या सर्व कारणांमुळे परत ज्या उणिवा राहिल्या आहेत त्याही दूर होतील असे वाटून हे लेखन करावयाचे ठरवले आहे. ते करवून घेण्यास श्रीसद्गुरु समर्थ आहेत.

* * *

# अनुशेष १

**यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महार्णवे**

*दोन ओंडक्यांची होते सागरात भेट ।*
*एक लाट तोडी त्यांना पुन्हा नाही भेट ।।*

कुटुंबातील काही व्यक्तींचा उल्लेख राहून गेला आहे. त्यांचा ओझरता तरी उल्लेख आवश्यक आहे असे वाटत असल्याने हा मजकूर लिहिला जात आहे. श्री. तात्यासाहेबांच्या तीन मुलींचा उल्लेख केला गेला आहे. पण सगळ्यात मोठी वत्सला, जी माझ्या लग्नाच्या वेळी होती. पण पुढे लवकरच वारली, तिचा उल्लेख राहिला आहे. तसेच श्री. नमूआत्यांची सगळ्यात मोठी मुलगी विमल ही कुसुमच्या बरोबरीची होती. तिला शिक्षणासाठी मुंबईला आमच्याकडेच ठेवली होती व ती कुसुमबरोबरच कन्याशाळेत शिकत होती. माझ्या लग्नाआधी तिचाही सहवास लाभला होता. असो.

माझी मैत्रीण केळेवाडीत प्रभा गोडबोले नावाची होती. तिच्याकडे मी जेव्हा जाई त्यावेळी त्याच चाळीत माझी मामेबहीण सौ. काशीमाई साठे राहात असे. तिच्याकडे मी आवूर्जन जात असे. कारण तिचे यजमान श्री. अनंतराव साठे नेहमी आमच्याकडे येत असत. तसेच माझी एक मैत्रीण सुशीला दाते उर्फ शशी दाते गोरेगांवकर चाळीत (सेंट्रल सिनेमा जवळ) राहात असे, तिच्याकडे मी जाई तेव्हा सौ. बाळूताई काळे (ती. आप्पासाहेबंची मावस बहीण, नागपूर येथील गोगळे यांची माहेरवाशीण) हिच्याकडेही जात असे. तिचे यजमान प्राध्यापक होते असे वाटते. शशी उर्फ सुशीलाचा विवाह श्री. नाना आपटे यांच्याशी झाला होता. ते संघात जात असत आणि पाच देवळाच्या वाडीत राहात होते. माझा भाऊ बाळ संघात जात असे. त्यामुळे नाना आमच्याकडे येत असे. १९८१ मध्ये चि. रमेशची बदली जी.एम.सी. भायखळा मुंबई येथे झाल्यावर मला कळले की, श्री. विनय आपटे (सुप्रसिद्ध अभिनेता) हा सौ. शशीचा मुलगा आहे. म्हणून पार्ल्याला पत्ता शोधून मी व चि. रमेश गेलो होतो. तेव्हा चि. विनय आपटे भेटला.

पण सौ. शशी त्यावेळी बडोद्याला तिच्या दुसऱ्या मुलाकडे गेली होती असे कळले म्हणून भेटली नाही. नंतर परत योग आला नाही. शाळेतील मैत्रिणींशी सर्वांशीच छान संबंध होते. कमल वाघ व मी एकाच बिल्डींगमध्ये राहात होतो. त्यामुळे अधिक संबंध आला. १९८१ ते १९९३ परत मुंबईत वास्तव्य झाले. तेव्हां कमल तेंडुलकर, माणिक हेंद्रे यांच्याशी फक्त संपर्क होऊ शकला. बाकीचे ओंडके कुठे वहात गेले ते माहीत नाही. एकंदर विचार केला तर असे दिसते की, ज्या नोकरदारांच्या बदल्या होतात त्यांना प्रत्येक गांवी नवी विटी नवे राज्य असे वागावे लागते. एखाद्या गांवी कांही कुटुंबांशी इतका घरोबा होतो पण पुढे त्यांची कधी गांठभेटही होत नाही. त्यातल्या त्यात रक्ताची नाती टिकून राहतात पण त्याहून मला वाटते गुरुसंप्रदायांतील नाती अधिक काळ टिकतात आणि गुरुबंधु-भगिनींच्या विषयी जो जिव्हाळा असतो त्याची इतर व्यावहारिक पातळीवर वागणारांना कल्पनाच येऊ शकत नाही आणि संत महात्मे यांच्याविषयी तर इतकी आत्मीयता आणि ओढ वाटते की शब्दात वर्णन करता येत नाही. त्याबाबत जावे त्यांच्या वंशा तेव्हा कळे, असेच म्हणावे लागते. प्रत्येकाला 'माझिया जातीचे मज भेटो कोणी' असेच वाटत असत नाही कां? एकनाथ महाराज 'पोटातलेनी कळवळे' असे शब्द वापरतात ते काय उगीच?

* * *

## पटवर्धन (पनवेल)

एक आत्या पनवेलला श्री. शंकरराव पटवर्धन यांना दिली होती. ते वकील होते. माझ्या लग्नाच्या आधीच मला वाटते ती आत्या (नागूताई) मेनेंजायटिसने गेली होती. तिला गंगू, इंदू या मुली व विनायक उर्फ बापू आणि श्री. केशव (तात्या) असे दोन मुलगे होते. बापू वडिलांप्रमाणे वकील झाला होता. चि. केशव मॅट्रीक झाल्याबरोबर रिझर्व्ह बँकेत नोकरीला लागला होता. नंतर त्याची बदली हैदराबाद येथे झाली होती व तो तेथेच होता. त्याचा एक मुलगा सी.ए. होऊन हैद्राबादलाच प्रॅक्टीस करत होता. दुसरा कोल्हापूरला होता. त्या भावाची बायको प्रमिलावहिनी ही ह्यांचे मित्र

श्री. तात्या पाटणकर यांची चुलतबहीण होती. पण तिची आई लहानपणींच गेल्याने तिच्या काकूनेच (म्हणजे तात्यांच्या आईने) तिचे पालनपोषण केले. तात्या एकटेच होते पण ते हिंदुस्थान कन्स्ट्रक्शन्स मध्ये नोकरीत असतांना नेहमी लांबच असत. त्यांचे आईवडील पुतण्यांजवळच राहात. सौ. प्रमिलावहिनी गणेशभक्त होती व तिने नंतर पू. अक्का वेलणकर, अंबरनाथ यांचा अनुग्रह घेतला होता. ती काव्यही सुंदर करी. तिचे माझे छान जमे. असो. ती. बापू पटवर्धनची बायको आष्टे येथील लिमये यांची माहेरवाशीण होती. तिची आत्या सातारा येथे श्री. अण्णासाहेब सहस्त्रबुद्धे यांना दिली होती. ती लवकर गेली व ह्यांची आत्या भीमाताई या श्री. आण्णासाहेबांच्या द्वितीय पत्नी. आष्ट्याचे श्री. लिमये त्यांना आपली माहेरवाशीण समजत, असे ऐकिवांत आहे. त्यामुळे आष्ट्याचे लिमये व इस्लामपूरचे वैद्य घराण्याचा घरोबा होता. म्हणूनच की काय मला कमलावहिनी फार आवडत असे. ती. बापूंचा मुलगा विजू हा डॉक्टर झाला आहे. ती. आण्णासाहेब शेवटी आजारी होते तेव्हा तो मुंबईतच मला वाटते इंटर्नशिप करीत होता. ती. आण्णासाहेबांच्या दवाखान्यातील काही सामान त्याला देण्यात आले होते असे ऐकले. आम्ही मुंबईला असता चि. रमेश व मी एकदा पनवेलला ती. बापूकडे गेलो होतो. तेव्हा त्याची मुलगी पनवेलमध्येच दिलेली होती, तिच्याकडेही तो आम्हाला घेऊन गेला होता. तसेच डॉ. विजू त्यावेळी त्याचा तळोजास दवाखाना होता तेथे जाई. तेथेही आम्ही गेलो होतो. तळोजा येथेच ती. बापू भाऊजी (ह्यांचे मावसभाऊ) यांचा मुलगा डॉ. अशोक वैद्य राहात होता. कमलाताई तेथे त्याच्याजवळच होत्या. माझी व त्यांची कै. बापूभाऊजी गेल्यावर गांठ पडली नव्हती म्हणून तेथे त्यांनाही जाऊन भेटलो. याशिवाय पनवेलमध्ये कै. चंद्रशेखर मामा व सौ. शैलजा मामी (दांडेकर) यांचा मुलगा डॉ. अरविंद (सर्जन) यांनाही भेटलो. बरेच वर्षांनी गांठ पडली. त्यामुळे त्यांना व मलाही आनंद झाला. मुंबईला ते दादरला असताना रवीच्या बाळंतपणाचे वेळी मनिष झाला तेव्हा सौ. मामीने मला खूप मदत केली होती. आता आठवले तरी आश्चर्य वाटते की प्रत्येक प्रसंगात रामभैय्यांनी कुणाच्या ना कुणाच्या रूपाने नेहमीच मदत केली आहे. त्याबद्दल 'समर्था तया काय उत्तीर्ण व्हावे। सदा सर्वदा नाम

वाचे वदावे ।।' एवढाच एक पर्याय उरतो नाहीं का? असो. ती. बापूने पुढे लग्नाला बाणेरजवळ ब्लॉक घेतला होता तेव्हा मुद्दाम रिक्षा करून तेथे घेऊन गेला होता. त्यालाही अध्यात्माची आवड होती. माझा गुरुबंधु श्री. श्रीकांत आपटे याची डॉ. विजय पटवर्धन व डॉ. अरविंद दांडेकर दोघांशी चांगली ओळख आहे.

* * *

## ती. भाऊसाहेब मामा व सौ. पद्मा मामी

ती. भाऊसाहेब मामा उर्फ G. M. दांडेकर हे इंग्लंडहून C.A. होऊन आले होते व M. K. दांडेकर या ऑडिटींग फर्मचे काम पहात होते. ते सांगली अर्बन बँकेचे ऑडिटर होते म्हणून ते दरवर्षी मद्रासहून सांगलीत येत असत. माझे लग्न झाल्यापासून दरवर्षी ते सांगलीस आल्यावर इस्लामपूरला येऊन एक दिवस तरी राहून जात असत. त्यामुळे त्यांची दरवर्षी भेट होत असे. डॉ. आबासाहेब नातू, पुणे हे ह्यांचे आतेभाऊ होते व त्यांची पत्नी सौ. इंदिरावहिनी यांचे माहेर पुण्यातच होते आणि त्यांचे भाऊ डॉ. गोखले हे स्किन स्पेशालिस्ट होते. त्यांचीच बहीण विमल माझ्या भाऊसाहेब.मामांना दिली होती. सासरचे नाव सौ. पद्मावती होते. त्या आमच्यावर फार प्रेम करीत. त्यांना मूलबाळ झाले नाही. पण राजामणी मामांच्या मुलांना, चि. किशोर, चि. नवीन यांना त्यांचा फार लळा होता. ते दोघेही पुढे श्री. भाऊसाहेब मामांच्या हाताखाली C.A. झाले. चि. किशोर अद्याप मद्रासचे ऑफिस संभाळत आहे. सौ. मेघना आणि सौ. वंदना (नवीनची) सख्ख्या बहिणी सख्ख्या जावा आहेत. ह्या सर्वांशी आमचे भावंडांचे चांगले संबंध आहेत. चि. मंगल झाली तेव्हा त्यांनी सौ. पद्मामामीनी लोकरीच्या विणलेल्या कपड्यांचे मोठे पार्सल मद्रासहून धाडून दिले. त्यात हलके निरनिराळ्या रंगाचे, मापाचे स्वेटर, टोप्या, मोजे वगैरे होते की पुढे मंगल, रवि, रमेश सर्वांना ते कपडे पुरून उरले. चि सचिन C.A. झाल्यावर काही महिने मुद्दाम मद्रासला प्रिय किशोरच्या हाताखाली कामाचा अनुभव मिळावा म्हणून जाऊन राहिला होता. चि. वरुणचे व सचिनचे छान जमते.

* * *

## श्री. नानासाहेब दांडेकर

श्री. नानासाहेब मामांचे व्यक्तिमत्त्व फारच प्रभावी होते. ते I.C.S. व C.A. दोन्ही झालेले होते. त्याच्या बद्दलची माझी पहिली आठवण म्हणजे आम्ही त्यांच्या लग्नासाठी इंदूरला गेलो होतो तेव्हाची आहे. इंदूरचे सरदार माधवराव किबे यांची सुकन्या सुशीला हिच्याशी त्यांचा विवाह झाला. तेव्हा संस्थाने विलीन झालेली नव्हती. प्रिय कुसुम अगदी लहान असतां त्यांचा विवाह झाला. म्हणजे मी ३।।/४ वर्षाचा असेन पण विवाह राजेशाही थाटांत झाला होता. हत्तीवरुन अंबारीतून मिरवणूक निघाली होती एवढे आठवते आणि अगदी पहिल्याने आम्ही सौ. मनोरमा मामींजवळ गेलो तेव्हा त्या अदबीने 'आपण बसा ना।' वगैरे बोलू लागल्या तेव्हा मला इतके आश्चर्य वाटले होते की इतक्या लहान मुलांशी या 'अहो, जाहो। कसे करीत आहेत. मिरवणूक निघाली त्यांत सरदाराबरोबर सैनिकही होते व सर्वच बत्त्यांचा झगमगाट होता एवढं मात्र आठवते. त्यानंतर आम्ही एकदा उन्हाळाच्या सुट्टीत मद्रासला गेलो होतो. तेव्हा टेलिचेरी येथे श्री. नानासाहेब मामा कलेक्टर होतो. तेथे काही दिवस राहावयास गेलो होतो. त्यांचा प्रशस्त बंगला एका टेकडीवर होता. सभोवती छानशी बाग होती. तेथून टेकडीवरून तिच्या पायथ्याशी असलेला समुद्र दिसत असे. मामा तेथे समुद्रावर पोहायला जात ते वरून आम्ही पहात असू. तेथे असतांना एकदा आम्ही फिरत्या टॉकीजमध्ये सिनेमा पहावयास गेलो होतो. तेव्हा कलेक्टरांच्या घरची मंडळी म्हणून आमच्यासाठी खास सोफासेट वगैरे मांडून बसण्याची व्यवस्था केली होती. हे अद्याप चांगले आठवते आहे. मद्रासला आम्ही गेलो की रोज रात्री जेवणे झाल्यावर घरांतील सर्व मंडळी अगदी आजीसह पत्ते खेळायला बसत असू. जितकी जास्त मंडळी तितके पत्त्यांचे जोड घेतले जात. बहुतेक झब्बूचा डाव असे. जे कोणी शेवटी हरेल त्याने प्रथम सलाम करून पुढील डावाची सुरुवात केली जाई. खूप मजा यायची. बरेच वेळा सौ. रेवूमावशी गोरे (तिची मुले व ती. विसूमामाही आमच्या बरोबर मद्रासला येत. ती. विसूमामा T.C तिकीट कलेक्टर होता. म्हणून त्याला काही सवलती होत्या की काय माहीत नाही. पण बरेच वेळा

आमचा प्रवास छोट्याशा स्वतंत्र बोगीतून हंसत खेळत नकला करीत, गाणी म्हणत होत असे. आणि डब्यांतच खाण्यापिण्याची छान व्यवस्था होई एवढे आठवते. ती. नानासाहेब मामांना तीन मुलगे होते. कुमार, काशिनाथ आणि रवी. प्रिय कुमार आर्मीत होता. तो एकदां भाऊसाहेब मामाच्या बरोबर इस्लामपूरलाही आला होता. मध्ये काही वर्षे फक्त कार्यातही गाठ पडत असे. चि. रवि दांडेकर मात्र चेस – चॅम्पियन असल्याने बुद्धिबळाच्या स्पर्धेत भाग घेण्यासाठी सांगलीला येत असे. त्यामुळे त्यांची गांठ पडे. चि. सचिनमुळे परत येणेजाणे वाढले आहे.

* * *

## श्री. जे. एम्. दांडेकर (राजामणी मामा)

राजामणी मामात व माझ्यात फक्त चार–साडेचार वर्षाचे अंतर होते. तो मुंबईला सिडनहॅम कॉलेजमध्ये शिकायला होता म्हणून वरचेवर त्याची गांठ पडत असे. ह्यांच्याशीही त्याची मैत्री होती म्हणून तो माझ्या लग्नाच्या आधीही एकदा इस्लामपूरला जाऊन आला होता. तो चि. रमेशच्या मुंजीसाठी आला होता. तेव्हा त्याला उष्माघात होऊन आजारी असतां कसाबसा इस्लामपूरला येऊन पाहोचला होता. त्यावेळी त्याला श्रीसद्गुरूंचे दर्शन होऊन श्रद्धा उत्पन्न झाली व पुढे त्याने अनुग्रहही घेतला. त्यांचे अनुभव 'संध्योपासना' यात व श्रींच्या चरित्रांतून दिले आहेत. त्याची माहिती त्याच्या मुलानांही नव्हती. मी नंतर ती पुस्तके त्यांना दाखवली. तेव्हा त्यांनी श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळास काही मदत केली आहे.चि. शरदची मुंज पुण्यात झाली होती. तेव्हा श्री. सुधीर फडके यांचे गीतरामायणाचा कार्यक्रम ठेवला होता.

* * *

# अनुशेष २

## श्री. कमल निलंगेकर

श्रींच्या एकनिष्ठ भक्तांपैकी एक म्हणजे कमलाताई निलंगेकर. तिचा परिचय आम्ही १९८० मध्ये मिरजला गोरे मंगलकार्यालयात साधक मेळावा घेतला तेव्हा झाला. त्याच्या आधी कधी भेटीचा योग आला नव्हता.त्या वेळी मराठवाड्यातील गुरुबंधुभगिनींशी खरा परिचय झाला, कारण त्यावेळी सर्वांनी आपापले अनुभव सांगितले. त्यांत कमलाताईला शब्द दिला होता म्हणून प. पू. स्वामींनी नाथषष्ठीला देहत्याग न करता, ती दशमीस परंड्यास येऊन तिने दर्शन घेतल्यावरच देहत्याग केला, हे कळले. श्रींच्या चरित्रात ही हकिगत तपशीलवार आली आहे. श्रींनी समाधी घेण्यापूर्वी श्रीसद्‌गुरू आळे महाराज, पोटे स्वामी व त्यांचा फोटो असलेली लाकडी नक्षीदार छोटी पेटी तिला प्रसाद म्हणून दिली हे विशेष. तिचे शिक्षण थोडे झाले असले तरी पाठांतर जबरदस्त आहे. श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात तिच्या मुखाने अनेक स्तोत्रे ऐकावयास मिळून याची प्रचीति आली. ती पूर्वी कीर्तनही करीत असे. शिक्षण कमी असले तरी परमार्थातील तिचा अधिकार फार मोठा आहे. तिच्या मनांतील इच्छा श्रीसद्‌गुरू पुऱ्या करीत असतात, याचा नेहमी अनुभव येतो. शिवाय माणसे जोडण्याची कला तिला उत्तम प्रकारे अवगत आहे. तिने कै. मुकुंदरावांची खूप सेवा केली, हे आम्ही सर्वांनी आपल्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिले आहे. तिच्या सासरची व माहेरची मंडळी तिला फार मानतात. तसेच सत्पुरुषांचे प्रेमही तिला प्राप्त झाले. पू. चूडामणी महाराज, श्री. नागेशराव, श्री. अनंत महाराज बेळगांवकर, श्री. मुकुंद महाराज जाटदेवळेकर वगैरेंची कृपा तिला लाभली आहे. तिची नेमनिष्ठा व भगवत्‌भक्ती पाहून सर्वांना तिच्याबद्दल आदर वाटतो. तिचे मुलगे चि. विलास, चि. सुहास, मुली सौ. शोभा व सौ. लता तसेच तिच्या नणंदा सौ. सिंधुताई, श्री. शरयूताई व इतर अनेकांनी तिच्यामुळेच

प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचा अनुग्रह प्राप्त केला आहे. ती प्रथम फार अशुद्ध लेखन करीत असे. पण श्रीसद्गुरुंच्या आदेशानुसार नित्य नियमाने लेखन करीत राहिल्याने आता तिच्या लेखनात खूप सुधारणा झाली आहे. आरती संग्रह व प्रज्ञाचरितमानस या ग्रंथांचे लेखन तिच्या इच्छेवरूनच श्रीसद्गुरुंनी करवून घेतले आहे. तिची कृष्णउपासना असून कृष्णजप व भागवत–सप्ताह यांतच तिला परमानंद लाभत असतो. ती इतके प्रेम करते की, त्यांतून उतराई होणेच शक्य नाही! तिला नम्र अभिवादन! ती पत्रे फार सुरेख लिहिते.

सौ. आशा येरोळेकर ही कमलची भाची. जप व भगवद्गीता, विष्णु–सहस्त्रनाम दर एकादशीस पठण करते. सौ. वनिता ही प.पू. स्वामी अनुग्रहीत असून **सेवा** हा तिच्या जीवनाचा स्थायीभाव आहे. या दोघी लातूरला असतात. तसेच गंगाबाई ही कमलची धाकटी जाऊ, ती देखील फार भावूक आहे.

* * *

## श्री. दांडेकर मंडळी

माझ्या आईला चार भाऊ होते. त्यांची ती एकुलती एक लाडकी बहीण होती. ती. अण्णासाहेब यांच्या स्वतःच्या कुटुंबाप्रमाणे त्यांच्या सासरच्या कुटुंबालाही आधार वाटत असे. म्हणूनच मला वाटते माझ्या आजोबांना म्हणजे श्री. महादेव काशीनाथ दांडेकर यांना मुंबईस आणले होते व त्यांचा मुंबईतच अंत झाला. मोठे मामा मुंबईतच राहात होते.प्रथम ब्राह्मणसभेसमोर गिरगांवात व नंतर दादर हिंदु–कॉलनीत. त्यामुळे त्या मामा, मामींचा सहवास लाभला. त्यांचा एक मुलगा शारंगधर नांवाचा लहानपणीच त्या मद्रासला असतानाच गेला होता. दुसरा प्रभाकर मतिमंद असल्याने ती. मामींना त्याचे खूप करावे लागले. पण त्यांनी कधीही त्याचा राग राग केला नाही. अत्यंत प्रेमाने त्या त्याची दिवसरात्र देखभाल करीत. मला त्यांच्याविषयी विशेष आदर वाटे तो या कारणासाठी की स्वतःचा मुलगा असा असून त्या कधी कुणाचा द्वेष, राग करीत नसत. सदैव त्या हसतमुख असत. त्या अत्यंत सुगरण होत्या. चि. बाळ व मी त्यांच्याकडे

घरी राहावयास गेलो तर त्या आवडीने नाना पदार्थ करून आम्हाला प्रेमाने खाऊ घालत. चि. बाळ वर तर मामामामींचे स्वत:च्या मुलासारखे प्रेम होते. पुढे ती. आजीने त्यांनाही प.पू. जिजी महाराजांचा अनुग्रह मिळेल अशी काळजी घेतली. कै. रावसाहेब मामा गेल्यावर त्या पुण्याला राहात होत्या. पण पुढे त्यांचा सहवास लाभला नाही.

* * *

## श्री. नातू शेट

श्री. नातू शेट (माधवनगर मिलचे मालक) यांचा अनुग्रह आमच्याच घरी झाला. त्यांच्याशी खूपच संबंध आला होता. ते अनेकवेळा आमच्या घरी मुक्कामास येत. संध्याकाळी ध्यान –धारणा, रात्री भजन परत पहाटे ध्यानधारणा करून आमच्याकडे न्याहरी करून मग ते माधवनगरला परत जात. त्यांच्याबरोबर खूप वेळा श्री. जोशी (लोकमान्य वॉच कंपनी, पुणे चे मालक)ही असत. श्री. नातूंची मुलगी विमल ही माझी भाचे सून (माझी आतेबहिण श्री. भिऊताई टिळक हिच्या मुलाची डॉ. गजानन टिळकची पत्नी) लागत होती. सौ. आक्काही कधी कधी श्री. नातूंच्या बरोबर येत असत. एका वर्षी श्री सद्गुरूंचा मुक्काम माधवनगर येथे श्री. नातूंच्या बंगल्यातच चातुर्मासानिमित्त होता. तेव्हां श्रीगुरुपौर्णिमाही तेथेच झाली होती. शिवाय श्री. नातूंनी माधवनगर मिलच्या आवारांत मोठा मांडव घालून १०० श्रीगुरुचरित्राच्या सप्ताहाचे आयोजनही केले होते. तेव्हा आम्ही तेथे गेलो होतो. नंतर पंचधातूची श्रीदत्ताची मूर्ती बनवून तिची प्राणप्रतिष्ठाही तेथे करण्यांत आली होती. तेव्हा आम्ही मुक्कामास होतो. आमच्यात खूपच आत्मीयता निर्माण झाली होती. आम्ही काही कारणाने मुंबईला गेलो तर दादरला त्यांच्या 'श्रीकृपा' बंगल्यावर जात असू. तेथे भोजन व भजन दोन्ही होत असे. श्री. माधवराव, सौ. उषा, चि. श्रीकांत नातू (यांचीही चांगली ओळख झाली होती.) चि. मंगलच्या लग्नाला सौ. आक्का व बापू उपस्थित होते. त्यांनी चि. मंगलला चांदीची मोठी फ्रूटडिशही दिली होती. चि. मंगल ती नेहमी वापरत असे. एकदां श्री. नातू शेट माधवनगरहून पुणे मुंबईस परतत असता त्यांच्या गाडीचा अपघात झाला

होता. तेव्हा ते वाचले पण मला वाटते हात फ्रॅक्चर झाला होता. त्यांना मधुमेह होता. म्हणून काळजी वाटे. आम्ही बंगल्यावर त्यांना भेटायला गेलो होतो. हे गेल्यावर आम्ही (चि. रमेश व मी) इस्लामपूर सोडले. त्यामुळे नंतर त्यांच्याशी संबंध आला नाही. श्री. ओक काका प्रथम इस्लामपूरला होते. ते मोहन टॉकीजचे मालक होते. ते विकावे लागले व त्यानंतर त्यांना आर्थिक समस्या उत्पन्न झाली तेव्हा सौ. मंगलाने एस्.टी.सी ची परीक्षा देऊन ती काही वर्षे इस्लामपूर हायस्कूलमध्ये शिकवत होती. पू. स्वामींनी श्री. बापूंच्या कानावर हे घातल्यावर त्यांनी श्री. ओककाकांना माधवनगरला बोलावून घेतले आणि तिथे त्यांचा जम बसला. त्यांनी तेथे स्वतःचे मागही टाकले. शिवाय तेथे घरही घेतले. नंतर खूप वर्षे ते माधवनगरलाच होते. नंतर ते सांगलीत वेलणकर यांच्या अपार्टमेंट हाऊसमध्ये राहात होते व नंतर जयसिंगपूरला राहात होते. ते माधवनगरला राहावयास गेल्यावर सौ. मंगलाने नोकरी सोडली आणि ती प्रवचने, कीर्तने करू लागली. तिला याबाबत श्री. वासुदेवराव जोशी, माधवनगर यांनी मार्गदर्शन केले होते. तिचा आवाज मधुर व ती अभ्यास करून बोले. त्यामुळे लोकांना तिची प्रवचने, कीर्तने खूप आवडत. श्रीसद्गुरूंनी समाधी घेतल्यावर व त्या आधी श्री. नातूशेट बरोबर ती दोघे फलटण येथे श्री. काकासाहेब उपळेकरांकडेही सत्संगासाठी जात. त्यांचीही कृपा त्यांना लाभली होती. सौ. आक्का नातूंचे अपघाती निधन झाले होते. असो.

* * *

## श्री. स. ल. परांजपे (जबलपूर)

आम्ही मुंबईला गेलो होतो तेव्हाच मी जबलपूरला पत्र लिहून प्रिय मंगलाची जबलपूरला श्रीदत्तमंदिरात, ज्याची प्राणप्रतिष्ठा श्री सद्गुरूंच्या शुभहस्ते झाली होती, तेथे कीर्तने, प्रवचने व्हावीत म्हणून पत्रव्यवहार केला होता. तेव्हां त्यांचे उत्तर आले होते व त्यांनी मला मुद्दाम लिहिले होते की, मंगलताईंच्या बरोबर मीही जबलपूरला यावे. माझा भाडेखर्चही ते देतील. हे वाचून मला आश्चर्य वाटले आणि आनंदही झाला; की त्या दत्तमूर्तीचे प्रत्यक्ष दर्शन मला होणार आहे. कारण मी त्या प्राणप्रतिष्ठा

समारंभास गेले नव्हते तरी मला घरीच त्या श्रीदत्तमूर्तीचे स्वप्नांत दर्शन झाले होते आणि माझ्याकडून काव्यही झाले होते. असो. जबलपूरला जायचे ठरल्यावर मला वाटले की, तेथून सतना व चित्रकूट जवळ आहे तर सतन्याला मानस संघातर्फे रामबनामध्ये श्री. बाबा गंगादास व श्रीसद्गुरूंच्या संगमरवरी मूर्ती बसविल्या आहेत, तर त्यांचेही दर्शन होईल. तसेच कित्येक वर्षापूर्वी कल्याणच्या तीर्थाङ्कात मी **भरतमिलाफ** या स्थानाविषयी वाचले होते. तेव्हापासून त्या स्थळी आपल्याला कधी जायला मिळेल कां अशी उत्कंठा मनात होती. असो. जेथे आम्ही जे.जे. हॉल मध्ये राहात होतो तेथेच डॉ. पटोरिया म्हणून राहात होते. त्यांची पत्नी एम.ए. (हिंदी) होती आणि मुख्य म्हणजे ती महादेवी वर्मा यांची विद्यार्थिनी होती. तिची माझी खूप मैत्री झाली होती. तिचे मामा श्री. जैन हे सतना येथे राहात होते आणि जेव्हा आमची ओळख झाली तेव्हा मला कळले की ज्या 'मानसमणि' मासिकांत श्रीसद्गुरूंचे लेख कित्येक वर्षे प्रसिद्ध होत होते, मी स्वतःही 'मानसमणि' ची वर्गणीदार होते आणि मानससंघ रामबनकडे आम्ही सर्व गुरुभगिनी 'रामनामलड्डू' लिहून धाडत असू. हे 'मानसमणि' मासिक श्री. जैन यांच्याच प्रेसमध्ये छापले जात होते. हे सर्व कळल्यावर आम्हांला एकमेकांविषयी आत्मीयता उत्पन्न झाली होती. मी जेव्हां जैन यांना आम्ही सतनाला जाणार आहोत असे सांगितले तेव्हा ते म्हणाले की, 'मी आता माझ्या डोळ्याच्या ऑपरेशनसाठीच मुंबईला आलो आहे. त्यामुळे माझ्या घरी मी तुमची सोय करू शकत नाही. पण सतना येथे माझे स्नेही श्री. मोडक म्हणून महाराष्ट्रीयन आहेत. त्यांच्याकडे तुमची सोय होईल अशी मी व्यवस्था करतो.' तसेच त्यांचे एक स्नेही जे ऑडिटर होते त्यांना सांगून ते आम्हाला रामबनला नेऊन आणतील अशीही व्यवस्था त्यांनी केली. ठरल्याप्रमाणे आम्ही (मंगल ओक, मी) मुंबईहून जबलपूरला रेल्वेने निघालो. जबलपूरला श्री.स.ल. परांजपे यांनी स्टेशनवर आम्हांस आणण्यासाठी व्यवस्था केली होती. त्याप्रमाणे आम्ही जाऊन श्रीदत्त-मंदिरात उतरलो. दत्तमंदिराला लागूनच आमची उतरायची खोली होती. त्याच्या मागील बाजूस एका खोलीत श्री. परांजपे पत्नीसह राहात होते व त्याही मागे पुजारी श्री. वैद्य कुटुंबासह राहात होते. आमची जेवायची

खायची व्यवस्था त्यांच्याकडे होती. आम्ही त्यांच्याकडे उतरलो आणि आम्ही दुसरे दिवशी सतना येथे जाऊन रामबनला भेट देऊन परत जबलपूरला येऊ असे सांगूने रेल्वेने सतना येथे गेलो व तेथे रिक्षा करून श्री. मोडकांचा पत्ता शोधून त्यांच्या घरी पोहोचलो. त्यांनी अत्यंत प्रेमाने आमचे स्वागत केले. नंतर त्यांच्याकडे जेवून विश्रांती घेऊन आम्ही, जे गृहस्थ आम्हांला 'रामबन'ला नेणार होते त्यांच्या घरी जाऊन त्यांना भेटलो व 'रामबन' चा कार्यक्रम ठरवून आलो. दुसरे दिवशी सकाळी लवकर सर्व उरकून आम्ही 'रामबन' येथे पोहोचलो. तेथे हनुमंताची खूप उंचच उंच मूर्ती आहे व देवळांत किष्किंधा व सुंदरकांड संगमरवरांतील फरशांवर कोरलेले आहे. ते पाहूनच पुढे मला परंडा राममंदिरात 'मानस चौपाया, दोहे' कोरलेल्या फरशा बसवून त्याला मानस मंदिर बनविण्याची कल्पना सुचली. असो. नंतर तेथे मानस सरोवराचे प्रतीक असे सरोवर तयार केले होते व तेथे श्री. बाबा गंगादास व पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्या मूर्ती बसविल्या होत्या त्यांचे दर्शन घेतले. पू. बाबा गंगादास यांची मूर्ती चांगल्या स्थितीत होती व श्रीसद्गुरूंची मूर्ती होती. तिच्या हातांतील दंड कोणीतरी काढून घेतला होता व एक हाताची बोटेही धड नव्हती. ते पाहून फार वाईट वाटले. पण कधी सतना येथे जाऊन तेथील तीर्थक्षेत्राचे दर्शन होईल असेही वाटले नव्हते. पण श्रीसद्गुरूंच्या व रामभैय्याच्या कृपेने ते साध्य झाले. नंतर असे कळले की, श्री. बिर्लांनी त्या जागेला भेट दिली होती व त्या स्थानाच्या जीर्णोद्धारासाठी निधीही उपलब्ध करून दिला होता. नंतर अनेक वर्षांनी श्री. श्रीकांत आपटे (पनवेल) यांनी त्या जागेस भेट देऊन दोन्ही पुतळे जीर्णोद्धाराचे काम चालू असल्याने त्यांनी दुसऱ्या जागी हलवले होते. त्यांचे दर्शन घेऊन मला फोटो धाडून दिले व त्यावरून स्फूर्ती घेऊन जयपूर येथे श्रींच्या पुतळ्यासाठी छायाचित्र देऊन पुतळा बनवून घेतला व पुढे गेल्या दीड वर्षापूर्वी परंडा येथील श्रीराममंदिराच्या गर्भगृहांत त्याची प्राणप्रतिष्ठाही करण्यात आली, असो. आम्ही दर्शन घेऊन परत सतना येथे श्री. मोडकांच्या घरी पोहोचलो. नंतर दुसरे दिवशी संध्याकाळी प्रिय मंगलताईंचे संध्याकाळी जबलपूरच्या श्रीदत्त मंदिरात कीर्तन होते म्हणून ती जबलपूरला रेल्वेने गेली. श्री. मोडक यांच्या मुलाने

तिला रेल्वेत बसवून दिले. त्या भागांत गेल्यावर चित्रकूटला जायचेच असे माझे स्वप्न होते म्हणून मी चित्रकूटला बसने जाणार होते. पण त्या भागांत गुंडागर्दी असते म्हणून मला एकटीला जाऊ देण्यास श्री. मोडक तयार झाले नाहीत व स्वत: माझ्या बरोबर आले. मला वाटते आम्ही सकाळी ६.३० /७.०० च्या बसने सतनाहून निघून सकाळी ९.०० ते ९.३० च्या सुमारास चित्रकूटच्या बसस्थानकावर पोहोचलो. नंतर रिक्षा करून कामतागिरीच्या पायथ्याशी असलेल्या राममंदिरांत पोहोचलो व मंदिरात जाऊन श्रीविग्रहांचे दर्शन घेतले. तुळसी, फुले वाहून नारळ फोडून प्रसाद घेतला. खडीसाखर, फुटाणे वगैरे घेऊन बाहेर पडलो व कामतागिरीच्या प्रदक्षिणेस सुरुवात केली. प्रदक्षिणा पूर्ण केल्याशिवाय पाण्याशिवाय काही घ्यावयाचे नाही असे ठरविले होते. म्हणून प्रदक्षिणेस सुरुवात केली. त्या वाटेवर खूप माकडे आहेत. एका माकडाने मोडकांच्या हातांतील पिशवी हुसकावून घेतली व सर्व सामान फेकून दिले व पिशवीही फेकून दिली. पण बाकी काही त्रास ती देत नाहीत. प्रदक्षिणेच्या वाटेवर अधूनमधून फारशा उंच नसलेल्या मोठमोठ्या लांबसडक पायऱ्या आहेत. परत मध्येच साधा रस्ता आहे. अंतरा अंतरावर पाण्याचे नळ आहेत. गोड, शीतल, स्वच्छ पाणी प्यायले की समाधान वाटते. वाटेत देवळे आहेत मातांची, जनकराज वगैरेंची. नंतर एकदाचे 'भरतमिलाफ' हे स्थान आले. तेथे त्यावेळी तरी मंदिर वगैरे नव्हते. फक्त गोलाकार मोठी शिळा ज्यावर खूप पावले उमटलेली होती व सभोवती फक्त मजबूत कठडा होता. एखाद्या गच्चीत जशी अर्धवट भिंत असते ना तसा. तेथे आम्ही गेलो तेव्हा त्या कठड्यावर बसून एक संन्यासी रामायण वाचत होते. त्यांनी डोळ्याला सोनेरी काड्या असलेला चष्मा घातलेला होता. गौरवर्ण असून तेजस्वी डोळे होते, प्रसन्न स्मितहास्य चेहऱ्यावर होते जे पाहून आपल्यालाही प्रेमादर वाटावा. तेथे दुसरे कोणीच नव्हते. त्यामुळे मी त्यांनाच विचारले की, बाबाजी मैं अंदर उतर सकती हूँ क्या? आप हँसकर बोले, 'हाँ जरूर उतर सकती हो।' मला आनंद झाला. मी माझी पर्स श्री. मोडकांच्या हातांत दिली आणि कठड्यावर आतील बाजूस तोंड करून बसले! खाली पाहिले तर अगदी कठड्यापर्यंत ती शिळा होती व त्यावर पावले उमटलेली होती. आता

कठड्यास लागून अगदी थोडी जागा होती. तेथे आडवी पावले ठेवली आणि मी त्या शिळेवर गुडघे टेकून सरळ तिच्यावर झोपूनच गेले. कित्येक वर्षांची इच्छा पूर्ण झाली होती. असे म्हणतात की, रामभरतांचे प्रेम पाहून पाषाणही द्रवले आणि त्यामुळे त्यांची पावले त्याच्यावर उमटली व परत ते पाषाण घट्ट झाल्यावर ते ठसे तसेच कायम राहिले. तेथून थोड्या अंतरावर एका झुडुपाशी दोनच पावले उमटलेली होती. ती सीता वहिनींची असावी. तेथे पोचल्यावर प्रेमाचा आवेग आवरेना. डोळ्यांतून अश्रु वाहू लागले. अंग थरथरू लागले. प्रयासपूर्वक गुडघे टेकून बसले आणि श्री. मोडकांना सांगितले की, माझ्या पर्समध्ये एक डबी आहे तिच्यात चांदीच्या छोट्या पादुका आहेत त्या जरा काढून द्या. त्यांनी त्याप्रमाणे लगेच पादुका काढून दिल्या. मी त्या हातात घेऊन त्या शिळेवर ठेवल्या व शिळेवर हात फिरवून जे धुलीकण हाताला लागले ते त्या पादुकांवर ठेवले. खरे तर तेथे फारशी धूळच नव्हती. पण कडेला थोडी धूळ होती ती व जी मिळेल ती घेऊन स्वतःच्या कपाळी, डोक्यावर व छातीस लागून त्या पादुकांवर वाहिली व त्यांना मस्तकी धारण केले व श्री. मोडकांच्याकडे ती डबी मागून त्यांत त्या परत ठेवून झाकण लावून त्यांना परत पर्समध्ये ती ठेवण्यास सांगितले. मला वाटते ही १९८७-८८ मधील घटना असावी. तेव्हापासून त्या रामभैय्याच्या पादुका नित्य पूजेत आहेत! माझी कित्येक वर्षांची इच्छा रामभैय्यांनी पुरी केली होती. मी मग तशीच मागेमागे कठड्याजवळ सरकून परत कठड्यावर बसले. त्यावेळी पाहिले तर तेथे ते संन्यासी नव्हते. शिवजींनी त्या रूपात दर्शन दिले असावे असे नंतर वाटले. नंतर मी परत कठड्यावरून बाहेरील बाजूस उतरून उभी राहिले. तेव्हा खरे तर थोड्या अंतरावर 'रामलीला' चालली होती. किशोरवयाची रामभैय्या, सीताभाभी वडाच्या पारावर विराजमान होती. लक्ष्मणभैय्या शेजारी उभे होते. समोर काही लोक बसून ती लीला पहात होते. हे सगळे दिसूनही त्यांच्याजवळ जाऊन त्यांची पायधूळ घ्यावी, प्रणाम करावा हे सुचले नाही. आंतून सुरू झालेला प्रेमावेग आवरत नव्हता. तसेच त्या 'रामलीले'कडे पहात आम्ही परत प्रदक्षिणेच्या वाटेवर आलो, तेव्हा श्री. मोडक मला म्हणाले की, 'मंगलताई मला म्हणाल्या होत्या की, कमाताईंना

नीट सांभाळा.' तेव्हा मला आश्चर्य वाटले होते. आतां त्याचा अर्थ मला कळला.' असो पुढे पूर्ण प्रदक्षिणा केली तोपर्यंत दुपारचे ३.०० ते ३.३० वाजले होते. परत आम्ही राममंदिरापाशी येऊन पोहोचलो होतो.

चित्रकूटला मफतलाल यांच्या तर्फे एक हॉस्पिटल आहे. तेथे त्या दिवशी मोफत नेत्रचिकित्सा शिबीर होते. त्यामुळे गांवात गर्दी होती. बसस्थानक लांब होते. रिक्षा मिळेल अशी शक्यता दिसेना. प्रदक्षिणा करून पायही दुखू लागले होते आणि काही न खाल्ल्याने थकवा जाणवत होता. इतक्यांत श्री. मोडकांचे एक परिचित गृहस्थ टाटा सुमोतून तेथे मंदिरापाशी उतरले. (सह परिवार) तेव्हां श्री. मोडकांना पाहून त्यांना आश्चर्य वाटले व आनंदही झाला. श्री. मोडकांनी त्यांना रिक्षा मिळत नाही असे सांगताच ते म्हणाले की, 'आमच्या गाडीतून तुम्ही बस स्थानकापर्यंत जा आणि गाडी लगेच धाडून द्या.' हे ऐकून श्री. मोडकांना आनंद झाला. आम्ही बसस्थानकावर आलो तर सतन्याची बस उभीच होती. लगेच आम्ही बसमध्ये चढलो आणि बस सुटली आणि योग्य वेळी आम्ही सतन्यास त्यांच्या घरी येऊन पोहोचलो.

घरी सौ. वहिनींनी लगेच मस्तपैकी आले घातलेला चहा करून दिला आणि मोठ्या टबमध्ये मीठ घालून पाणी गरम करून मला पाय शेकण्यास आणून दिले आणि नंतर लगेच गरम गरम जेवणही वाढले. हे इतक्या प्रेमाने केले की माहेरी आल्यासारखेच वाटले. विशेष म्हणजे श्री. मोडकांनी माझ्याकडून प्रवासखर्चही घेतला नाही! ही सर्व रामभैय्याचीच कृपा नव्हे कां? दुसरे दिवशी सकाळी मला त्यांनी जबलपूरच्या गाडीत-रेल्वेत बसवून दिले. विशेष म्हणजे ही गोष्ट घडल्यानंतर १०/१२ वर्षांनी श्री. माधव पर्वते व प्रिय अंजली यांना सतन्यास जावयाचे होते व त्यांच्या ओळखीचे तिकडे कोणी नव्हते. म्हणून मी त्यांना श्री. मोडक यांचा पत्ता व फोन नंबर दिला आणि त्याप्रमाणे ती त्यांच्याकडे गेल्यावर त्यांचेही त्यांनी इतके आतिथ्य आगतस्वागत प्रेमाने केले की काय सांगावे? अशा या संतसज्जनांच्या ऋणांतून कसे बरे मुक्त होता येईल?

* * *

## डॉ. सौ. ऊर्मिला जामदार

आम्ही जबलपूरला होतो तेव्हाच डॉ. सौ. ऊर्मिलाताई यांची ओळख झाली. त्यांचे घर तसे श्री दत्तमंदिरापासून जवळच होते आणि त्या मंदिराच्या विश्वस्तांपैकी एक होत्या. शिवाय त्यांची सून डॉ. सौ. शिरीष ही सांगलीच्या सराफ गाडगीळांची माहेरवाशिण म्हणून त्यांनी मंगलाताईंना व मला त्यांच्या घरी जेवायला बोलावले होते. श्री. जामदार यांचा तुलसी रामायणाचा गद्य मराठी अनुवाद मी लग्नानंतर १९४३-४४ मध्ये इस्लामपूर येथे वाचला होता. ते मला वाटते डॉ. सौ. ऊर्मिलाताईंचे मामंजी असावेत. शिवाय डॉ. सौ. ऊर्मिलाताई जामदार यांनी ज्ञानेश्वरीचा हिंदीमध्ये ओवीबद्ध अनुवाद केलेला होता. त्यांनी आमच्या मंडळाचे आजीव सदस्यत्व स्वीकारून एक हजार रूपये रोख द्यावयाच्या ऐवजी ज्ञानेश्वरीच्या हिंदी अनुवादाच्या ५ प्रती आमच्या स्वाधीन केल्या होत्या. त्यांचा तो हिंदी अनुवाद राष्ट्रपती भवनांत उपराष्ट्रपती शंकर दयाळ शर्मा यांच्या हस्ते प्रकाशित झाला होता. अशा भगवद्भक्त विदुषींचा परिचय झाल्याने खूप आनंद झाला. नंतर आम्ही भेडाघाटलाही जाऊन आलो.

जबलपूरहून आम्ही नागपूरला गेलो. तेथे मंगलाच्या जाऊबाईंचे जावई डॉ. शिंदे यांच्या घरी उतरलो होतो. त्यावेळी त्यांच्या मातोश्री व मंगलाच्या जाऊबाई तेथे होत्या. त्यांनी आमचे चांगले आतिथ्य केले. तेथे दुसरे दिवशी वसंतनगर मधील संकटमोचन हनुमान मंदिरात श्रीराम जयराम जय जय राम या त्रयोदाक्षरी मंत्राच्या सामुदायिक अनुष्ठानानिमित्त हवन व महाप्रसाद वगैरे कार्यक्रम होता. त्याचा लाभ मिळाला व तेथे संध्याकाळी मंगलाचे प्रवचन झाले व तेथे तिचा व मी पीएच. डी. झाले म्हणून माझाही सत्कार करण्यात आला. नंतर दुसरे दिवशी मी महाराष्ट्र एक्स्प्रेसने व मंगला विदर्भ एक्स्प्रेसने नागपूरहून निघालो व आपापल्या घरी गेलो.

* * *

## श्री. हेमंत बावीकर

सौ. उल्का, वैष्णवी, अभिजित, श्री. संतोष चिटगोपकर मुळे, श्री. हेमंत बावीकरची ओळख झाली व त्यांनी श्रींचा अनुग्रहही घेतला. बावीकर कुटुंब

भोरला राहात होते. मी एकदा चि. संतोषच्या गाडीने मुंबईस पवईला जाण्यास निघाले तेव्हा आम्ही वाटेत दुपारी जेवणासाठी श्री. हेमंतकडे थांबलो होतो. त्यावेळी सर्वांचा परिचय झाला व जेवून थोडावेळ थांबून आम्ही पुढे पवईला सांदीपनी साधनालय येथे रात्री ९.०० वाजतां पोहोचलो. नंतर श्रीगुरुदेव चिन्मयानंदांच्या कल्याणी विशेषांकाच्या वेळी मी पुण्यास गेले होते. तेव्हा प्रथम चित्राकडे उतरले होते व तेथून चि. सौ. आरतीकडे थोडावेळ थांबून पुढे चि. सलीलकडे रात्री मुक्कामास गेले होते. 'विशेषांका'चे प्रकाशनास श्री. संतोष आला होता. त्याच्याबरोबर समारंभ संपल्यादर पुण्याहून निघून आम्ही रात्री भोरला मुक्कामास श्री. हेमंतच्या घरी गेलो होतो. असे दोनदा त्याच्या घरी जाणे झाले. पण त्या सर्वांबद्दल इतकी आत्मीयता उत्पन्न झाली आहे की सांगता येत नाही. परंड्यास उत्सवात त्यांची भेट होतेच असे नाही. कारण श्री. हेमंत शिक्षक आहे आणि शाळांच्या वार्षिक परीक्षा नेमक्या मार्च एप्रिलमध्येच येतात. पण त्याची मुलेही फार गुणी आहेत. अभिजित इंजिनियरींग कॉलेजमध्ये आहे आणि वैष्णवी अभ्यासांत हुशार असून संगीत व नृत्यकलेतही कुशल आहे. ती मला टेलिफोनवरही भजने म्हणून दाखवते. त्यांच्या घरी श्रीगजानन महाराज शेगांवकरांचा उत्सव सामुदायिक रीतीने थाटांत साजरा होतो. श्रीगजानन विजयचे पारायण व महाप्रसाद असा कार्यक्रम असतो. श्री. पंडितराव देशमुख व सौ. सिंधुताई या दांपत्याने प.पू. स्वामींची अतिशय श्रद्धेने सेवा केली होती म्हणूनच आज त्यांच्या दोन मुली सौ. कुसुम भोसरेकर व सौ. विद्या साबणे ह्या स्वामींच्या शिष्य परिवारात सामील झाल्या आहेत.

* * *

## सौ. अंजली चितळे

याच संदर्भात चि. सौ. अंजली चितळे हिलाही मी विसरू शकत नाही. ती आमच्या घरी सत्संगाला नेहमी येत असते. कधी मार्गदर्शनासाठी किंवा काही विषयावरील चर्चा करण्यासाठी येत असते. रामचरितमानससाठी तिने देणगी रूपाने अर्थसाहाय्यही केले आहे. ती भिलवडीचे सुप्रसिद्ध चितळे डेअरीचे मालक श्री. चितळ्यांची सून आहे. ती स्वभावाने अतिशय मनमिळाऊ आहे.

# अनुशेष ३

**श्री. ह.भ.प. शंकर अभ्यंकर**

त्या गोष्टीला कमीत कमी ७ वर्षे तरी झाली असतील. तरूण भारत च्या ग्राउंडवर श्री. शंकर अभ्यंकरांची प्रवचने सुरू होती. सौ. रेखा पटवर्धनने श्री. अभ्यंकर पतिपत्नीना तिच्या घरी बोलावले होते. मला वाटते त्यांची कोल्हापूरला प्रवचने झाली होती तेव्हा अभ्यंकर पतिपत्नी 'पंचशील'मध्ये उतरली होती. तेव्हा मला वाटते, चि. माधवने त्यांना त्यांच्या घरी बोलावले होते व मलाही सांगलीहून बोलावले होते म्हणून मी गेले होते. तेव्हा त्यांचा ओझरता परिचय झाला होता. पण मिरजेला ती दोघे सौ. रेखाकडे आली तेव्हा खूप मनमोकळ्या गप्पा झाल्या होत्या. त्या पतिपत्नींचे मला फार कौतुक वाटले म्हणून मी म्हटले की, ''तुमची दृष्ट काढावी असे वाटत आहे काढू कां?'' तेव्हा ते म्हणाले की, ''काढा ना! तुमच्यासारख्या थोरामोठ्यांचे आशीर्वाद आम्हांला हवेच आहेत'' आणि मग मी त्यांची प्रेमाने दृष्ट काढली होती. त्यानंतर त्यांची प्रत्यक्ष गांठ कधी पडली नाही. पण त्यांचे कार्य पाहून मात्र थक्क व्हावयास होते.

* * *

**सौ. सुलोचना बापट**

डॉ. सौ. उषाताई गुणे यांच्यामुळे सौ. सुलोचनाताईंची ओळख झाली. त्यांना रामायणावर बोलायचे होते म्हणून त्या माझ्याकडे येऊन काही पुस्तके घेऊन गेल्या. त्यामुळे ओळख झाली. त्या समितीचे कार्य करतात, शिबिरे भरवतात.

* * *

**श्री. ज. वा. परुळेकर, बेळगांव**

'संतकृपा'त माझे नेहमी लेख येत असत. त्यातच मी एकदा एक

निवेदन दिले होते व त्यांत प्रथम मी ज्यांना कुणाला 'श्रीरामचरितमानस' या गोस्वामी तुलसीदासलिखित ग्रंथात रस असेल त्यांनी आमच्या 'श्रीरामचरित मानसप्रेमी मंडळा'शी संपर्क साधावा असे लिहून माझा पत्ता दिला होता. खरोखर परमेश्वराची काय लीला असते ते कळत नाही. या निवेदनानंतर श्री. ज. वा. परुळेकर, श्री. गुरूदेव रानडे मंदिर, बेळगांव यांचे सविस्तर पत्र आले की, 'संतकृपा'तील निवेदन वाचून त्यांना आनंद झाला होता व पाडव्याच्या मुहूर्तावर माझा परिचय होण्याचा योग आला याने विशेष आनंद झाला. त्यांनी असेहि लिहिले होते की, प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी 'मानसा'चा जो मराठी समवृत्त समच्छंद अनुवाद केला आहे त्याच्या प्रती दुर्मिळ असल्याने तो छापण्यास श्रीगुरुदेव रानडे मंदिर ही संस्था सहाय्य करू इच्छिते. तरी याबाबत आपला काय विचार आहे? ते कळवावे. या आधी य. गो. जोशी यांनी या रामायणाची 'गुटका' प्रत काढलेली होती. तेव्हा ती प्रत मला वाटते ६/- रु. ला असेल. त्याच्या थोड्याच प्रती शिल्लक होत्या. म्हणून मी याबाबत सहकार्य करावयास आमचे मंडळ तयार असून त्यांच्या काय अपेक्षा आहेत ते कळवावे असे लिहिले होते. त्यांनी सर्व चौकशी करून ४०/- रु. एक प्रत याप्रमाणे ५००/- प्रतींचे रु. २०,०००/- आम्ही दिल्यास ते हा ग्रंथ छापावयास तयार आहेत असे कळविले. मी त्यांच्याकडून २/३ महिन्याचा अवधि मागून घेतला व सर्व गुरुबंधुभगिनींना पत्रे लिहून हे सर्व कळवले.. तेव्हा कोणी, किती सहाय्य केले हे आता आठवत नाही. पण वीस हजार रुपये बघताबघता जमले आणि त्यांना ते धाडले गेले. तेव्हा आमचे मंडळ रजिस्टरही झालेले नव्हते. पण प्रुफे पहाणे किंवा इतर काहीही परिश्रम न पडता 'श्रीगुरुदेव रानडे मंदिर' कडून उत्तम छपाई होऊन योग्यवेळी ५०० प्रती आमच्या हाती पडल्या. त्यात चि. विष्णू गिल्डा अगदी शिशुरूपांत प.पू. स्वामींच्या शेजारी हसत खेळत आहे व प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती मधुर हास्य करीत आहेत असा फोटो घातला होता. इतके दिलखुलास आणि मनमोहक हास्य असलेला तो एकमेव फोटो आहे असे मला वाटते. असो. या निमित्ताने श्री. ज.वा. परुळेकर यांचा परिचय झाला व मग बेळगांवला डॉ. श्रीकांत गोगटेकडे गेले असता त्यांच्या घरीही

जाऊन आले. त्यांची अनेक पत्रे मजजवळ होती त्यांनी बेळगावला आमच्या मराठी मानसाच्या सामूहिक पारायणाचा व माझ्या 'एकनाथी भागवता' वरील व्याख्यानांचा कार्यक्रमही ठरविला होत. त्याप्रमाणे सर्वत्र पोस्टर्स लावून आमंत्रणपत्रिकाही छापल्या होत्या. पण आम्ही सर्व जाणार तर माझ्या एकाएकी छातीत थोडे दुखले व ई.सी.जी. ही नॉर्मल नव्हता. त्यांतील बदल पाहून डॉक्टरनी जाण्यास बंदी घातली व फोन करून सर्व कार्यक्रमच रद्द करावा लागला. प्रवचने झाली असती तर त्यांच्याच सांगण्यावरून ७५० पृष्ठांच्या प्रबंधाची मी २५० पानांची संक्षिप्त आवृत्ती तयार केली होती. तीही त्यांच्या संस्थेतर्फे छापली जाणार होती, तेही काम राहिले. माझ्यापेक्षांही ही गोष्ट श्री. परुळेकरांना फार दु:खद वाटली. नंतर त्यांच्या डोळ्यासमोर त्यांच्या एका पुत्रास देवाज्ञा झाली म्हणून मी त्यांना डॉ. श्रीकांत गोगटे बरोबर भेटावयास गेले होते. तेव्हा ते स्वत:ही अंथरुणास खिळूनच होते. पण आम्ही गेल्यावर ते म्हणाले, 'मुलगा गेला म्हटल्यावर एकदम धक्का बसला खरा! पण गुरुदेवांनी दिला आणि त्यांनीच तो नेला असे मनांत आल्यावर मन शांत झाले!' हे ऐकून गुरुदेव रानड्यांच्या कृपेनेच ही स्थितप्रज्ञता लाभली असे मनांत येऊन समाधान वाटले. प्रारब्ध कधी चुकत नाही. त्यामुळे अनुकूल, प्रतिकूल घटना घडतच असतात. पण गुरुकृपा असेल तर मनुष्य त्यामुळे सुखी वा दु:खी मात्र होत नाही. अलिप्त राहू शकतो हे प्रत्यक्ष पाहावयास मिळाले. नंतर पुढे त्यांची गांठ कधी पडली नाही. त्यांना देवाज्ञा झाली.

* * *

## सौ. संध्या पटवर्धन

सौ. संध्या पटवर्धनची प्रथम भेट प.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्या एका ज्ञानयज्ञांत ती बुकस्टॉलवर असताना झाली. प्रिय सौ. अर्चनाची मैत्रीण म्हणून तिने स्वत:ची ओळख करून दिली. तिने आयुष्यांतील समस्यांना ज्या धैर्याने तोंड देऊन शिवाय अध्यात्मालाही वाहून घेतले आहे हे पाहून तिचे फार कौतुक वाटते. नंतर प.पू. स्वामी तेजोमयानंदांच्या ज्ञानयज्ञातच तिची दोन तीन वेळा गांठ पडली. एकदा कॅम्पमध्ये पुण्याल

ज्ञानयज्ञ होता. तेव्हा मी तेथे पू. स्वामीजी उतरले होते तेथून ज्ञानयज्ञाच्या जागेपर्यंत त्यांच्या गाडीनेच गेले होते. पण ज्ञानयज्ञ संपल्यावर रिक्षा पकडून चि. सौ. अर्चनाच्या घरी जाणे शक्य नव्हते. म्हणून मी पू. स्वामीजींना विनंति केल्यावरून त्यांनी पू. जयरामभाईंना मला सौ. अर्चनाच्या घरी सोडण्यास सांगितले. दुसऱ्या दिवशी प्रिय सौ. संध्या स्वत: पू. गुरुजींना म्हणाली की, 'कमलताईना मी घरी सोडते.' ती मला आजीच मानते. प.पू. मुरारीबापूंच्या हस्ते श्रीराममंदिरात प्राणप्रतिष्ठा होणार होती. तेव्हा मंदिराच्या द्वारावर व्याघ्रमुख लावतात ते परंड्यात मिळणे शक्यच नव्हते. सौ. संध्यास फोनवरून कळविल्यावर ती बरोबर वेळेच्या आधीच व्याघ्रमुख घेऊन परंड्यात हजर झाली आणि तिने त्याचे पैसेही घेतले नाहीत. ती स्वत:ही वेदांतावर अभ्यासवर्ग घेते व पू. स्वामी गोविंददेवजी गिरींच्या हृषीकेश, स्वर्गाश्रम वगैरे ठिकाणच्या निवासीशिबिरात स्वयंसेविका म्हणून काम करते. तिचे मला फार कौतुक वाटते. तिच्या हातून अशीच संतसेवा, भगवत्सेवा घडावी व तिचे जीवन सार्थकी लागावे हीच रामभैय्याच्या चरणी प्रार्थना आहे.

* * *

## सौ. वसुमति देशपांडे उर्फ गार्गी

'तेजाचे चांदणे' हे प.पू. वरदानंद भारती स्वामींचे चरित्र वाचल्यावर सौ. वसुमति देशपांडे उर्फ गार्गी यांची खरी थोरवी लक्षांत आली. त्यापूर्वीच परंड्यास एका वर्षी पुण्यतिथी उत्सवात त्यांची गांठभेट झाली होती आणि कीर्तन श्रवणाचाही लाभ झाला होता. मी श्री. मधुसूदन सरस्वतींच्या 'भगवत्-भक्ति रसायन' वर लिहिण्याचे ठरविल्यावर मला कळले की, त्यावर पू. दासगणूंची मराठी ओवीबद्ध टीका 'भक्तिरसायन भावप्रकाशिका' म्हणून उपलब्ध आहे. तेव्हां मी पू. गार्गी यांच्याशी संपर्क साधून ती टीका मागवून घेतली व त्यांनी ती तत्परतेने धाडली हे विशेष! आमच्या गुरुभगिनी 'मानसा'च्या सामूहिक पारायणासाठी गोरठे येथे गेल्या होत्या. तेव्हा तेथील व्यवस्था पाहून त्या थक्क झाल्या. जेथे कुठे काही कमी पडेल असे वाटले की तेथे पूज्य गार्गी उपस्थित असतात. स्वत:ला त्यांनी श्री सद्गुरू-सेवेत झोकून दिले आहे. त्या कृतार्थ झाल्या आहेत यात शंकाच नाही.

पू. वरदानंद भारती स्वामी समाधिस्थ झाल्यानंतरची गोष्ट आहे. मी काही उत्सवानिमित्त सौ. रेखा पटवर्धनकडे राहावयास गेले होते. तेव्हा त्या दिवशी पू. वरदानंद भारती उर्फ श्री अनंतराव आठवले यांच्या पत्नीही सौ. रेखाकडे मुक्कामास आल्या होत्या. त्यांचे दर्शन झाल्याने मला फार आनंद झाला. सौ. रेखाकडे सर्व त्यांना 'विमलकाकू' म्हणतात. त्यांचे मला वाटते आते मामे भावंडांचे सुहासशी नाते आहे. एखाद्याने संन्यास घेतल्यावर त्यांनी देहत्याग केला तरी त्यांच्या पत्नीस अखंड सौभाग्यवतीच मानतात. ती स्त्री सर्व सौभाग्यालंकार धारण करू शकते. तिला विधवा गणले जात नाही. पू. आठवलेताईंना पाहून मला पू. द्वारकाताई जोशी (सौ. कमल दत्तात्रेय कर्वे) यांची आठवण झाली. प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी समाधी घेतल्यावरही त्या श्रींच्या पुण्यतिथीस गुरुपौर्णिमा उत्सवास येत असत. तेव्हा त्या सुवासिनीच्या वेषातच असत. श्रींच्या त्या प्रथम शिष्या होत्या. त्या भेटल्या की खूप आनंद होई. श्री. प्रज्ञानानंद सरस्वतींचे चरित्र लिहितांना त्यांच्या गृहस्थाश्रमासंबंधी लिहिले आहे. खरोखरच या अशा साध्वींचे जीवन म्हणजे तारेवरची कसरत किंवा तलवारीच्या धारेवरून चालण्यासारखे असते. त्यांचे कष्ट त्याच जाणू शकतात.

* * *

## श्री. द. स. हर्षे

आम्ही ग्रॅंट मेडिकल कॉलेजच्या नवीन जागेत राहावयास गेलो (बिल्डिंग २ मध्ये) तेव्हा आमच्या समोर डॉ. श्रीराम हर्षे (औषध विभाग) राहात होते. त्यांचे वडील श्री. द.स. हर्षे, एम.डी., हे आमच्या ओळखीचे निघाले. ते इस्लामपूरला काही वर्षे राहात होते व माझ्या कै. मामंजीना चांगले ओळखत होते. चि. दत्ताभाऊजींच्या मुंजीच्या आधी त्यांनी आमचा वाडाही रंगवला होता. तोही कै. मामंजीच्या विषयीची कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी. त्यामुळे आम्हांला भेटून त्यांना खूप आनंद झाला व जुन्या आठवणीही जागृत होऊन आत्मीयता वाटू लागली. ते अनेक वर्षे सातारला राहात होते. त्यांनी सरकारी नोकरी सोडून स्वतः टायपिंगचा क्लास काढला होता. ते दोन वेळा तुरुंगवासही भोगून आले होते. सावरकरांचे ते भक्त

होते. सावरकर, सेनापती बापट, का. भा. लिमये यांची अशी काही चरित्रेही त्यांनी लिहिली होती. ते हिंदुत्वनिष्ठ हाते. अत्यंत कष्टाळू, सज्जन आणि विद्वान असून निरभिमानी होते. त्यांच्या पत्नी सौ. सुधाताईही फार हुशार होत्या. पण पुढे त्यांना पार्किन्सन रोग झाला आणि त्यांची दयनीय स्थिती झाली. त्यांची मुलगी सौ. आशा हिने त्यांची चांगली सेवा केली. पण त्यांना ७/८ वर्षापूर्वी देवाज्ञा झाली. श्री. हर्षे आता ९१ वर्षांचे आहेत व शांतपणे जीवन जगत आहेत. त्यांनी २/३ लाख रुपये निरनिराळ्या संस्थांना दानही दिले आहे हे विशेष.

* * *

## श्री. भराडिया गणेशजी व श्री. पुरोहित वगैरे

मालाड येथे प.पू. किशोरजी व्यास यांचा श्रीभागवतसप्ताह १९९० मध्ये आमच्या मंडळासाठी व पुढील वर्षी तेथील माहेश्वरी समाजाच्या वतीने अशी दोन वर्षे लागोपाठ आदर्श दुग्धालय लेनमध्ये भागवतसप्ताह झाला. पहिल्या वर्षी पू. किशोरजी व्यास यांची व्यवस्था एका रिकाम्या ब्लॉकमध्ये राहाण्यासाठी करण्यात आली होती. पण श्री. मदनलाल यांनी आपला एक सेवक त्यांच्या तैनातीसाठी धाडला होता. शिवाय श्री. पुरोहितजी सी.ए. हे त्यांची जातीने स्वत: काळजी घेत होते. पू. किशोरजींना दुपारी कुठे ना कुठे भोजनासाठी आमंत्रण असे. तेथे बरेच वेळा श्री. श्रीरामजी गिल्डांना व मलाही जावे लागे. श्री. पुरोहितांची आई व पत्नी तसेच श्री. गणेशजी भराडियांची आई व पत्नी वगैरे सर्वच माझ्यावर अत्यंत प्रेम करीत असत. ते प्रेम अद्याप टिकून आहे. दुसऱ्या वर्षी तर पू. किशोरजी श्री. भराडियांच्या घरीच उतरले होते. यानंतरही मी जेव्हा जेव्हा मालाडला गेले तेव्हा माझे या दोन्ही घरी माहेरवाशिणीसारखे स्वागत होत असे. आता गेली १०/१२ वर्षे मी कुठे जाऊंच शकत नाही. पण तरी श्री. भराडिया यांच्याशी संपर्क अद्यापपर्यंत टिकून आहे. हे किती आश्चर्यकारक आहे नाहीं का? रामभैय्याची कृपा हेच खरे!

* * *

## श्री. रविंद्र पाटणकर

श्री. श्रीराम गिल्डांच्यामुळे श्री. पाटणकरांची ओळख झाली. ते ठाणे येथे राहातात. त्यांना श्रीरामचरित मानसप्रेमी मंडळाबद्दल खूपच आत्मीयता आहे. कै. श्री. आदिनाथ यांच्याशीही ते सतत संपर्क साधत असत. माझ्या घरीही ते मुद्दाम येऊन गेले. साधी राहाणी उच्च विचारसरणी याचे ते एक उदाहरण आहेत. रामभैय्याच्या कृपेनेच अशा व्यक्तींचा स्नेह लाभत असतो.

* * *

## लातूरची भक्त मंडळी श्री. कर्वाजी, श्री. रांदड, री. बांगड वगैरे

पू. कै. श्रीरामजी गिल्डा यांच्याबरोबर श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळाच्या कामासाठी हिंडत असतां लातूरला गेलो होतो. तेव्हा त्यांचे मामा श्री. कर्वाजी, तसेच त्यांच्या दोन्ही मावशा रांदड, बांगड, त्यांची मुलेबाळे, त्यांचे भाऊ श्याम तसेच निमाणी वगेरेंची ओळख झाली होती. सर्वच मंडळी भगवद्‌भक्त आणि विशेषतः पू. मुरारी बापूंची भक्त होती. चि. जगदीश गिल्डाच्या सासरी श्री. भराडिया यांचेकडेही आम्ही गेलो होतो. तसेच सेलू येथे रेखाच्या माहेरीही माझे राहणे झाले. पू. भाऊंची बहीण जसोदा हिच्याशी तर खूपच संपर्क आला होता. आता अलिकडे मात्र तिची गाठंभेट नाही. कारण गेली १०/१२ वर्षे परंडा व प.पू. स्वामी तेजोमयानंदजींचे दर्शनास फक्त जाणे होते. बाकी चि. सचिन, सौ. आरती शिवाय सहसा कुठे जातच नाही. कारण काठी वा बॅकबेल्टशिवाय उभेही राहाता येत नाही ना?

* * *

## कै. श्री. नरहरी आपटे व परिवार

श्रीसद्‌गुरु प्रज्ञानानंद सरस्वती जेव्हा खेड (हल्लीचे राजगुरुनगर) येथे केदारेश्वर मंदिराच्या शेजारी राहात होते. तेथे त्यांनी गायत्री पुरश्चरण करून नंतर संन्यास ग्रहण केला तेव्हा श्री. नरहरी आपटे तेथे खेड (जि. पुणे) येथेच होते व त्यांना श्रींचा अनुग्रहही मिळाला होता. श्रींनी त्यांना लिहिलेली पत्रे चि. श्रीकांतने जपून ठेवलेली आहेत. त्याने ती मला

दाखवली होती. पुढे ती. आक्का (म्हणजे श्रीकांतच्या आई) श्रीकांत, सौ. स्मिता, सौ. पद्मा दिवेकर व तिचे पती सर्वांनीच श्रींचा अनुग्रह घेतलेला आहे आणि ते निष्ठेने गुरुसेवा व साधना करीत असतात. श्री. श्रीकांत मानससंघ, रामबन येथेही जाऊन आला आणि नंतर त्या सर्वांनी मिळून जयपूरला जाऊन श्रींचे छायाचित्र दाखवून श्रींची मूर्ती बनवून घेतली असून ती परंडा येथील श्रीराम मंदिरात गर्भगृहात (गाभाऱ्यांत) प्राणप्रतिष्ठा करून बसविण्यात आली आहे.

* * *

### श्री. गोपाल कृष्ण घाटे

आम्हांला अनुग्रह मिळण्यापूर्वीच श्री. घाटेकाकांना अनुग्रह मिळाला होता. ह्यांना बरे नसतांना पू. स्वामी आम्हाला चास – कमानला नेण्यासाठी मुंबईला आले होते. तेव्हां प्रथम सायनला श्री. घाटेकाकांच्या घरीं जाऊन मग त्यांना घेऊन आमच्या घरी आले होते. श्री घाटे काका अत्यंत एकनिष्ठ गुरुभक्त होते. मला वाटते त्यांनी गायत्रीपुरश्चरणही केले होते. श्रीसद्गुरु नाशिकला एका चातुर्मासांत होते तेव्हा घाटे काकाही तेथे त्यांच्या सेवेत राहिले होते. सातारला श्रीसद्गुरुनी ९ दिवसात ९ पारायणे हिंदी श्रीरामचरितमानसाची केली तेव्हां श्री. घाटे निश्चित हजर होते. कारण मला एवढे चांगले आठवत आहे. या ९ दिवसांतच एक दिवस गोकुळाष्टमी आली होती. आणि आम्ही सर्व रात्री झोपलो होतो तरी अदालत वाड्यांत जन्माष्टमीच्या रात्री घाटे तळमजल्यावर रात्री नाचत कृष्णभजन करीत जागर करीत होते. हे त्यांनीच मला सांगितले होते. त्यांच्याबद्दल मला फार फार प्रेमादर होता.

* * *

### श्री. ताराबाई जोगळेकर

आम्ही एकावर्षी (१९५२ साल असावे) चासकमान येथे श्रीगुरुपौर्णिमा उत्सवासाठी गेलो होतो. तेव्हा त्यांचा परिचय झाला होता. त्या ज्येष्ठ गुरुभगिनी होत्या व शाळेत शिक्षिका होत्या व प्रसंगी सुईणीचेही काम करत

असे ऐकले होते. त्या एकदा इस्लामपूर येथेही आल्या होत्या पण त्या पू. जोशीकाकांच्या घरी उतरल्या होत्या एवढेच आठवते.

* * *

**श्री. दीपक भागवत**

गीताप्रेस गोरखपुर तर्फे यांची अनेक पुस्तके प्रकाशित झाली आहेत. श्री. जाखोटियानी त्यांना राधाकृष्ण गीता मंदिरात माधवनगर येथे प्रवचनासाठी बोलावले होते. तेव्हा त्यांनी मला भेटण्याची इच्छा व्यक्त केली की श्री. जाखोटियांनाच माझी, त्यांची ओळख करु द्यावी असे वाटले हे माहीत नाही. पण श्री. जाखोटिया त्यांना आमच्या घरी घेऊन आले. त्यामुळे श्रीरामभैय्याच्या कृपेने त्यांचा सत्संग घडला व आनंद झाला.

* * *

**सौ. विद्या सोहोनी**

माझे लेखन सतत सुरू असते. आणि वाल्मीकि रामायणाची प्रत जवळ न ठेवल्याने एकदा पेचप्रसंग उद्‌भवला होता. म्हणून प्रत्येक लेखाची झेरॉक्स प्रत काढायचा निश्चय केला गेला. येथे विजयनगरमध्ये त्याची जवळ सोय नाही. पण सौ. विद्या सोहोनी व तिचे पती यांची गाठ पडल्यावर हा प्रश्न सुटला. ते घरी येऊन लेखन घेऊन जातात आणि परत घरपोच करतात. ती दोघे रामभक्त आहेत व घरी राममूर्ती असून रामनवरात्र होत असते. त्यांचा मुलगा प्रभात हा ही फार गुणी आहे. श्रीराम भैय्याची कृपा त्यांना सतत लाभो हीच सदिच्छा व प्रार्थना आहे.

* * *

**श्री. परांजपे गुरुजी**

आमच्या घरांत नवरात्रांत दरवर्षी सप्तशतीचे दहा पाठ करून घ्यावयाचे असतात. आम्ही मिरज, सांगली भागांत आल्यापासून हे अनुष्ठान श्री. परांजपे गुरुजी अत्यंत – निष्ठेने आणि प्रामाणिकपणे करतात. त्यामुळे त्यांचा परिचय झाला. ते श्रीगुरुचरित्राचे सप्ताहही सर्व नियम पाळून करतात

त्यामुळे ज्यांच्यासाठी त्यांनी श्रीगुरुचरित्र सप्ताहांची अनुष्ठाने केली त्या सर्वांची कार्ये सुफळ संपूर्ण झाली. या काळात अशा प्रकारे अनुष्ठाने करणाऱ्या व्यक्ती दुर्मीळ आहेत. त्यामुळे ते अनेकांच्या आदरास पात्र आहेत. त्यांचे सर्व कुटुंब तसेच मूर्तिकार जोशांचे कुटुंब भगवद्‌भक्त सुसंस्कारित आहे.

* * *

**श्री. ज्येष्ठराज व योगेश**

श्री. ज्येष्ठराज समाजशास्त्रज्ञ डिग्री होल्डर असूनही त्याने वैदिक शिक्षण घेतले आहे. पुण्याला जाऊनही तो मुद्दाम शिक्षण घेऊन आला असून आवाज खडा मधुर असून उत्तम पौरोहित्य करतो. आमच्याकडे श्रावण महिनाभर रोज रुद्राभिषेकाचे अनुष्ठान करतो. तो ते अति उत्तमप्रकारे करतो. यांतच राखी पौर्णिमा येते तेव्हा देवाबरोबर मी त्यालाही बरेच वर्षे राखी बांधत आले आहे. तसेच तो जरीच्या गोफाचे मोठे बंडलही मला आणून देतो. त्याचे मला फार कौतुक वाटते. ८/१० वर्षापूर्वी माझ्या उजव्या मांडीतून असह्य कळा येत कधी कधी तर गोळ्या घेऊनही भागत नसे. तेव्हा श्री. योगेश ताम्हनकर रोज पूजा करण्यास येत असे. तसेच चि.सौ. सुरेखा, रमेश वगैरे सर्व गांवाला गेली तर रात्री तो माझ्या सोबतीसाठी झोपायलाही येई. त्यावेळी मी श्रींच्या हस्तलिखित पोथीवरून हिंदी 'श्रीरामचरितमानसा'ची पारायणे करीत होते. तेव्हां ती १०८ पूर्ण झाल्यावर श्री. योगेश याने रोज थोडी थोडी पाने नेऊन संपूर्ण पोथीचे लॅमिनेशन करून आणले. हे काम त्याने अत्यंत जबाबदारीने आणि सेवावृत्तीने केले. नंतर त्याला नोकरी लागून तो गोव्यास गेला. नंतर त्याचा संबंध आला नाही. पण मला मात्र त्याची आठवण येत असते.

* * *

**श्री. पुरंदरे (जबलपूर)**

प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती श्रीदत्तमूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेसाठी जबलपूर येथे गेले असता श्री. पुरंदरे यांना त्यांचा सहवास घडला व पुढे कृपाही

लाभली. श्री स्वामींचा माधवनगर येथे चातुर्मास झाला तेव्हा श्री. पुरंदरे यांना त्यांची कृपा लाभून ते भावावस्थेत जाऊ लागले. ते श्रीकृष्णभक्त होते. ते श्री. दामलेकाकांचे घरी खोली घेऊनही राहिले होते. तेव्हा श्री. दामले–काकांना त्यांचा बराच सहवास लाभला. त्यांची चांगली प्रगती चालू होती. अगदी शेवटी ते डोंबिवली येथे त्यांच्या मुलाकडे राहात होते. तेव्हा प्रिय भाऊंकडे त्यांचे येणेजाणे होत असे. त्यांच्या मुलालाही अध्यात्माची गोडी होती व त्यास पू. गुळवणी महाराजांचा अनुग्रह होता असे वाटते. मी एकदां त्यांना भेटण्यासाठी त्यांच्या मुलाकडे गेले होते एवढे आठवते. ते एकदाच हे असताना आमच्या घरी येऊन गेले होते. श्रींच्या दर्शनासाठीच अर्थात्!

* * *

## सौ. वर्षा देवकर

मी श्री मधुसूदन सरस्वती यांच्या 'भगवद्‌भक्ति रसायन' या संस्कृत ग्रंथाच्या श्री. जनार्दन पांडेय यांनी केलेल्या हिंदी अनुवादावरून मराठी अनुवाद संपूर्ण केला होता. इतका सुंदर ग्रंथ पण मराठी वाचकांना फारसा माहीत नाही म्हणून तो अनुवाद कुठे तरी प्रकाशित व्हावा अशी इच्छा होती. तेवढ्यांत श्री दासगणू यांची मराठीत ओवीबद्ध 'भावप्रकाशिका' ही टीका बघण्यांत आली. हिंदी अनुवादापेक्षा यात महाराष्ट्रातील उदाहरणे दिलेली आढळली. म्हणून दोन्ही टीकांचा समन्वय करून मराठी गद्य अनुवाद लिहावा असे वाटले. त्याप्रमाणे लिहू लागले. त्याचवेळी 'अवलोकन' चा अंक पाहाण्यात आला. तो 'गीता विशेषांक' होता, की 'उपनिषद्' अंक होता हे आठवत नाही. पण अंक दर्जेदार होता. 'अवलोकन' त्रैमासिक आहे, हेही कळले म्हणून सौ. वर्षा देवकर यांचेशी संपर्क साधून 'भगवद् भक्ति रसायन'संबंधी त्यांना सांगून विचारणा केली व त्यांची अनुमति मिळाल्यावर त्यांच्याकडे लेख धाडले व ते क्रमशः प्रकाशित होत आहेत. मध्ये 'ब्रह्मसूत्रा'वरही विशेषांक निघाला होता. तेव्हाही मी लेख दिला होता. डॉ. वर्षाताईंची प्रत्यक्ष भेट झालेली नाही. पण फोनवरून संपर्क नेहमी असतो. त्या जे कार्य करतात ते पाहून थक्क व्हावयास होते.

* * *

# अमृतानुभव

## अमृतानुभव १

**रविवार, वैशाख शु. १४ शके १८७३ (मे, ता. २०- १९५१)**

आज सोन्याचा दिवस आला. माझे सौभाग्य फळले. या दिवसाचे वर्णन कुठल्या शब्दांत करू? खरोखरच शब्द अपुरे आहेत. नुसती आठवण झाली तरी माझे हृदय भरून येईल.

आज सकाळी ३।। वाजता उठले. ह्यांना उठवून चहा वगैरे दिला. व प्रातर्विधी आटपून, स्नान करून पूजेची सर्व तयारी केली. दोघेही सोवळ्याने पूर्वेकडे तोंड करून स्वामींसमोर आसनावर बसलो. ह्यांनी सर्व पूजा यथासांग केली. त्यावेळी माझे हृदय भरून आले. आज लग्नानंतर आठ वर्षे मला ह्यांच्या शिवाय दुसरा देव ठाऊक नाही. यांच्या एका दृष्टिक्षेपाचे मोल साऱ्या जगापेक्षा शतपटीने मानले. त्यांच्या पावलांचेच मनात सतत ध्यान केले व त्यांच्या कृपेनेच त्यांच्यासह मी आज आमच्या सद्गुरुंची पाद्यपूजा करण्याचा सुखसोहळा अनुभवला. आज माझ्या जन्माचे सार्थक झाले. परमार्थविषयक विचार माझ्या मनात घोळूं लागल्यापासून मी नेहमी देवाला आळवीत आले कीं, देवा कसेही कर मला कष्ट झाले तरी हरकत नाही पण ह्यांच्यावर अनुग्रह कर आणि त्यांना जवळ घे. त्यांच्यासाठी मी देहकष्ट सोशीन. दु:खाचे डोंगर सहन करीन पण माझी येवढी इच्छा पुरी कर. स्वामी यांच्यावर अनुग्रह करतील व यांच्या प्रयत्नाला यश येईल. अशी संध्याकाळी प्लॅंचेटवर श्री पूज्य ब्रह्मानंद व वासुदेवानंद यांच्या संदेशाने मनाला खात्री वाटली.

सकाळी स्वामींनी ॐकाराचा उच्चार करून, मस्तकावर हात ठेवल्यावर मनाला जे समाधान लाभले त्याला उपमाच नाही. मात्र डोके एकदम जड झाले. नंतर स्वामींनी कानांत त्रयोदशाक्षरी राममंत्र सांगितला. त्याच्या तिसऱ्या उच्चाराबरोबर, श्रीराम, सीतामाई व लक्ष्मण यांचे दर्शन घडले तेव्हा मनात असा प्रश्न आला की, श्री हनुमान कसे आले नाहीत? तेव्हा लगेच श्री हनुमान यांनी दर्शन दिले. नंतर स्वामींनी हाताला व पाठीच्या कण्याला स्पर्श केल्याबरोबर संबंध अंगातून विजेचा प्रवाह गेल्यासारखे वाटले. शक्ति भरल्यासारखे वाटले व डोके व कपाळ फार दुखूं लागले. इतक्यात त्यांनी डोक्याभोवती बोटाने स्पर्श केला. त्याबरोबर डोके दुखणे थांबले व चित्त नादावर पूर्ण एकाग्र झाले. याप्रमाणे तासभर सुखाचा अनुभव घेतला, नंतर उठल्यावर स्वामींच्या चरणांवर डोके ठेवले. डोके ठेवल्यावर 'प्रेमभावे तुझे चरण हृदयीं कवळूं' अशी स्थिती झाली व मनाला समाधान झाले. नंतर तीर्थप्रसाद घेऊन कामाला लागले. तरी सारा दिवस जणूं काय डोक्यावर हात ठेवला आहे, असे वाटत होते.

संध्याकाळी परत मारुतीदर्शन झाले. चित्त पूर्ण एकाग्र होऊन हालचाल सर्व बंद झाल्यासारखे वाटले.

**मे २१, सोमवार, वैशाख शु. १५ (शके १८७३)**

आज पण लवकर अभ्यासास बसले. आजही चित्ताची एकाग्रता चांगली झाली. आम्ही अभ्यासास बसलो असतानाच स्वामींनी आज रामायणास सुरुवात केली तेव्हा श्री मारुतिराय रामायणश्रवणास येतातच याची पक्की खूण पटली.

जप स्वामींनी रोज १३०० सांगितला आहे, पण जप करावयास लागले की चित्त जपमय होऊन मोजण्याची शुद्ध राहात नाही. म्हणून स्वामींच्या आज्ञेप्रमाणे अर्धा – पाऊण तास याप्रमाणे दोनदा जप केला.

संध्याकाळी अभ्यासास बसावयाला उशीर झाला. ते दोन ठिकाणी व्हीजिटला गेले होते. त्यांना यावयास उशीर झाला. ७। वाजता बसले. चित्ताची एकाग्रता चांगली झाली होती. मध्येच श्री मारुतिरायांचे दर्शन झाले व त्यांनी पाठीवरून हात फिरवल्यासारखे वाटले. व पाठीच्या मणक्यात बेडूक वर खाली उडया मारीत आहे असे वाटले. ६ वाजता उठले.

## मे २२, मंगळवार (१९५१)

आज मला उठण्यास उशीर झाला व चित्ताची एकाग्रता होऊं लागते न लागते तोच ह्यांची चाहूल लागली. तेव्हा तध्येच उठले व स्नानास पाणी ठेवले आहे असे सांगून परत येऊन बसले. नंतर १/२ पाऊण तास बसले. पण मंत्र व अनाहत ध्वनि दोन्ही एकदम ऐकूं येऊ लागल्याने चित्त कशाला एकाग्र करावे हे समजेना. स्वामींनी शंका निरसन केली. आज एक मोठी संधी गमावली. स्वामींच्या हातात जबरदस्त शक्ति आली होती. पण मी सोवळ्यात आहे याची त्यांना कल्पना नसल्यामुळे व मी मध्येच उठून गेल्यामुळे संधि हुकली. असो. हे त्यावेळीं जवळ असते तर बरे झाले असते.

संध्याकाळी ७.२५ ला अभ्यासाला बसले. ते ९ वाजून १० मिनिटांनी उठले. बैठक बरीच झाली. पाहिल्याने चित्त एकाग्र होऊन पुढील ओळी स्फुरल्या.

***जे मम मानसिं सदा खुपे । ते प्रज्ञानानंदाचिये कृपें ।***
***सद्‌गुरूचे दयाळुत्वें । लुप्त होय स्वानंदी ॥***

इतक्यात चि. रमेशच्या रडण्याचा आवाज कानीं आला तेव्हा एकाग्रता चळली. पण परत मनात विचार आले कीं, पुत्र हा शरीरसंबंधापासून उत्पन्न होतो. मग देहाच्या मलमूत्रादि स्वभावधर्माबद्दल ज्याप्रमाणे मनुष्य अनासक्त असतो त्याप्रमाणे न होतां पुत्राविषयी तो इतका आसक्त का? पण परत मनात विचार आला कीं असे म्हणावे तर सद्‌गुणी पुत्र असल्यास माता पिता कितीही ज्ञानी असली तरी त्यांस देखील आसक्ती उत्पन्न होते. मग सामान्य माता - पित्यांची काय दशा होणार? वरील विचार पण पद्यरूपात आले पण ओळी आता आठवत नाहीत.

एक १०-१५ मिनिटे चित्त विचलित झाले पण नंतर चांगली एकाग्रता झाली. मध्ये किती वेळ तर एका अनाहत ध्वनिखेरीज कांही ऐकूहि येत नव्हते.

## मे २३, बुधवार (१९५१)

आज पण उठण्यास उशीर झाला. तासभर बैठक झाली. चित्ताची एकाग्रता चांगली झाली. आज्ञाचक्रापासून खालपर्यंत सर्व चक्रांचे दर्शन

झाले. एक कंठात, एक हृदयांत, एक नाभिपाशी व त्यांच्या खाली दोन अशी चक्रे स्पष्ट दिसली व वायू सारखा खालून वर, वरून खाली असा स्पष्ट जाणवत होता.

संध्याकाळी ७–७। ला अभ्यासास सुरुवात केली. चित्ताची एकाग्रता चांगली झाली. सहस्रदलकमलात ह्यांच्या व स्वामींच्या पावलांचे ध्यान स्पष्टपणे साध्य झाले व मनाला उत्साह वाटला. अनाहत ध्वनिवर, लक्ष केंद्रित केले त्यामुळे चित्ताची एकाग्रता बरी झाली पण मंत्रोच्चार व ध्वनि यांचा मेळ अजून नीट जमला नाही. असो. स्वामींच्या कृपेने अशीच प्रगती व्हावी हीच प्रार्थना आहे.

## मे २४, गुरूवार (१९५१)

आजहि उठण्यास उशीर झाला. गणपतीचे दर्शन झाले. चक्रांचे दर्शन होते पण व्हावे तसे स्पष्ट कां बरे होत नाही? सोऽहम् असा ध्वनि अधूनमधून ऐकू येतो. काही वेळाने बाहेरील सर्व आवाज बंद झाले व मनात अशी जाणीव झाली की देह म्हणजे मी नव्हे, आपण देहातून वेगळे आहोत.(लिंग देहाचे दर्शन)

संध्याकाळी चित्ताची एकाग्रता बरी झाली. श्रीराम धनुर्धारी पण एकदाच असे दर्शन झाले. मनास वाटले की, सीता कोठे आहे, तोंच श्री मारुतिराय – जे आपली छाती विदीर्ण करून त्यांत सीता – राम असल्याची खात्री देत आहेत – असे दिसले व हृदय भरून आले. सोऽहम् ऐकू न आल्यामुळे परत जरा चित्त विचलित झाले.

## मे २५, शुक्रवार (१९५१)

आज ३।। लाच उठले. ह्यांना पण आज लवकरच उठविले. स्वामींनी आज यांना दीक्षा – स्पर्श करून माझ्यावर फारच कृपा केली. त्यांनाही स्पर्शाबरोबर नवीन अनुभव येऊं लागले. माझे आज डोके फारच दुखू लागले. तास सव्वातास बैठक झाली. पण अगदी डोके फुटणार काय असे वाटूं लागले. पण गुरुमहिमा आगध आहे हेच खरे. अभ्यासानंतर पादवंदन करताना स्वामींनी डोक्याभोवती बोटाने स्पर्श केल्या बरोबर डोके एकदम थांबले, मला सानदांश्चर्य वाटले.

संध्याकाळी डोके फारच कमी दुखले पण बैठक ४५ – ५० मिनीटे झाली. ध्वनीवर चित्त चांगले एकाग्र होते. देहाचे भान नाहींसे होते.

## मे २६, शनिवार

आज ५। ला ध्यानास बसले. पण १५.२० मिनिटे डाव्या कानात काही चमत्कारिक आवाज येऊं लागल्याने चित्त एकाग्र होईना. नंतर मात्र उजव्या कानातील आवाजावर लक्ष दिले तेव्हा चित्त स्थिर झाले आज पण डोके फारसे दुखले नाही.

आज ७ वाजता ध्यानास बसले. तासभर बैठक झाली. आज सोहम् ध्वनि स्पष्ट कानात ऐकू येत होता. परत डोके फारच दुखू लागले. अगदी असह्य वाटू लागले. वाटले, हे आता सहन होत नाही. उठून जावे. पण उठता येते कोठे? ध्वनि फारच मंजूळ स्पष्ट व अखंड ऐकू येतो. त्यामुळे मनाला फारच समाधान वाटत आहे.

## मे २७, रविवार

आज ६। वाजता अभ्यासास बसले. फार वेळ बसले नाही. अर्धा तासाने उठले. सहस्रदल कमलात श्री पूज्य स्वामींचे स्पष्ट दर्शन झाले.

संध्याकाळी अभ्यासास बसले. आज सोहम् शब्द स्पष्ट ऐकूं येत होता. चित्त एकाग्र झाले होते. पण बाहेरील गडबडीमुळे लवकर उठावे लागले.

## मे २८, सोमवार (१९५१)

आज ५।। वाजता अभ्यासास बसले. आज मध्येच ॐकाराचा स्पष्ट पण थांबून थांबून उच्चार एकूं येत होता. डोक्यातील प्राणवायूच्या चकरा आता थांबल्या असून एकाच जागीं फक्त वेदना होतात, आज बैठक तास सव्वा तास झाली.

सकाळप्रमाणेच संध्याकाळी.

## मे २९, मंगळवार (१९५१)

आज ५।। वाजता अभ्यासास बसले. कालच्या प्रमाणेच अनुभव. आता मात्र डोळे असह्य दुखले.

संध्याकाळी श्रीमारुतिरायांचे दर्शन झाले– तशी मनात विचार आला

की श्रीरामचंद्रांचे दर्शन रोज न होता हनुमानाचे का बरे व्हावे? हा विचार येण्याबरोबर श्री पूज्य स्वामींचे दर्शन झाले व हसून सांगितले की हे आणि ते काही दोन नाहीत. तेव्हा अतिशय समाधान वाटले.

### मे ३०, बुधवार (१९५१)

कालच्याप्रमाणे डोके भयंकर दुखले. त्यामुळे लवकर उठावे लागले. संध्याकाळी श्रीरामचंद्राच्या चरणकमलांचे दर्शन झाले. नीलवर्ण पाउले व कडेने अरुणासारखी लाली असलेली पाउले अत्यंत तेजः पुंज दिसत होती. बैठक फार वेळ होत नाही. ४०.४५ मिनिटेच होते.

### मे ३१, गुरूवार (१९५१)

आज पण डोके फारच दुखले, त्यामुळे लवकर उठावे लागले. संध्याकाळी चांगली दीडतास बैठक झाली व चित्त अत्यंत एकाग्र झाले. मात्र डोके फारच दुखत होते. त्याच वेळी सबंध शरीरात एक प्रकारची शक्ति प्रवेश करत आहे असे जाणवले व त्यामुळे वृत्ति काही उतरेना. आज पाठीच्या कण्यातून बेडकाने उड्या मारण्याप्रमाणे वायूची गति होती व ॐ कार स्पष्ट ऐकू येत होता. पूज्य स्वामींच्या सांनिध्याचा प्रभाव!

### जुन १, शुक्रवार (१९५१)

आज सकाळी पण अभ्यास चांगला जमला. मात्र डोके असह्य दुखले. पूज्य स्वामींनी कमंडलूतील तीर्थ दिले ते डोक्यावर थापल्यावर थोड्या वेळाने डोके कमी दुखू लागले.

संध्याकाळी पूज्य स्वामीजींना शक्ति फार जागृत झाली आहे, अशी जाणीव झाली म्हणून ध्यानास बसले तेव्हा ह्यांनी त्यांच्या हातास स्पर्श केल्याबरोबर त्यांचा शक्तिपात होऊन ती शक्ती ह्यांना मिळाली. त्यामुळे ह्यांना तेजच तेज दिसूं लागले. माझा अभ्यास बरा झाला. कालच्या प्रमाणेच स्थिती होत होती. त्यांचे केवढे भाग्य!

### शनिवार, ता. २ जून (१९५१)

आज पण तासभर बैठक झाली आणि डोके दुखतेच पण त्याला इलाज नाही. हल्ली पूज्य स्वामीजींची सेवा पोटभर करावयास न मिळाल्याने

मनाला जरा असमाधान वाटत आहे पण स्वामींनी चरणावर डोके ठेवून वंदन करीत असता आईच्या मायेने पाठीवरून हात फिरविल्यावर मन स्वस्थ झाले. **सद्गुरू माउली म्हणतात तेच खरे!**

आज मनात अभ्यासाचे वेळी काही एक विचार वृत्ति न उठल्याने चित्त अत्यंत एकाग्र होउन देहभान विसरले.

संध्याकाळी अभ्यासाला बसल्यावर जे काही आवाज कानांवर आले ते स्वामींनी सांगितल्याप्रमाणे साधक भावनेने ग्रहण केले. त्यामुळे आवाजा-पासून जो त्रास होतो असे वाटले तो होत नव्हता. चित्त चांगले एकाग्र झाले व सोऽहम् असा ध्वनि कानांत सतत ऐकूं येऊ लागला. तो ऐकता ऐकता एकदम अहम् ब्रह्मास्मि अशी वृत्ति उठून अंगावर रोमांच उभे राहिले व कंप सुटला. अशी स्थिती वरचेवर होत होती. श्रीरामचंद्राच्या चरणकमलांचे दर्शन झाले त्यावेळी प्रेमाने हृदय भरून येऊन डोळ्यांत अश्रू उभे राहतात की काय असे वाटले.

## रविवार, ता. ३ जून (१९५१)

आज डोके फारच कमी दुखले. कदाचित् मीठ कमी केल्याचा परिणाम असावा. चित्त चांगले एकाग्र झाले. सोऽहम् सारखे चालू होते.

## सोमवार, ता.४ जून (१९५१)

आज व काल जरा अशक्तपणा वाटत आहे. मीठ सोडल्यामुळे असे होत असावे. अभ्यासास बसल्यावर पहिल्याने थोडा वेळ बसवेल की नाहीं असे वाटत होते. पण एकदा बसल्यावर काही त्रास होत नाही. चित्ताची एकाग्रता चांगली झाली. सोऽहम् चालू होते.

संध्याकाळी अभ्यासाला बसताना मन फारच प्रसन्न होते. आज चित्ताची एकाग्रता इतकी झाली की देहभान मुळीच उरले नाही. काही मिनिटे तर अशी गेली की, मी कोठे आहे.! आजूबाजूला काय चालले आहे किंबहुना मी कोण वगैरे सर्व ज्ञान नष्ट झाले. ॐ कार ऐकता ऐकता माझी स्थिती काय झाली हेच कळेना. जेव्हा मी थोडी भानावर आले त्यावेळी मन आत्यंतिक आनंदाने भरून गेले. प्रथम मनात विचार आला की स्वामींचे

पाय जाऊन घट्ट धरावे. खरोखरच त्यांचीच ही कृपा म्हणून मला या आनंदाचा उपभोग आता मागाहून मिळत आहे. त्या क्षणी तर आनंद ही जाग्यावर नव्हता. आज स्वामींचा जन्मदिवस आहे असे सहज बोलता बोलता स्वामी म्हणाले.

मी आज मनाशी असे ठरविले होते की सगळी मंडळी झोपण्यास गेली की सोवळे नेसून स्वामींचे पादवंदन केल्याशिवाय झोपावयाचे नाही. त्यांच्याबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्याचा दुसरा मार्ग तरी कोणता?

या विचाराने स्वामी आता झोपा जाऊन म्हणून तीन तीनदां म्हणाले तरी मी थांबले होते. आणि आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन डोळे तशी स्थिती झाली आणि स्वामींच्याच कृपेने पूजा, प्रदक्षिणा व पादवंदन सर्वच करण्याची ईश्वराने संधि दिली. त्यामुळे मनाला अतिशय समाधान वाटले. मनाशी प्रार्थना केली की देवा, अशीच मला गुरूसेवा घडूं दे. आज झोपतेवेळी ह्यांचं पादवंदन करतांना तर मन आनंदात मग्न झाले.

### मंगळवार, ता. ५ जून (१९५१)

अभ्यास नेहमीप्रमाणेंच झाला. आज संध्याकाळी पण चित्ताची एकाग्रता चांगली झाली. पण कालच्या सारखे देहभान अजिबात नाहींसे झाले नव्हते. मात्र कान डोळे वगैरे सर्वास आत ओढ लागल्याप्रमाणे वाटूं लागले. ॐ कार स्पष्ट ऐकूं येत होता.

### बुधवार, ता. ६ जून (१९५१)

मंगळवारप्रमाणे आजही अनुभव आले.

### गुरुवार, ता. ७ जून (१९५१)

आज सकाळी बैठक चांगली १ तास झाली. ॐकार स्पष्ट व गोड आवाजात ऐकू येत होता.

शुक्रवार, शनिवार, रविवार, सोमवार, मंगळवार अभ्यास नेहमीप्रमाणे

***ॐकारबिंदुसंयुक्तं नित्यं ध्यायन्ति योगिनः।***
***कामदं मोक्षदं चैव ॐकाराय नमोनमः।।***

## बुधवार, ता. १३ जून (१९५१)

आज अभ्यासास बसल्यावर स्वामींनी नाडी पहाण्याकरिता स्पर्श केल्याबरोबर मोठा विजेचा धक्का बसावा त्याप्रमाणे सर्व शरीरात current गेल्यासारखे झाले. व त्यामुळे किती वेळ उठता येईना. ॐकार स्पष्ट ऐकूं येतो. मानसपूजा आज चांगली झाली. मनाला फारच आनंद उपभोगता येतो.

## गुरूवार, १४ जून (१९५१)

आज सकाळी अभ्यासास बसल्यावर चित्ताची एकाग्रता चांगली झाली. अभ्यास करताना वृत्तीवर येऊन मी डोळे उघडले व जपासाठी म्हणून आता मागे सरकून जरा मागे टेकून बसावे या विचारात होते. सहज समोर दाराकडे दृष्टी गेली आणि त्यावेळी स्वामी दारांत उभे होते. तिकडे पाहिले तो काय अत्यंत दिव्य तेज त्यांच्या मुखकमलाभोवती फाकले होते. ते बघितले आणि माझे नेत्र खरोखरच दिपले. डोळे दिपले असे आपण एखी केव्हांतरी म्हणतो पण त्यांचा खरा अर्थ आज कळला. मी जागच्या जागी खिळल्यासारखी झाले आणि डोळ्यातूंन जणू काही दिव्य तेजाने प्रवेश केल्यासारखे वाटले व वृत्ति परत वर मेंदूपर्यंत चढून अर्धा तास स्वस्थ बसणे भाग पडले.

## शुक्रवार, ता. १५ जून (१९५१)

आज चित्ताची एकाग्रता चांगली झाली. बाहेरचे आवाज अगदी सूक्ष्म ऐकूं येत होते. श्रीरामचंद्राचे स्पष्ट दर्शन दीक्षेनंतर आज २०/२२ दिवसानंतर प्रथमच झाले. त्यामुळे मन प्रसन्न झाले.

आज संध्याकाळी गोष्टी इकडच्या-तिकडच्या चालल्या असतांना, सहज स्वामींच्या जाण्याबद्दल गोष्टी निघाल्या. व ता. २३ शनिवारला आपण येतो असे स्वामींनी पत्र चास ला लिहिल्याचे समजले आणि मला अश्रू आवरेनासे झाले. म्हणून मी तिथून उठून आत निघून गेले. एक एक दिवस जातो आहे स्वामींच्या वास्तव्यातील एक एक दिवस कमी कमी होत आहे या विचाराने मला कांही सुचनासे झाले आहे. गुरुपौर्णिमेला चास

ला जावयाला मिळते की नाही बघावे! जवळ जवळ तीन महिन्यांचा काळ किती चुटकीसरसा गेला, काही समजले नाही. पण आता जाणार कळल्यावर आणखी काही दिवस मुक्काम वाढावा अशी इच्छा उत्पन्न झाली. छे, काय करावे मन अगदी बैचेन झाले आहे.! स्वामी गेल्यावर काय अवस्था होणार? चैन तरी कसे पडणार?

## शनिवार, ता. १६ जून (१९५१)

आज संध्याकाळी सुरवातीलाच झटकन जोराने चालना मिळून प्राण सगळा मेंदूत गोळा झाला व बघतां बघतां देहभान हरपले. कांही मिनिटे अशी गेल्यावर मी भानावर आले आणि माझे मन आनंदाने भरून गेले. घसा दाटून आला व आतल्या आत कंप जाणवू लागला. काही वेळाने शरीराला फारच गती मिळाली व मग अभ्यासातून उठल्यावर आधी सोवळे नेसून जाऊन स्वामींचे पाय घट्ट धरले. गुरु म्हणजे साक्षात परब्रह्मच! किती वेळ पाय धरले तरी पुरे समाधान कसे व्हावे?

## ता. १६ जून ते २३ जून पर्यंत (१९५१)

रोज दोन वेळ अभ्यास – तासभर बैठक होत होती. स्वामींचे क्वचित् मारुतीचे दर्शन. प्राण सगळा रोज मेंदूत गोळा होऊन तिथे स्थिर होतो. ॐ असा ध्वनि सतत ऐकू येतो सोऽहमॐ वृत्ति अगर नुसता आनंदाचा अनुभव सौ. शशी, सौ. वर्षाताई व अप्पा महाराजांच्या दीक्षा प्रसंगी स्वामींचे तेजोमय दर्शन व शक्तिसंचाराची जाणीव.

## जून, ता. २३ (१९५१)

आज सकाळी ह्यांच्या जाग्यावर अभ्यासास बसले. सकाळपेक्षा माझी बैठक संध्याकाळी नेहमी चांगली होते पण आज मात्र चांगली १।।। तास बैठक झाली. स्वामींच्या स्पर्शाचा प्रभाव. स्पर्शाबरोबरच एकदम शक्तीची जाणीव. सर्व प्राण एकवटून टाळूच्या जागी गोळा झाला व अननुभूत अशा आनंदात मन गुंग झाले. मात्र देहभान समूळ नष्ट झाले नाही. पायाच्या व कुत्र्याच्या आवाजाने वृत्तीवर येऊन सारखी खालीवर अशी प्राणवायूची गति चालू होती.

काल श्री सद्गुरूंना पंचामृतस्नान घातले त्यावेळी मनांत आनंद अगदी ओसंडत होता, अशीच सेवा नेहमी घडावी हीच प्रार्थना.

**रविवार, ता. २४ जून (१९५१)**

कालच्या प्रमाणेच आज २ तास बैठक झाली, सकाळी सानंद व संध्याकाळी सोऽहम्।

**सोमवार ता. २५ जून (१९५१)**

*कालच्या प्रमाणेच सोऽहम् ।*

**मंगळवार, ता. २६ जून (१९५१)**

आज पहाटे ५ वाजता अभ्यासास बसले (सानंद) २ तास बैठक झाली.

**बुधवार, ता. २७ जून (१९५१)**

आज पहाटे ५ वा अभ्यासास बसले. श्रीस्वामींनी स्पर्श केल्याबरोबर एकदम काय झाले कोणास ठाऊक? सोहऽम् च्या ऐवजी ॐकार होऊन शेवटी काहीच शिल्लक राहिले नाही. काही मिनिटंच अशी परिस्थिती, नंतर भानावर आले आणि सारखे रोमांच येऊ लागले व कंप सुटू लागला. आनंदाश्रू उभे राहिले व स्वामींच्या पायांवर डोके ठेवल्यावर तर मन आनंदाने भरून गेले व अश्रू अनिवार झाले.

संध्याकाळी पण स्वामींनी स्पर्श केल्याबरोबर सकाळ सारखीच परिस्थिती झाली पण हातापायातील जीव गेल्यासारखे वाटू लागले.

**गुरूवार, ता. २८ जून (१९५१)**

आज स्वामी संध्याकाळी चासला गेले. आज मनास्वास्थ नसल्यामुळे बैठक नीट झाली नाही.

**शुक्रवार व शनिवार (२९/३० जून, १९५१)**

दोन्ही वेळा बसले, परंतु स्वामी होते त्यावेळसारखे काही जमत नाही.

**रविवार, ता. १ जुलै (१९५१)**

आज बैठक चांगली झाली. सानंद स्थिती बराच वेळ होती.

**सोमवार, ता. २ जुलै ते ता. ४ जुलै, बुधवार**

सानंद व सास्मिता यांपैकी स्थिती होती पण स्वामींची उणीव रोज भासते.

**गुरुवार ते शनिवार (३ दिवस)**

जुलै ता. ८ रविवारी संध्याकाळी प्रथम नीट गति येईना. स्वामींच्या स्मरणाबरोबर गति जोरात सुरू होऊन अभ्यास चांगला झाला.

**जुलै ९, सोमवार (१९५१)**

आज स्वामींचे पत्र आल्यामुळे मन प्रसन्न होते त्यामुळे अभ्यास चांगला झाला. स्वामींचे कृपापत्र वाचून काय स्थिती झाली ते एक परमेश्वरच जाणूं शके. डोळ्यांतून अनिवार अश्रू वाहू लागले. अंगावर रोमांच आले. अंग थरथर कापूं लागले. आज बसून स्वामींना पत्र लिहिले.

**जुलै १०, मंगळवार (१९५१)**

सकाळी बैठक चांगली झाली. संध्याकाळी खाडा (मंगला आजारी)

**जुलै ११, बुधवार (१९५१)- पहाटे खाडा (मंगला आजारी)**

संध्याकाळी बैठक फारच चांगली झाली. स्वामींच्या शक्तीची जाणीव.

**जुलै १२, गुरुवार (१९५१)**

पहाटे बैठक फारच चांगली. स्वामींनी पाठीच्या कण्याला स्पर्श केल्यासारखे वाटून मस्तकावर हात ठेवल्यासारखी जाणीव. जवळजवळ निर्विकल्पात जातो की काय असे वाटले. अत्यंत समाधान. आज संध्याकाळी पण बैठक छानच झाली.

**जुलै १३, शुक्रवार (१९५१)**

स्वामींचे कृपापत्र मिळाल्यामुळे आज संध्याकाळी बैठक छान झाली.

**जुलै १४, शनिवार (१९५१)**

सकाळी खाडा (रमेश आजारी) संध्याकाळी त्यांनी प्रणवाचा उच्चार केला त्यामुळे बैठक बरी झाली.

## रविवार, जुलै १५ (१९५१)

सकाळी – त्यांनी प्रणवोच्चार केला. बैठक फारच छान झाली. रमेश फारच आजारी आहे ताप १ – १।। आहे, खोकला सपाटून आहे. व कान फारच ठणकत आहे. दुपारी ३ वाजेपर्यंत फारच तळमळला. मनांत स्वामींची प्रार्थना – चासला जाणे देवाजीच्या मनाला येईना काय? असे वाटले – परत मनात आले की मनात स्वामींच्या दर्शनाची व गुरू पौर्णिमेचा आनंद उपभोगण्याची इच्छा इतकी उत्कट आहे तर स्वामींच्या कृपावाशीर्दाने सर्व ठीक होईल, असे म्हणून मी अनन्य भावाने स्वामींचे स्मरण केले आणि काय आश्चर्य दोन मिनिटांनीच रमेश एकदम मला म्हणाला, 'आई माझा कान दुखावयाचा राहिला' असे म्हणून त्याने त्या दुखऱ्या कानाला हात देखील लावला. १० – १५ मिनिटांनी त्याला दोन – तीनदा कफ ओकून पडला व तापही एकदम कमी आला आणि तो तळमळणारा मुलगा एक १५ – २० मिनीटात खेळूं लागला. (काही एक औषध न देता हा फरक पडला) हे सर्व बघून माझे हृदय स्वामींच्या विषयीच्या पूज्यभावाने व त्यांच्या कृपासामर्थ्यात नुसत्या स्मरणात जे अचाट सामर्थ्य आहे त्या बद्दलच्या आश्चर्याने भरून आले. रामा, तुझी लीला अगाध आहे. मी खरोखर धन्य आहे की ज्या अर्थी मला स्वामींच्या कृपेचा लाभ झाला.

## मंगळवार, ता. १७ जुलै (१९५१)

आज संध्याकाळी ६ ला येथे आलो. संध्याकाळी स्नान करून ध्यानाला बसलो. स्वामींचे दर्शनामुळे व मन प्रसन्न असल्यामुळे बैठक चांगली झाली. पण सास्मिता स्थितीच होती.

## बुधवार, ता. १८ (गुरूपौर्णिमा) (१९५१)

पहाटे ३।।, ४ लाच अभ्यासाला बसलो. आज पण सकाळ संध्याकाळ बैठक चांगली झाली. स्वामींच्या सान्निध्याचा प्रभाव. स्वामींची आरतीच्या वेळची स्थिति बघून हृदय भरून आले. खरोखर आम्ही भाग्यवान म्हणूनच असे सद्गुरू आम्हाला भेटले. आम्ही उभयतांनी षोडशोपचारे पूजा केली. माझी ही मनकामना पूर्ण झाली.

**गुरुवार, दि. १९ जुलै (१९५१)**

आज पहाटे स्वामींनी स्पर्श केल्याबरोबर सगळा प्राण वर खेचल्यासारखे होऊन चित्त एकाग्र झाले व सानंद स्थिती होती.

संध्याकाळी स्पर्श केल्याबरोबर एका पाठोपाठ एक दशावतारांचे दर्शन झाले व नंतर चित्त एकाग्र होऊन निर्विकल्पात जातो की काय असे वाटले, पण सानंद खूप वेळ टिकले होते. आज जप बराच झाला.

**शुक्रवार, ता. २० जुलै (१९५१)**

सकाळी चित्त चांगले एकाग्र झाले होते व सानंद स्थिती होती.

* * *

# अमृतानुभव २

॥ श्रीसद्‌गुरु प्रसन्न ॥

॥ राम ॥

सन १९५१ मध्ये श्रीसद्‌गुरूंचा अनुग्रह मिळाल्यापासून ध्यानावस्थेत ह्यांना व मला भरपूर अनुभव आले. ह्यांना आलेले अनुभव ह्यांच्या विषयीच्या माहितीत लिहिले गेले आहेत. माझ्या अनुभवांचाही उल्लेख काही ठिकाणी आला आहे. पण ध्यानावस्थेत, भावावेशांत जे काही अनुभव आले त्यांना किती महत्त्व द्यावे असा मला नेहमी प्रश्न पडत असे. म्हणून मी एकदां प.पू. रामसुखदासजीना माझे स्वप्न कळवून विचारले होते की, 'अशा अनुभवांना काही महत्त्व आहे का?' तेव्हा ते म्हणाले की 'यह भगवानकी कृपा है।' भगवान् का सपना सच्चा होता है (क्योंकि भगवान् सत है उनमें स्वप्न जाग्रत आदि नहीं है, जो है वो सत् ही सत् है। श्री स्वामीजी महाराज स्वप्न सुनकर खुश हुए । प्रेमसे हँसने लगे ।' असे पू. डुंगरदासजीनी पत्रांत लिहिले होते. भावावस्थेत आकाशांत देवांच्या विमानांची दाटी दिसे, श्रीगणेश मला अथवा भक्तांना सोंडेने गोंजारत आहेत असे दिसे. शिवजी स्नान करून भस्मलेपन करतात, सर्पांची भूषणे, रुद्राक्ष धारण करीत आहेत असे दिसत असे. भरतभैय्या कधी कधी घोड्यावर स्वार होऊन येतांना दिसत. सीतेचा भाव (अशोक वनांतील) आला असतां 'कपर कुरंगा पाठी धावत जाणारे रामच दिसत असत. तसेच एकदा सुग्रीवाच्या मांडीवर डोके ठेवून राम झोपले आहेत. विभीषण उजव्या कानांत काही सांगत आहेत. उजवा पाय अंगद व डावा पाय हनुमान चेपत आहेत. राम पडल्या पडल्या हातात बाण घेऊन न्याहाळून पहात आहेत व थोड्या अंतरावर लक्ष्मण वीरासन घालून पहारा देत आहेत असे दिसले होते. गोस्वामीनी अशा ध्यानाची फार प्रशंसा केली आहे हे नंतर ध्यानात आले असो. गोपीभाव नेहमी विरहव्याकुळ गोपींनाच आला. तेव्हा उत्कट प्रेमामुळे जी व्याकुळता येते ती शब्दांत सांगता येत नाही एवढे नक्की. जी प्राकृत प्राणिमात्रांत आढळते. तेथे

असते निष्काम प्रेम, प्रेमासाठी प्रेम केल्याशिवाय राहावतच नाही, म्हणून बिनशर्त प्रेम! असो. पू. स्वामी उपस्थित असतांना तर दिवसच्या दिवस भावावस्थेत जात होते. व्यावहारिक सत्तेचे, जगाचे भानच नसे. असो.

बेळगांवला असतांना मला वाटते १९७१/७२ ची गोष्ट असेल. रात्री स्वप्नांत इतके, सुंदर शिवदर्शन झाले की ते मी अजून विसरू शकत नाही. स्फटिकासारखी शुभ्र मोठी शिळा होती. तिच्यावर शिवजी बसले होते. गौरवर्ण होता. पिंगट रंगाचे केस होते. पण ते पाठीवर मोकळे सोडलेले होते. भालावर चंद्रकला विराजत होती, अगदी बारीक गंगेची धार मागे पडत होती. डोळे कसे होते कुणास ठाऊक पण ते प्रेमाची वृष्टी करीत होते. मला दिसले, मी त्यांच्या जवळ जाऊन त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवले आणि 'चंद्रशेखर पाहि माम् चंद्रशेखर रक्ष माम् ।। असे म्हणू लागले आणि मला एकदम जाग आली तेव्हा मी अंथरुणावर बसलेली होते आणि पुढे डोके टेकून 'चंद्रशेखर पाहि माम् । चंद्रशेखर रक्ष माम् । असे म्हणत होते आणि अंतःकरण इतके भरून आले होते की सांगता येत नाही.

यानंतरही अनेक वेळा स्वप्नांत भगवंताचे नाना रूपात दर्शन झाले. ते त्या त्या वेळी डायरीत लिहूनही ठेवले होते. पण आता त्या डायऱ्या उपलब्ध नाहीत आणि वयोमानामुळे तारखा, सन वगैरे आठवतही नाहीत. पण त्यांतील एक दोन दर्शने पू. नाना गद्रे यांच्या कृपेने आणि बाकी बरीचशी प.पू. स्वामी तेजोमयानंदजींच्या आशीर्वादाने आणि कृपेने झाली आहेत. त्यांतील जी मी कधी विसरूच शकत नाही ती येथे दिली जात आहेत. प. पू. नानांशी संपर्क आल्यावर जी दर्शने घडली त्यांत श्रीगुरुदेव रानडे यांचे दर्शन झाले, ती हकिकत पूर्वी लिहिली गेली आहे. नंतर एकदां स्वप्न पडले की मी रस्त्यांतून चालले होते. इतक्यांत कुणीतरी सांगितले की या रस्त्याने कुणा संताची मिरवणूक येत असल्याने रहदारी दुसऱ्या रस्त्याकडे वळवली आहे, तेव्हा मला वाटले की बघू या तरी कोणा संताची मिरवणूक आहे? म्हणून मी तेथेच कोपऱ्यावर उभी राहिले तर तेवढ्यात ती मिरवणूक जवळ आली. त्यात जे संत मुख्य उत्सवमूर्ती होते ते मला एकदा दांडीत बसलेले दिसले. आणि मुख्य म्हणजे त्यांनी हसून माझ्याकडे पाहिले आणि उजवा हात वर उचलून मला आशीर्वादही दिला. मला जाग

आली. पण ते दृश्य आठवून खूप आनंद झाला. दुसरे दिवशी चि. माधव पर्वते योगायोगाने मला भेटावयास आला होता. तेव्हा मी त्याला स्वप्न सांगून त्या संताचे वर्णनही केले तेव्हा तो म्हणाला, ''हे तर आळंदीच्या श्रीनृसिंह सरस्वती स्वामींचे वर्णन आहे.'' आणि नंतर त्याने मला त्यांचा फोटोही धाडून दिला. तेव्हा मला त्यांची ओळख पटली. त्यावेळी मी पू. नानांच्या आज्ञेवरून पू. स्वामी समर्थ अक्कलकोट यांच्या श्री. हणमंते यांनी लिहिलेल्या इंग्रजी चरित्राचा हिंदी अनुवाद नुकताच पूर्ण केला होता. त्यामुळेच की काय पण पू. स्वामी समर्थांचे शिष्य असलेल्या पू. नृसिंह सरस्वती स्वामी (आळंदी) यांचे दर्शन मला झाले होते!

यानंतर एकदां असे दिसले की मी रस्त्याने जात होते आणि सहज समोर पाहिले तर प.पू. श्रीसद्‌गुरु स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती पुढे रस्त्याने जात आहेत असे दिसले, म्हणून मी धावत जाऊन त्यांना गांठले. पाहिले तर ते तेवढ्यात उजव्या हाताला असलेल्या एका इमारतीत शिरले. त्यांत श्री अवधूत स्वामी वासुदेवानंद सरस्वती ओंडका उशाला घेऊन जमिनीवर एक कुशीवर आमचेकडे तोंड करून झोपलेले दिसले. प.पू. स्वामीनी त्यांना नमस्कार केला तेव्हा त्यांनी हसून आशीर्वाद दिला. तेव्हा मीही गुडघ्यावर बसून डोके टेकून नमस्कार केला, तेव्हा मलाही आशीर्वाद मिळाला. नंतर त्या खोलीच्या डाव्या हाताला आणखी एक खोली दिसली. त्यांत श्रीसद्‌गुरू आणि मी दोघे गेलो. तर तेथेही एका अवधूत स्वामींचे दर्शन झाले. आणि 'दुधाहारी मठ, भोसल्यांचा घाट' असे शब्द ऐकू आले आणि एकदम जाग आली. मग लक्षात आले की ते प.पू. स्वामी त्रिविक्रमानंद सरस्वती असावेत. मग फार आनंद झाला; संपूर्ण गुरुपरंपरेची कृपा आपल्याला लाभली आहे, असे वाटले

यानंतर असे झाले की प.पू. स्वामी तेजोमयानंदजी परंड्यास आले होते. आणि आम्ही त्यांची श्री. महाजन वकीलांच्या घरी वाट पहात होतो. ते आल्यावर सौ. वहिनीनी औक्षण केले आणि ते घरांत आले. उजव्या बाजूच्या खोलीत त्यांच्यासाठी आसन घालून ठेवले होते तेथे येऊन बसले. त्यावेळी त्यांनी जो आदेश दिला तो आपोआप काव्यात व्यक्त झाला आहे. ते काव्यच येथे दिले जात आहे. यावरून सर्व कल्पना येईल.

*आदेश तुझा झाला । आळवी रघुनाथाला ।*
*अनन्य करी भावाला । त्यांचे पदी ।।*
*आठवू नको कोणा । दुजे त्या खपेना ।*
*एकाग्र करी मना । त्यांचे ठायीं ।।*
*त्यांचेच करी ध्यान । त्यास सर्व समर्पण ।*
*फक्त त्याचेच चरण । दृढ धरी ।।*
*तेजोमय गुरुवर्या । हित माझे साधावया ।*
*किती कष्टसी सदया । निरंतर ।।*
*आता पाळीन आदेश । स्मरीन मी अवधेश ।*
*जोवरी तो विश्वेश । प्रकटेना ।*

त्यांनी त्यावेळी म्हटले की मला सुद्धा मध्ये आणू नका. हे ऐकून मात्र मला रडे आवरेना तेव्हा मात्र म्हणाले ''ठीक आहे! मला पत्र लिहीत जा!'' हे ऐकून बरे वाटले. नाहीतर पायाखालची जमीनच सरकल्यासारखे वाटत होते. पण तेव्हापासून रामनामावर खूप भर दिला गेला. दर्शन होवो अथवा न होवो. सतत रामनाम घ्यायचे. अगदी चोखामेळ्या प्रमाणे ते अस्थिपर्यंत पोहोचावे हीच त्यांच्या चरणी प्रार्थना आहे. पण परंडा येथे ही घटना घडल्या नंतर स्वप्नांत भगवद्-दर्शनाचा लाभ अनेक वेळां झाला. त्याबाबत पूज्य श्रीरामसुखदासजींना पत्रांतून जेव्हा जेव्हा मी विचारले होते तेव्हां त्यांना फार आनंद झाला होता आणि त्यांनी म्हटले होते की भगवान् सत्य आहेत आणि त्यांच्याबद्दलचे सर्व सत्य असते. त्यामुळे मला फार आनंद झाला.

एकदा मला स्वप्नात दिसले होते की आम्ही काही भगिनी 'मानस' वाचत होतो. आमच्या डाव्या बाजूस एक सिंहासन होते. ते प्रथम मोकळे होते. मी वाचता वाचता सहज तिकडे पाहिले तर त्यावर हनुमान बसलेले दिसले. तेव्हा मी त्यांना नमस्कार करावा म्हणून रामायण खाली आसनावर ठेवून उठले आणि त्यांच्या दिशेने चालू लागले. तेही सिंहासनावरून उठून माझ्याकडे येऊ लागले. आणि पुढे येता येता ते एकदम उंच उंच वाढू लागले. मी त्यांच्या जवळ पोहोचले आणि चक्क एकदम त्यांना मिठीच मारली. त्यावेळी पाहिले तर त्यांच्या अंगावर सोनेरी केस होते. डोळे पिंगट वर्णाचे होते. मस्तकावर मुकुट होता त्यांत मध्यभागी माणिक जडविलेले

होते. मी मिठी मारली आणि मला एकदम रडूच कोसळले. तशी त्यांनी माझ्या केसावरून थोपटून मला शांत करण्याचा प्रयत्न केला आणि मला एकदम जाग आली. ते त्यांचे रूप मी विसरू शकत नाही.

परत एकदा स्वप्न पाहिले तर त्या खोलीत प्रवेश करीत आहे आणि समोर पाहिले तर त्या खोलीत हनुमान् जमिनीवरच पहुडलेले दिसले. मी तेथे प्रवेश करताच ते माझ्याकडे पाहून म्हणाले की 'धीरज रखना । प्रभु तेरे साथ बोलेंगे, घूमेंगे फिरेंगे ।' हे ऐकून मला इतका आनंद झाला की मी धावत त्यांच्याजवळ गेले आणि त्यांच्या छातीवर डोके ठेवून प्रेमाने आणि आनंदाने अश्रू ढाळू लागले. तेवढ्यात स्वप्नातच मला वाटते की समोर एक दरवाजा होता त्यातून कुणीतरी येत आहे. अशी चाहूल लागली म्हणून मी डोके उचलून नीट उठून दाराकडे पाहू लागले तर तेथे तर कोणीच नव्हते. पण हनुमान मात्र अदृश्य झाले होते. पण त्यांनी आश्वासन दिल्याने मला खूप आनंद झाला होता. मी प. पू. स्वामी तेजोमयानंदजींना हे सर्व पत्रांतून कळवले तेव्हा ते म्हणाले, 'भगवान् तुमच्याशी हिंदीतून बोलतात का?' मी म्हटले 'बोलले तर खरे हिंदीतून! का बोलले ते मला काय माहीत?' असो.

एकदा स्वप्न पडले की सौ. सुरेखा व मी रस्त्याने चाललो होतो बहुतेक मुंबईतील रस्ते असावेत. आम्ही कुठेतरी जाण्यासाठी टॅक्सी पहात होते. टॅक्सी स्टॅंडजवळ आलो तर एक टॅक्सी दिसली. टॅक्सीवाल्याला सौ. सुरेखाने कुठे जायचे ते सांगितले तेव्हा तो म्हणाला या बाईंनाही तिकडेच जायचे आहे बसा तुम्ही पण! तेव्हा सौ. सुरेखा पुढे (ड्रायव्हरच्या) टॅक्सीवाल्याच्या शेजारी बसली आणि मी मागे त्या बाईजवळ बसले तिच्या मांडीवर गोजिरवाणे मूल होते पण मी त्याच्याकडे विशेष लक्ष दिले नाही. मी बसले असतांना ते मूल अधूनमधून माझा पदर ओढत होते पण मी विशेष लक्ष दिले नाही. थोड्या वेळाने आमचे उतरायचे ठिकाण आले तेव्हा आम्ही दोघी उतरलो आणि समोर असलेल्या इमारतीच्या दरवाजांतून मागील बाजूस गेलो. तेथे मध्ये खूप मोठी मोकळी जागा होती. तेथे आलो तर समोरुन ती टॅक्सीत जी महिला होती ती येतांना दिसली; पण ह्यावेळी ती भरजरी वस्त्रात होती आणि मस्तकावर बिंदी वगैरे अलंकार होते.

कडेवर ते गोजिरवाणे मूलही होते. त्याच्या अंगावरही अलंकार होते. ते माझ्याकडे पाहून हसत होते आणि मी त्याच्याकडे पाहातांच त्याने त्याच्या उजव्या हाताचा अंगठा उचलून मला चिडवले. तेव्हां मला वाटले की 'अरे हा तर चक्क अंगठा दाखवून मला चिडवत आहे.' मग हा रामभैय्या तर नसेल ना! इतके मनांत येते तोपर्यंत मला एकदम जाग आली. मग मला चुटपुट वाटू लागली की माझ्या आधी कसे लक्षांत आले नाही! पण एकीकडे त्यांच्या मिश्कील स्वभावाचे कौतुक वाटले व आनंदही झाला.

एकदा स्वप्न पडले की कोणी तरी येऊन सांगत आहे की, 'उद्या सकाळी रामप्रभू तुमच्याकडे न्याहरीसाठी येणार आहेत.' तेव्हा मी घाईघाईने सौ. सुरेखास तो निरोप सांगितला आणि म्हटले की, 'आता काय बेत करू या ते तूं ठरव!' आणि इतक्यांत जाग आली.

एकदां दुपारची झोपले असतां असे दिसले की झोपले होते त्या खोलीतील पडद्यामागून कुणीतरी माझ्याकडे पहात आहे. म्हणून मी स्वप्नातच त्या पडद्याजवळ जाऊन पडदा दूर करून पाहिले तर तेथे कुणी नव्हते पण माझ्यामागे मला कुणाची तरी चाहूल लागली म्हणून वळून पाहिले तर मागे कुणी नव्हते पण परत पडद्याच्या मागे कुणीहरी उभे आहे असे जाणवले. असे दोनतीनदां झाल्यावर मी म्हटले, 'भैय्या! हा काय लपंडाव चालला आहे?' तेव्हा पडद्यामागून हात पुढे आला मी पटकन तो हात पकडला आणि एकदम जाग आली. म्हणजे परत मला चकवा दिलाच होता.

एकदा दिसले की मी गॅलरीत उभी होती आणि समोर पाहिले तर एक देदीप्यमान विमान आकाशांत थांबले होते. त्यातून कुणी एक स्त्री उतरून आमच्या घराकडे येऊ लागली. म्हणून मी जिना उतरून खाली आले. आणि त्या स्त्रीला विचारले की, 'विमानात कोण आहे?' ती म्हणाली, 'रामप्रभू आहेत!' मी म्हटले की, 'काय इतक्या जवळ येऊन मला न भेटताच निघून जात आहेत!' कारण तोपर्यंत ते विमान दूर दूर जात होते. ती स्त्री काहीच बोलली नाही. पण मीच म्हटले 'हरकत नाही, तुम्ही तर रामभैय्याकडूनच आला आहांत ना?' असे म्हणून मी तिलाच मिठी मारली. आणि जाग आली.

तसेच 'चिन्मय चरित मानस' या ग्रंथाचे लेखन ज्या रात्री पूर्ण झाले

त्या रात्री स्वप्नात भगवान् श्रीकृष्णांचे दर्शन झाले होते. प्रथम असे दिसले की मी गॅलरीत उभी आहे. आणि समोरच्या झाडाच्या एका फांदीवर बसून ते बासरी वाजवत आहेत. एवढ्यात ते झाडावरून उतरून आमच्या घराकडे येऊ लागले. मी म्हटले की भगवान् इकडेच येत आहेत कुणीतरी त्यांना खाली दारावर 'ओवाळा' एवढे म्हणते आहे तोवर दिसले की ते वर आले आहेत आणि मुरली वाजवत आहेत. मी त्यांना म्हणू लागले की 'बजाव बजाव मुरली कन्हैय्या' आणि नंतर मला जाग आली. कितीतरी वेळ मी तेच भजन म्हणत होते. मी हे स्वप्न परमपूज्य स्वामी पुरुषोत्तमानंदाना कळवले तेव्हा त्यांनी म्हटले 'यावरून श्रीगुरुदेव व भगवान् श्रीकृष्ण एकच हेच प्रभूंनी तुम्हांला दाखवून दिले आहे.' मला मुरली ऐकून आणि दर्शनाने परमानंद झालाच होता तो द्विगुणित झाला!

याशिवाय एक अनुभव सांगावासा वाटतो आहे. त्यावेळी परंडा येथील उत्सवांतून मिरजेला परत येतांना आम्ही वाटेत पंढरपूरला निदान विठ्ठलाचे मुखदर्शन तरी घ्यावे म्हणून थांबलो होतो. बरोबर मला वाटते की सौ. सुरेखा, चि. रमेश व बहुतेक सुधीरही होता. असे वाटते कोण कोण होते ते आतां आठवत नाही. आम्ही गाडी उभी करून देवळाशी गेलो. बाहेर तुळशीचे हार, फुटाणे वगैरे घेऊन नामदेव पायरीला नमस्कार करून वर देवळांत गेलो. तेथे पायऱ्या चढून गेल्यावर पाहिले तर मुखदर्शनाच्या तेथेही खूप गर्दी होती. तेव्हाही मला बेल्ट आणि काठी लागतच होती. पण आत्तापेक्षा स्थिती बरी होती. असो तेवढ्यांत एक पुजाऱ्यासारखा दिसणारा लांडा पंचा नेसलेला खांद्यावर टॉवेल किंवा उपरणे, फडके टाकलेला तरतरीत सावळा माणूस तेथे आला आणि मला म्हणाला, 'तुम्हांला मुखदर्शन घ्यावयाचे आहे ना?' मी म्हटले, 'हो!' मग त्याने माझ्या पुढे जी माणसे होती त्यांना सर्वांना हाताने बाजूला सारून मला पुढे दारावर नेले आणि म्हणाला, 'हं घ्या आता दर्शन!' तेथून खरेच छान दर्शन झाले, मी दर्शन घेऊन नमस्कार केला. आश्चर्य म्हणजे त्याने सर्वांना बाजूला सारून मला दाराशी नेले त्याला कोणीही विरोध केला नाही. नंतर आम्ही बाजूला झाल्यावर इतरांनी दर्शन घेतले. एवढ्यांत तो मला म्हणाला, 'तो तुळशीचा हार वगैरे द्या मजजवळ, मी आंत जाऊन विठ्ठलाला वाहून प्रसाद घेऊन

येतो. मी माझ्या हातांतील वस्तु त्याच्याजवळ दिल्या व मी तेथेच उभी राहिले बाकीची माझ्या बरोबरची मंडळी रुक्मिणीमातेचे दर्शन घेऊन यावे असा विचार करीत होती. इकडे आमचा विचार-विनिमय सुरू होता तो पर्यंत तो पुजाऱ्यासारखा दिसणारा ब्राह्मण परत बाहेर आला आणि मला म्हणाला, 'हा घ्या तुमचा प्रसाद!' आणि त्याने मला तुळशीचे हाराबरोबर विठ्ठलाला वाहिलेल्या चंदनाच्या गंधाची मोठी गोळी दिली! ती पाहून मला आश्चर्य वाटले.! आतापर्यंत अगदी जवळ जवळ दर्शन झाले तेव्हाही कधी ओल्या गंधाच्या गोळीचा प्रसाद मिळाला नव्हता. नंतर मी बरोबरच्यांना त्याला काही दक्षिणा द्या म्हणून सुचवले आणि मी पायऱ्यावर पाय खाली सोडून बसले. आणि मग एकदा मला वाटले इतक्या थोड्या वेळात तो माणूस विठ्ठलाजवळ जाऊन प्रसाद घेऊन परत माझ्यापर्यंत कसा काय येऊ शकला? आणि तो केशरयुक्त गंधाची गोळी पाहून मी तो परत इकडे तिकडे कुठे दिसेल का म्हणून पाहू लागले तेव्हा तो कुठेच दिसला नाही. तेव्हा मला वाटले की तो श्रीखंड्या तर नसेल? काय असेल ते रामभैय्याच जाणोत! मी 'एकनाथी भागवताच्या दीर्घकाळ अभ्यास केल्यानेही मला तसे वाटले असेल. पण त्यानंतर माझे कधी विठ्ठल मंदिरात जाणे झाले नाही. याप्रमाणे जे ठळक अनुभव आले ते दिले आहेत. २०१२मध्यें ऑक्टोबरमध्ये प.पू. स्वामी तेजोमयानंदजी ऑक्टोबर मध्ये टोप - संभापूर येथे येणार होते. म्हणून मी त्यांना 'चिन्मय विभूति' वर फोन केला की ते केव्हा येणार आहेत आणि टोप संभापूरला दर्शनास केव्हा येऊ? तेव्हा ते म्हणाले 'मी सोमवारी १५ तारखेला संध्याकाळी ६। ६।।च्या दरम्यान तुमच्या घरी येईन व तेथून पुढे बेळगांवला जाईन!' हे ऐकून माझा माझ्या कानांवर विश्वासच बसेना! मी म्हटले 'खरेच का स्वामी? मला इतका आनंद झाला आहे, मी वाट पाहीन!' आणि खरेच दोन दिवसांत मी त्यांना दोनदा फोन करून खात्री करून घेतली! आणि खरोखरच परमपूज्य स्वामी तेजोमयानंद दिनांक १५ ला सोमवारी संध्याकाळी ६।। वाजता आमच्या घरी आले आणि ७ ।। वाजता येथून बेळगांवला जाण्यास निघाले.

मी जेथे रोज बसते तेथे शेजारीच ४ वर्षे त्यांचे छायाचित्र ठेवलेले आहे आणि रोज त्यांची प्रेमाने पूजाही केली जाते. त्यामुळे *'ठायीच बैसोनी करा*

*एक चित्त । आवडी अनंत आळवावा । न लागे सायास जावे वनांतरा । सुखे येतो घरा नारायण ।'* या संतवचनाची प्रचीती आली. जेथे मी त्यांची रामभैय्या भावनेने पूजा करीत होते त्या जागीं ते स्वत: येऊन कधी बसतील असे स्वप्नांतही वाटले नव्हते! म्हणून रामभैय्याच आले असे वाटून परमानंद झाला. 'रसो वै स:।' म्हणतात त्याची प्रचीती आली त्यांना राखी बांधली, भरवले, त्यांची दृष्ट काढली. त्यानंतर डोमगांव येथील 'दासबोधा'ची प्रत मिनी साईज भेट दिली. त्यांनाही माझ्यासाठी सिद्धबाटी येथे हनुमंतास महामस्तकाभिषेक झाला तेव्हा माझ्या वतीने अभिषेक, माझ्यासाठी कलश आणि हनुमंताची प्रतिमा आणली होती. त्यांचे निर्हेतुक प्रेम पाहून अंत:करण भरून आले. ते जावयास निघाले तेव्हा काय वाटले हे कसे सांगणार?

नंतर डिसेंबर ९ रविवारी दुपारी जेवून झोपले होते तेव्हां साधारण १॥। वाजता स्वप्नांत रामभैय्याचे दर्शन झाले. देव्हाऱ्यांतून उतरून ते रांगत बाहेर आले असे दिसले. मी म्हटले 'अरे' स्वारी कुठे निघाली आहे? इतक्यात असे दिसले की माझ्या गळ्यात हात टाकून माझ्या गालावर गोबरे गोबरे गाल घासत आहेत. डोळे काळेभोर कमलासारखे विशाल टपोरे दिसले. आणि माझे इतके मुके घेऊ लागले की माझे देहभानच हरपले. मग एकदा जाग आली आणि वाटले की मी त्यांचे मुके घ्यायचे त्याऐवजी त्यांनी माझे इतके मुके घेतले की चेहऱ्यावर कुठली जागाच मोकळी सोडली नाही! प्रेमाचा वर्षाव झाला! तसा तो करावयाचा होता म्हणून बालरूप घेऊन मिठी मारली । अंत:करण इतके भरून आले की अर्धा पाऊण तास रडू आवरेना! पू. स्वामी तेजोमयानंदजीना कधी सांगते असे झाले होते! ४।, ४।। ला फोन केला! त्यांनाही फार आनंद झाला. ॐ शान्ति: शान्ति: शान्ति: म्हणा अशी विनंती केली. त्यांनी तसे म्हटले आणि त्या आनंदात रहाऽ, रमा असे म्हणाले. 'श्रीरामचरितमानसांत उत्तरकांडात कागभुसुंडीनी रामप्रभूंच्या बालरूपाचे वर्णन करून म्हटले आहे की,

***जेहि सुख लागि पुरारि असुभ वेषकृत सिवसुखद ।***
***अवधपुरी नर नारि तेहि सुख महुँ संतत मगन ।।***

*रामचरितमानस उत्तरकांड ८८ (क)*

*सोई सुख लवलेस जिन्ह बारक सपनेहुँ लहेगे ।*
*ते नहिं मनहिं खगेस ब्रह्मसुखहि सज्जन सुमति ।।*

*रामचरितमानस उत्तरकांड ८८ (ख)*

या ओळींचा प्रत्यय आला आणि जीवन धन्य झाल्यासारखे वाटले!

मला असा प्रश्न पडला होता की, मी जे स्वप्नात पाहिले तसे वर्णन कुठेच वाचलेले नाही! आणि इतका प्रेमवर्षाव कसा काय केला? म्हणून मनांत रामभैय्यालाच प्रश्न करीत होते! तेव्हा उत्तर मिळाले की रामभैय्याच्या परमप्रिय स्वामी तेजोमयानंदजीनी जो आशीर्वाद दिला होता की 'करहु बहुत रघुनायक छोहू' तो सार्थ करण्यासाठी त्यांनी इतकी कृपा केली, हे कळल्यावर प.पू. स्वामींच्याबद्दल कृतज्ञतेने अंत:करण सारखेच इतके भरून येत आहे. 'कळसावरती न चढे काम।' त्यामुळे ह्या अनुभवाने सर्व काही भरुन पावले आहे ही पू. स्वामींची व (श्रीसद्‌गुरुरूप) रामभैय्याची कृपा ।

त्यापूर्वी असे झाले होते. नोव्हेंबर मध्ये डॉ. प्रकाश सोमण यांच्याकडून पत्र आले होते की 'श्री ज्ञानेश्वर गुरुकुल' धर्मश्री पुणे यांच्यातर्फे मला पुरस्कार देण्यात येणार असून डिसेंबर २६ ते २८ ला प.पू. स्वामी गोविंददेव गिरि यांचा जयसिंगपूर येथे तीन दिवस कार्यक्रम आहे. तेव्हा तो त्यांच्या हस्ते दिला जाईल. तुम्हांला सोयीस्कर तारीख कळवावी. म्हणून मी. डॉ. रमेश व सौ. सुरेखास विचारून २६ डिसेंबर तारीख कळवली. त्याबद्दल कळल्यावर चि. बाळ चि. सुरेश व चि. सरला यांनी या कार्यक्रमासाठी यावयाचे ठरवले. माझ्या गुरुभगिनींनाही कळल्यावर त्याही ७/८ जणी आल्या होत्या. खरे म्हणजे पू. स्वामी प्रज्ञानानंद (श्रीसद्‌गुरू) 'प्रतिष्ठा सूकरी विष्ठा ।' म्हणत, म्हणून जावयाचे मनात नव्हते. पण प.पू. स्वामी गोविंददेव गिरि यांचे दर्शनाचा योग बरेच वर्षांत आला नव्हता. शिवाय ते आम्हां सर्वांवर इतकी वर्षे निर्हेतुक प्रेमाचा इतका वर्षाव करीत आले आहेत की वर्णन करता येणे शक्य नाही. त्यांना मी श्रीज्ञानेश्वर माऊली अथवा महर्षि वेदव्यासच मानते म्हणून नकार देणे अशक्यच झाले. अनेक वर्षांनंतर दर्शन झाल्याने परमानंद झाला. त्यांनी मानपत्र, मोत्याची माळ ज्ञानेश्वर माऊलीचे पदक असलेली, तसेच श्रीकृष्ण प्रतिमा, शाली देऊन सत्कार

केला व मानधन (दक्षिणा)ही दिले. त्यांचे इतके ऋण आहे की ते कधी फिटणारच नाही. माझ्या प्रकृतीमुळे मला गाडीतून उतरल्यावर खुर्चीत बसवून खुर्ची उचलून व्यासपीठापर्यंत न्यावी लागली व पूज्य स्वामी गोविंददेवजींना खाली उतरून येऊन सत्कार करावा लागला. त्यामुळे खूप संकोच वाटला पण काय करणार? परत खुर्ची उचलून गाडीपर्यंत न्यावी लागली व पू. आचार्यांचे प्रवचन न ऐकतांच तेथून परतावे लागले. हे सर्व माझे बंधु इतके प्रेम करतात!

श्री. भा.वा. सातवळेकर, डॉ. कल्याण काळे व श्री. अजित ठोंबरे यांच्या सहकार्यामुळे 'सत्संगति दुर्लभ संसारा' या पुस्तकाचे प्रकाशनही प.पू. आचार्य स्वामी गोविंददेवजी गिरि यांच्या शुभहस्ते होऊ शकले! रामभैय्याच्या कृपेमुळेच हे सर्व शक्य झाले यात संशय नाही.

नंतर डिसेंबर ३१ ला प.पू. स्वामी तेजोमयानंद यांच्या शुभहस्ते 'चिन्मय विभूती' वरही या पुस्तकाचे प्रकाशन झाले. ही त्यांची परमकृपाच होय. अशा प्रकारे अनुभवामृताचा वर्षाव चालूच असतो.

* * *

# अमृतानुभव ३

।।श्री सद्‌गुरु प्रसन्न ।।

## आठवणी

**कै. श्री. ग. वि. जोशी, मुंबई**

*जो साधुचा अंकित जीव झाला । त्याचा असे भार निरंजनाला ।।*

सन १९४३ चा सुमारास माझा श्री स्वामींशी परिचय झाला व त्याच वेळी त्यांची कृपाही आमचे कुटुंबावर झाली. आचारपालनावर स्वामींचा कटाक्ष होता आणि आमचे घरी तो पाळला जात असल्यामुळे ते मुंबईस आले म्हणजे आमच्या घरी त्यांचा मुक्काम असे. स्वामींच्या प्रेमळ स्वभावामुळे माझी मुले व कुसुम, शांता, या मुलीही बालपणापासून स्वामींच्या आज्ञेचे पालन करीत असत.

१९५१-१९६० चे सुमारास माझा नातू चि. राम, व्हायरस न्युमोनियाने आजारी पडला. उपचार चालूच होते. पण ताप कमी होईना. श्री स्वामींना त्याच्या तब्येतीबद्दल कळवले तेव्हां त्यांनी हनुमान चालिसाचे पाठ करण्यास सांगितले. मुले, नाना, शांता, कुसुम, रोज सांगितल्याप्रमाणे ४२ पाठ करीत. मुलाचा आजार गंभीर आहे. नीट काळजी घ्यायला पाहिजे, व वेळेवर औषध द्यायला पाहिजे असे डॉक्टरांनीही सांगितले होते. त्याप्रमाणे इलाज चालू होता. हनुमान चाळिसाचे पाठ चालू असतांनाच ९ व्या दिवशी रात्री ताप निघून घामाने कपडे व अंथरूण ओले झाले, व त्याचे अंगही थंडगार पडले. घरातील सर्व मंडळी घाबरली. त्याचे अंगास ब्रँडी वगैरे चोळून उष्णता आणण्याचे प्रयत्न चालू केले. कांही वेळाने रामने डोळे उघडले व तो शुद्धीवर आला. नंतर सांगू लागला, ''एक राक्षसासारखा माणूस मला सारखा ओढत होता आणि एक म्हातारा माणूस मला दुसरीकडून ओढू लागला. त्या म्हाताऱ्या माणसाने आपल्या हातातील गदा त्या राक्षसाच्या डोक्यात घातली व तो राक्षस नाहीसा झाला.''

रामची तब्येत थोडी सुधारल्यावर श्री स्वामींना हा अनुभव कळविला तेव्हा ते म्हणाले 'हनुमान चाळिसाच्या पाठाने श्री हनुमंतानेच तुमच्या रामाला वाचविले.'

* * *

## सिद्धि आणि स्वामीजी – श्री. मारुतीराव देशपांडे, सातारा

एकदा श्रीस्वामींशी चर्चा करीत असतां सिद्धीचा विषय निघाला, तेव्हां बोलण्याच्या ओघात श्रीस्वामी म्हणाले की चास –कमानला मुक्काम असतांना मी नदीवर स्नानास जात असे. स्नानानंतर घाट चढून वर आलो की सर्वत्र सुगंध पसरत असे पण या सुवासाची कल्पना आम्हांस नव्हती. एके दिवशी कांही माणसे, 'काय संन्याशाचा रुबाब पहा, वासाचे साबण व अत्तरे यांना लागतात. यांच्या जवळून गेले तरी सुगंधाचा घमघमाट सुटतो.' असे म्हणतांना ऐकले. तेव्हां कल्पना आली व रामरायाची प्रार्थना करून या सिद्धीला दूर घालविले.

तपाने, ईश्वरभक्तीने सर्व सिद्धी प्राप्त होतात पण आत्मज्ञानाच्या मार्गातील ही विघ्नें आहेत हे जाणून त्यांचा उपयोग संत सत्पुरुष करीत नाहीत. पण ईश्वरी इच्छेने केव्हा केव्हां संतांचे हातून चमत्कार होतातही.

सत्पुरुषांची भेट होण्यास सुद्धा योग यावा लागतो. सातारा येथे श्री बाबूराव जोशी यांचेमुळे पुष्कळ जणांना श्री स्वामींच्या अनुग्रहाचा लाभ झाला. श्री. जोशी यांच्या प्रवचनामुळेंच यांचे सद्‌गुरु आहेत तरी कोण अशी उत्सुकता सहजच उत्पन्न झाली. पुढे श्री स्वामीजी हेच साताऱ्यास आले (१९५४) व त्यांची प्रवचने सुरु झाली. ती ऐकणे, मधून मधून निरनिराळ्या आध्यात्मिक विषयावर चर्चा करणे, मानस पारायण करणे, भजनात भाग घेणे, यामुळे स्वामींच्याशी अधिकाधिक परिचय होत गेला. त्यांचेकडून दीक्षा घेण्याची तर इच्छा होती पण त्यांनी कांही अटी घातल्या होत्या त्याची पूर्तता कांही होत नव्हती. त्यामुळे तो कार्यभाग २–३ वर्षे लांबला. व पुढे १९५७ साली इस्लामपूर येथे दीक्षा मिळाली.

दीक्षेच्यावेळी संचार होणे, किंवा इतर कांही बदल वाटला नाही, कांही दिवसांनी स्वामी म्हणाले की, कुंडलिनी जागृत होण्याच्या दृष्टीने सर्व

कांही झालेले आहे. लौकरच ती जागृत होईल. परंतु कित्येक वर्षे गेली तरी तसा कांही अनुभव आला नाही.

श्री स्वामींचे आचरण फार कडक असे व त्याचे काटेकोरपणे पालन इतरांना अशक्यच होई. एकदां अंगात फार ताप असल्यामुळे ते पडून होते. सर्व अंग दुखत होते. रात्री कांही सेवा आपणांस करतां यावी म्हणून मी व श्री. बाबूराव जोशी असे दोघेजण सोवळे नेसून तयार झालो. पण अंथरूण घालणे वगैरे इतर कामाव्यतिरिक्त कांही त्यांनी करू दिले नाही. शरीर स्पर्श करण्यास स्पष्टपणे त्यांनी नकार दिला. कोणतीही सेवा घेतली नाही.

सरस्वती त्यांचे जिव्हाग्री होती हे त्यांच्या वाङ्मयावरून दिसतेच पण बोलताना सुद्धां काव्य, व्युत्पत्ति व शब्दांचा उपयोग इत्यादि गोष्टी प्रत्ययास येत असत.

* * *

## कै. श्री. सौ. वत्सला मुगांवकर, परांडा

श्री स्वामी पहिल्यांदा जेव्हा परांड्यास आले, तेव्हां त्यांचा मुक्काम ज्या देशमुखांच्या वाड्यात होता, तो वाडा भुताने पछाडलेला होता. कित्येक वर्षांत त्या घरांत कोणी राहातच नव्हते श्रींचा मुक्काम तेथे झाल्यावर त्यांनी तेथील मृतात्म्यांना एक विशिष्ट जागा नेमून दिली व बजावले की 'येथील कोणासही त्रास होतां कामा नये.' त्यावर आम्हाला गति द्या व त्यासाठी आमचेकडून कांही सेवा घ्या' असा आग्रह त्यांनी धरला. पण श्रींनी तिकडे लक्ष दिले नाही.

श्री स्वामींची कांही सेवा आपणांस घडावी म्हणून मी माझे सकाळचे कामधाम आटपून स्वामींची वस्त्रें धुण्यास देशमुख वाड्यात जात असे. घरातील कामामुळे एके दिवशी मला नेहमीपेक्षा वाड्यात जाण्यास उशीरच झाला. मी आलेली पाहून स्वामी म्हणाले, 'अग आज पुन्हां कशी काय आलीस? मघाशीच वस्त्रे धुवून गेलीस ना?' तेव्हां मी म्हणाले, की 'अत्ताच तर पहिल्यांदा आले – आज रोजच्यापेक्षा थोडा उशीर झाला खरा. पण हे काय! आज वस्त्रे कोणी येऊन धुतली?' तेव्हां स्वामी म्हणाले की, येथील मंडळीनी येऊन सेवेची संधी साधलीसे दिसते. मग मला उलगडा

झाला की वाड्यातील मृतात्म्यांनी बरोबर वेळ साधून माझ्या रूपाने येऊन स्वामीसेवेचा लाभ घेतला. हे पाहिल्यावर मी आश्चर्याने थक्क झाले.

* * *

### सौ. शशी (जानकी) जोशी, बत्तीस शिराळा

१९४६ साली मी सुमारे १२ वर्षाची असताना, चासला आमच्या गावी पांडुरंगाचे मंदिरात श्री स्वामींचे प्रथमदर्शन झाल्याचे स्मरते. माझ्या वडिलांनी घरून श्रींचे साठी मला कॉफी आणून देण्यास सांगितले.

मी कॉफी आणून दिली व श्रीस्वामींना नमस्कार करून बसले. तेव्हां त्यांनी मला नांव विचारले – मी शशिकला असे नांव सांगताच मला म्हणाले, 'तुझ्या नावाचा अर्थ सांग पाहू!' मी म्हणाले 'शशी म्हणजे चंद्र, व कला म्हणजे प्रभा' त्यावर म्हणाले 'वा छान! बरोबर!' असे म्हणून हंसले व म्हणाले की 'छान चंद्रासारखी तेजस्वी हो बरं!'

पुढे मी जेव्हां प्रथम साडी नेसू लागणार तेव्हां माझ्या भावाने एक नऊवारी पातळ माझ्यासाठी मोठ्या कौतुकाने आणले. पण तो त्याचा चॉकलेटी रंग म्हाताऱ्या बाईस शोभण्यासारखा पाहून मला ते पातळ मुळीच आवडले नाही. मी घडी मोडण्यास मुळीच तयार नव्हते. माझ्या आवडीचे पातळ का आणले नाही? म्हणून मला रुसवा आला होता. घरातील माणसे मला रागावत होती. पण माझाही हट्ट होता. मी ते नेसणार नाही म्हणून रागावून बसले होते. शेवटी ही तक्रार स्वामींचे कानी गेली. तेव्हा स्वामी म्हणाले की शशीला आमचेकडे पाठवा पाहू! तुम्ही कोणीही तिला रागावू नका. मी भीतभीत त्यांचेपुढे गेले. पण श्रींनी अत्यंत प्रेमाने माझ्या रुसव्याचे कारण विचारून घेतले. आणि म्हणाले, 'अग काय एवढी पातळाची गोष्ट घेऊन बसलीस! हे एकच पातळ तुला नेसायचे आहे का? पुढे कितीतरी पातळे मिळतील. फाटतीलही. या एका पातळासाठी रुसतेस? तू मुलगी आहेस. माहेरी आपली सत्ता नसते. तुझ्या नवऱ्याला आम्ही सांगू की हिच्या आवडीप्रमाणे हिला पातळें घेऊन देत जा. आणि तुला तशी मिळतील असा आमचा आशिर्वाद आहे. मग तर झाले ना? जा पाहू नवीन पातळ नेसून नमस्कार करायला ये.'

त्यावेळी त्यांची प्रेमळ मुद्रा मला आजही आठवते. व आपल्यावर त्यांचे केवढे प्रेम होते म्हणून धन्यता वाटते. स्वामी नेहमी म्हणत की, 'वस्त्राप्रावर्णाला फारशी किंमत देऊं नये. हे शरीरसुद्धां नाशिवंत तेथे पातळाला किंमत किती द्यायची?' संत म्हणतात, 'काय पाहसी रे दर्पणी! मुख जळेल सर्पणीं' याचा अर्थ आता समजतो. पण त्या वयांत कसा समजणार!

माझी आणखी एक आठवण म्हणजे स्वामींच्याच सांगण्यावरून माझा विवाह डॉ. विठ्ठल नारायण जोशी यांचेशी ठरल्यावर 'जानकीस वर योग्य सांवळा' असे नेहमी चिडवीत व 'समचरण सरोजं' हा श्लोक म्हणावयास सांगत व त्यात शेवटी 'विठ्ठलं चिंतयामि' असे म्हटले की हंसून टाळी वाजवीत. असे ते लहानाबरोबर लहान होऊन मिष्किलपणे थट्टा करीत.

* * *

## डॉ. वि. ना. जोशी, बत्तीस शिराळा

१९४८ साली मी रा. स्व. संघाचा सक्रिय सदस्य होतो. सर-संघचालकांनी सत्याग्रहाचा आदेश दिल्यावर त्यात भाग घेण्यासाठी श्री स्वामींची संमती घेण्यासाठी म्हणून चास कमान येथे त्यांच्या दर्शनास गेलो. सत्याग्रहात भाग घेणार आहे असे सांगितल्यावर ते म्हणाले, ''इच्छा चांगली आहे, पण विचार कर की, 'वडील स्वार्थत्याग करून तुझे शिक्षण करीत आहेत आणि तू सत्याग्रहात गेलास म्हणजे शिक्षण अर्धवट राहून त्यांचे पैसे व श्रम फुकट गेल्यासारखे होतील.''

त्यावर मी म्हटले की, 'परीक्षेस आतां थोडाच अवधी राहिला आहे व माझी मन:स्थिती परीक्षेस बसण्यासारखी नाही', असे स्पष्ट केल्यावर 'जातोस तर जा' असे सांगितले. सत्याग्रहाचे दिवशी ते स्वत: संघस्थानावर आले होते व त्यांनी सर्वांना निरोप दिला. श्रींचे दर्शन घेऊनच आमचे पथकातील सर्व सत्याग्रही तुरुंगात गेले.

पुढे १० –१५ वर्षांनी शिराळा (जि. सांगली) येथे वैद्यकीय व्यवसायात स्थैर्य आल्यावर घर बांधले, तेव्हां श्रींचे पाय आपल्या घराला लागावेत असे नेहमी वाटे. त्या प्रमाणे एकदां प्रार्थना केल्यावर, 'वृत्ती उठेल तेव्हां येऊ'

असे म्हणाले. एक दिवस अचानक स्वामी आमचे घरी आले. त्यांच्या आगमनाने आम्हांस अतिशय आनंद झाला आणि काय करावे हे सुचेना. तेव्हां स्वामींनीच वास्तुपुरुषाच्या शेजारी आसन घाल असे सांगितले त्याप्रमाणे केल्यावर, 'वास्तु पुरुष शांत आहे सर्व ठीक आहे' असे म्हणाले. मी मुलांना म्हणालो की, 'श्रींना साष्टांग नमस्कार घाला.' तेव्हां श्री स्वामी हंसत हंसत म्हणाले की 'आई वडील करतील त्या प्रमाणे मुले वागतील' हे ऐकून मी खजिल झालो व आम्हीं पति पत्नींनी आधी नमस्कार केला. स्वामी आपल्या घरी आले या आनंदात आम्ही उभयता नमस्कार करायचे विसरूनच गेलो होतो.

याच वेळी अचानक एक तरूण वेडी मुलगी आमच्या शेजारची व माहितीची तेथे आली. तिला पाहून स्वामी म्हणाले की हिला ब्रह्मसमंध लागला आहे. हिचे साठी हनुमान चालिसाचे अनुष्ठान केले तर ही बरी होईल, जा. हिच्या वडिलाना बोलावून आण. वडील आल्यानंतर त्यांना स्वामींनी सांगितले की मारुतीच्या देवळांत मुलीला बांधून घालून ओलेत्याने हनुमान चालिसाचे २१ पाठ करा. त्याने काम झाले नाही तर आम्हीं पाहून घेऊ.

यावर मुलीच्या वडिलांनी सांगितले की, 'माझ्याकडून हे पाठ होणार नाहीत.' हे ऐकून स्वामी नंतर म्हणाले, 'की मारुतीच्या देवळाचे उत्पन्न मात्र खात आहेत पण उपासना कांहीच करीत नाही. त्यांची फळे मग अशी भोगावी लागतात.'

* * *

**कै. श्री. काका गुळाणीकर, चास कमान *(यांच्या संबंधीच्या आठवणी – निवेदक सौ. शशी जोशी)***

***जिद्द परमार्थाकडे लावा म्हणजे सार्थक होईल.***

चास कमान येथील श्री. काका गुळाणीकर हे माझे वडील स्वामींचे एक अत्यंत निष्ठावान् शिष्य होते. स्वामींचा परिचय होण्यापूर्वी ते मोरगांवच्या गणपतीची उपासना करीत असत. स्वामींची भेट झाल्यावर त्यांची कुंडली पाहून स्वामींनी त्यांना रामोपासना दिली व यातच तुमचे हित होईल असे सांगितले. काकांचा (माझ्या वडिलांचा) आवाज अत्यंत मधुर होता ते

पहाटेस उठून गोड आवाजात भूपाळ्या, अभंग, प्रार्थना म्हणत असत. श्री स्वामींच्या सान्निध्यामुळे तुलसी रामायणवरही त्यांचे प्रेम जडले व ते नित्य रामायण वाचन करू लागले. श्री रामास रोज त्यांची प्रार्थना असे की, 'अनायासेन मरणं –विना दैन्येन जीवितम्। देहि मे कृपया देव तव भक्तिम निरन्तरम् ।।' आणि खरेखरीच पुढे त्यांना असेच भाग्याचे मरण आले. त्यांची गुरुनिष्ठा एवढी प्रखर होती की केव्हांही श्रींचे दर्शन झाले की ते दंड प्रणाम करीत. श्रींना त्यांनी पाठ कधीच दाखविली नाही. श्रींचेकडे तोंड करून उभे असले की तसेच मागे मागे जाऊन दाराबाहेर पडल्यावर मग तोंड फिरवून चालू लागत.

१९४९ साली एका शनिवारी आरती वगैरे झाल्यानंतर मागील पुढील कांहीच संदर्भ नसतां एकदम स्वामी म्हणाले की 'गुळाणीकर, ना.भा. जोशींच्या डॉ. झालेल्या मुलाला तुमची शशी देऊन टाका.' आणि आमचे काकाही म्हणाले 'बरं आहे. दिली महाराज' 'ब्रह्मवाक्यं जनार्दन:' असे म्हणाले. इतकी त्यांची गुरुनिष्ठा होती. पुढे दोन वर्षांनी डॉ. विठ्ठल ना. जोशी यांचे बरोबर माझा विवाह झाला.

कांही वर्षांनी काका वृद्ध झाले पण त्यांचा नित्यनेम व उपासना चालूच होती. एक दिवस पहाटे उठले. भूपाळ्या, भजन वगैरे म्हणून झाले. व नंतर स्नानास पाणी काढण्यास सांगितले आणि एकाएकी छातीत कळ आली. त्यांनी माझ्या आईला हाक मारली व छातीत कळ येते आहे. 'ॲम्ब्रोकेशन चोळ' म्हणून सांगितले. नंतर कॉटवर उठून बसले व पांढरी घोंगडी दक्षिणेकडे दशा करून घालावयास सांगितली. त्या वेळी कोण काय बोलणार! त्यांनी सांगितल्याप्रमाणे केल्यावर घोंगडीवर स्वत: जाऊन निजले व हे राम! हे राम! असा जप सुरू केला. आई घाबरली तेव्हां 'तू पण नाम घे रडू नकोस' असे म्हणाले. घरातील सर्व मंडळी भोवती बसून भजन करीत असतानाच ते केव्हा गेले हे कळलेच नाही.

'जिद्द परमार्थाकडे लावा, म्हणजे सार्थक होईल' हे श्रींचे वचन खरे ठरले.

* * *

## दृढनिष्ठेने देह सार्थकता

***(कै. श्री. देगांवकर कुलकर्णी**, सातारा यांच्या आठवणी. **निवेदन – सौ. विजया श्रीहरी जोशी**, किर्लोस्करवाडी.)*

माझे वडील दादा देगांवकर सातारला असताना सातारच्या विष्णुमंदिरात श्रींची प्रवचने ऐकून त्यांचेकडे आकृष्ट झाले. सातारा येथे ५४ साली श्रींच्या शिष्यांचा साधक मेळावा भरला होता. तेव्हांपासून ते नित्य स्वामींचे दर्शनास जाऊं लागले. पूर्वीपासूनच त्यांची श्रीगणपती–उपासना सुरू होती पण श्रींनी त्यांना ५५ साली रामोपासना दिली. हा दीक्षाविधि होतांना स्वामींना श्रीगणेशाचा सुंदर भाव आला होता.

श्री स्वामींचे एक ज्येष्ठ शिष्य श्री. ना.भा. जोशी उर्फ जोशी काका यांचा द्वितीय पुत्र सैन्यात नोकरी करीत होता. तो रजेवर सातारला आला असतां श्रींनी माझ्या वडिलांना सांगितले की 'जोशी काकांच्या श्रीहरीशी तुमच्या विजयाचा विवाह करा – सैन्यात असला म्हणून काय झाले? सर्व उत्तम होईल!' त्याप्रमाणे आमचा विवाह झाला.

माझे मोठे दीर डॉ. विठ्ठल ना. जोशी आणि चास कमानचे श्री. काका गुळाणीकर यांची कन्या शशिकला यांचा विवाहही स्वामींच्या सांगण्यावरूनच झाला होता.

माझ्या विवाहानंतर माझ्या मामंजीनीच अनेक स्तोत्रे वगैरे माझ्याकडून पाठ करवून घेतली व मला अध्यात्माची गोडी लावली.

माझ्या वडिलांना चहा–तंबाखूची सवय होती, एकदां परांड्यास ते गुरुपौर्णिमेस गेले असतां स्वामींनी त्यांना बजावले की 'देगांवकर, चहा–तंबाखू सोडलीत तरच या पुढे दर्शनास या'. हे ऐकल्यावर वडिलांनी तेथेच चहा–तंबाखू सोडली व ती कायमचीच.

शेवटी त्यांना कॅन्सर झाला होता. बोलणेही बंद झाले होते. अंतकाळी त्यांनी पाटीवर लिहून दिले की 'मला रामरायाकडून बोलावणे आले आहे माझ्या समोर श्री रामाचा फोटो लावा.' त्याप्रमाणे श्रीरामाकडे पाहतां पाहता रामनामोच्चार करीत शांतपणे त्यांनी देहत्याग केला.

* * *

**श्री. पांडुरंग वडगांवकर, उस्मानाबाद**

उस्मानाबाद जिल्ह्यातील वडगांव सिद्धेश्वर हे आमचे मूळ गांव. १९६६ साली मी परांड्यास असताना मला श्रींचा अनुग्रह मिळाला. मी यथाशक्ति श्रींनी सांगितलेले साधन करीत असे. पुढे १९६८ मध्ये श्री समाधिस्थ झाले व त्या नंतर कुलदेवतेचा जप करण्याची मला आज्ञा झाली. १९७० च्या जानेवारी २६ तारखेस मला अर्धांग वायूचा झटका आला व त्यामुळे माझ्या उजव्या पायात व्यंग आले. त्यामुळे आधाराशिवाय मला नीट चालतां येईना. कांही दिवसांनी एकदा समाधीचे दर्शन घ्यावे म्हणून काठीच्या आधाराने समाधी दर्शनास गेलो. नमस्कारानंतर 'सोड' असा शब्द ऐकू आला. म्हणून मी विचारात पडलो व इकडे तिकडे पाहू लागलो. काही समजेना म्हणून पुन्हां समाधीस नमस्कार केला तेव्हां 'काठी सोड' असा आवाज आला. मी तेथल्या तेथेच माझी काठी सोडून टाकली. व प्रयत्नाने हळू हळू चालत घरी आलो. दुसरे दिवसापासून पायात पुष्कळच फरक पडला व लकवा, चालता न येणे वगैरे सर्वच पीडा नाहीशा झाल्या. ही स्वामींची माझ्यावर केवढी कृपा!

१९७२ साली माझ्या मुलीचे लग्न ठरले. लग्नाची इतर तयारी केली पण हुंड्याच्या रकमेची ठरल्याप्रमाणे सोय होईना. म्हणून चिंतेत होतो. त्या रात्री स्वप्नांत मला स्वामींचे दर्शन झाले. मी त्यांना स्वप्नातच म्हणालो, 'मुलीचे लग्न ठरवून बसलो आहे पण अजून हुंड्याची पूर्तता होत नाही. आपणच काय ते करा.' त्यावर श्री स्वामींनी सांगितले की 'तुझे ते माने चेक आणून देतील त्यात तू भागव' स्वप्नाप्रमाणेच गोष्ट घडली व मुलीचे कार्य पार पडले.

दर अमावस्येस आमच्या वडगाव सिद्धेश्वर येथील पांडुरंगाचे देवळांत भजन, ज्ञानेश्वरी वाचन वगैरे चालते. एका अमावस्येस आम्ही उभयतां मंदिरात गेलो असताना, त्या दिवशी येणारे प्रवचनकार न आल्याने लोकांनी मलाच प्रवचन करण्याचा आग्रह केला मी कधीच प्रवचन वगैरे केलेले नसल्याने माझी मोठीच पंचाईत झाली. पण श्री गुरूंचे नांव घेऊन ज्ञानेश्वरी उघडली व पुढे आलेल्या ओव्यांवर बोलण्यास सुरुवात केली. आणि व्यवस्थितपणे प्रवचन पार पडले. ही स्वामींचीच कृपा.

आता दर अमावस्येस मी तेथे प्रवचन करतो.

* * *

**जो साधूचा अंकित जीव झाला – *जे. एम. दांडेकर,*** *ऑडिटर (मद्रास)*

१९५२ साली मी जेव्हां इस्लामपुरात माझी भाची सौ. कमल वैद्य व डॉ. बाळासाहेब यांचेकडे गेलो होतो तेव्हा मला श्री स्वामींचे प्रथम दर्शन झाले. व त्यांनी मजवर कृपा करून मला अनुग्रह दिला. यथाशक्ति माझे साधन सुरू होते.

१९५९ साली नॉर्थ कोट हॉस्पिटल मुंबई येथे माझ्या गुडघ्याचे ऑपरेशन झाले. मला गोपाळकृष्णाची उपासना स्वामींनी दिली होती. त्यामुळे भगवान श्रीकृष्ण माझ्या गुडघ्याजवळ बसलेले आहेत असा मला अनुभव येत होता आणि घशांतून मधुर स्राव होत होता. यामुळे मी चांगला बरा होणार अशी माझी खात्री झाली. दोन दिवसांनी अवचित श्रीस्वामी मुंबईस हॉस्पिटल मध्ये आले व माझ्या तब्येतीची विचारपूस करून आशिर्वाद देऊन गेले.

* * *

**कै. श्री. माधवराव जोशी, भूम**

बऱ्याच वर्षांपूर्वी मला श्री स्वामीजींचा अनुग्रह मिळालेला आहे. व त्यांच्या आज्ञेप्रमाणे साधन करीत असतो. मला स्वतःला पारमार्थिक अनुभव श्रींच्या कृपेने येत असतात पण ते वैयक्तिक असल्याने शास्त्राप्रमाणे गुप्त ठेवावेत. असे असल्याने न सांगणे बरे.

संसारात अनेक दुःखे भोगावी लागतात पण त्याचाही परिहार सद्‌गुरु कृपेने होतो याचीही प्रचीती खालीलप्रमाणे आली.

मी औसा येथे असताना माझ्या मुलीला बाहेरची बाधा झाली. गुरुचरित्राचे पारायण करणारे एक तलाठी होते त्यांना ही हकिगत सांगितली. त्यांनी सुपारी मंत्रवून दिली व ती मुलीजवळ ठेवण्यास सांगितले. पण ती सुपारी तिने हळूच माझ्या खिशात ठेवली, ती ऑफीसमध्ये माझ्या खाण्यात आली त्या बरोबर घरी मुलगी बेशुद्ध पडली. मला घरून बोलावणे आले.

पाहातो तो मुलीची दांतखिळी बसलेली. मी श्रींचे स्मरण करून हनुमान चालिसाचे पाठ केले. तेव्हां तिची दातखिळी उघडली. मग हा सर्व वृत्तांत श्री स्वामींना कळवला. तेव्हां तिला दर्शनास आण म्हणून आज्ञा झाली. त्या प्रमाणे तिला परांड्यास नेण्याचे ठरवले तर ती बाहेरची बसली. असे दोनदा झाले म्हणून श्रीस्वामींना पत्राने कळवले. तेव्हां तिला स्वामींच्याकडे जायचे आहे, याची कल्पना न देता आणा, असें उत्तर आले. त्या प्रमाणे तिला परांड्यास आणले. आल्यावर आधी गुरुबंधू श्री. घाटे यांचे कडून गायत्रीमंत्राचा जप करविला व तिच्या समोर हनुमान चालिसाचा पाठ केला आणि नंतर तिला घेऊन स्वामींचे दर्शनास गेलो. श्री. स्वामींच्यापुढे मुलीस नेतांच ती बोलू लागली. ''माझे नांव रंगनाथ आहे, आम्ही तिघे आहोत, मी, पत्नी व मुलगा हे झाड घेऊन जाणार.!'' तेव्हां स्वामी म्हणाले की ''लेकरू, आमचे आहे तुम्हास नेता येणार नाही. तुम्हास कांही हवे असेल तर ते आम्ही देऊ, पण ते आम्हांस देता येण्यासारखे असेल तर!'' असे म्हटल्यावर ''आम्हास पुरणपोळीचे जेवण हवे'' असे उत्तर आले. स्वामी म्हणाले, ''ठीक आहे. मुलीला सोडल्यानंतर ते मिळेल.'' यावर ''आम्हीं जेवण मिळाल्याशिवाय जाणार नाही.'' असे म्हटल्यावर स्वामी म्हणाले, ''ठीक आहे. आम्हीही पाहू'' याला उपाय म्हणून मुलीला समोर बसवून रोज १०८ हनुमान चालिसाचे पाठ करा व त्या पाठांचे एकदशांश हवन करा म्हणजे हनुमंत त्रास निवारण करतील. असे स्वामींनी सांगितले. त्याप्रमाणे अनुष्ठान वगैरे झाल्यानंतर मुलीचा त्रास कायमचा बंद झाला.

मी रेव्हेन्यू खात्यात उस्मानाबाद येथे नोकरी करीत असतां श्री. स्वामी व श्री. बाबूकाका जोशी यांची तेथील राममंदिरात प्रवचने होत असत. स्वामींचा तेथील मुक्काम हलल्यावर आम्हां कांही मंडळींना श्रीरामचरितमानसाचे नवाह पारायण करण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणे पारायणाचा ४ था दिवस चालू असतां गुलबर्ग्याहून माझा मुलगा अनंतराव टॉईफाईडने आजारी आहे व ताबडतोब यावे असा निरोप आला. त्या दिवशीचे पारायण संपताच श्रीरामरायांची व श्रीस्वामी सद्गुरुंची प्रार्थना केली की पारायण अर्धवट सोडून मी येथून जाणार नाही. आपणच माझ्या मुलाची काळजी घ्यावी. ही माझी मनापासून केलेली प्रार्थना स्वामींना

नक्कीच समजली, कारण माझ्या गुलबर्गा येथील आजारी मुलास दुसरे दिवशी पहाटे स्वप्नांत श्री स्वामींचे दर्शन झाले व त्यांनी घाबरू नकोस असे सांगितले. त्याच दिवशी सकाळी ८ वाजता अनंताचा एक मित्र अचानक त्याचे भेटीस गेला, व शुश्रुषा करण्यास कोणीच नाही असे पाहून कॉलेजमधेही न जाता सतत त्याचेजवळ शुश्रुषा करण्यास राहिला. त्याने औषधपाण्याची योग्य व्यवस्था केली. मला उस्मानाबादला तार केली की मी अनंताजवळ आहे, घाबरण्याचे कारण नाही. प्रकृती सुधारते आहे. माझे पारायण चालू असतांनाच ही तार मला मिळाली. समर्थ वचनाप्रमाणे, *'सदा सर्वदा देव सन्नीध आहे। कृपाळूपणे अल्प धारिष्ट पाहे ।।'* याची प्रचीति आली.

लोहारा (ता. उमरगा) येथील श्री. विनायकराव महाजन वकील यांना श्रींनी गायत्री पुरश्चरण करावयास सांगितले होते. त्याप्रमाणे त्यांनी ते यथासांग केले. चातुर्मासानिमित्त स्वामींचा मुक्काम लोहाऱ्यासच होता. पुरश्चरणाची सांगता व गुरुपौर्णिमा ज्या दिवशी होती त्या दिवशी सकाळपासून जोरात पाऊस पडण्याची चिन्हे दिसू लागली. म्हणून स्वामींनी लोहाऱ्याच्या ओढ्यावर आमच्यापैकी एका गुरुबंधूस पाठवून पावसास बंधन घालण्याचा प्रयोग करविला. लोहाऱ्यास पुरश्चरण सांगता समारंभ व व्यास पूजा समारंभ पूर्ण होईपर्यंत पावसाचा एकही थेंब आला नाही. मागून संध्याकाळी पावसास सुरुवात झाली.

पुढे भाद्रपदात स्वामींनी लोहाऱ्याहून उस्मानाबादला जाण्याचे ठरविले हे पावसाचेच दिवस होते. उस्मानाबादला जाण्यासाठी लोहारा ते नळदुर्ग व पुढे नळदुर्ग ते उस्मानाबाद असे जावे लागे. त्यावेळेला लोहारा ते नळदुर्ग अशी बस-सर्व्हिस नव्हती म्हणून श्रींना ट्रकने नेण्याचे ठरले. निघण्याचे ऐनवेळी आकाश पूर्ण अभ्राच्छादित होते, पावसाची चांगलीच चिन्हें होती, भोवतालच्या परिसरात जोराचा पाऊस चालू होता. म्हणून आज जाणे रहित करावे अशी विनायकराव महाजनांनी स्वामींना विनंती केली, तेव्हां स्वामी म्हणाले की उस्मानाबादला आजच जायचे आहे. पावसाचा व्यत्यय आम्हाला येणार नाही. त्याप्रमाणे त्यांनी उस्मानाबादला जाण्यासाठी ट्रक मध्ये पाऊल टाकले. ट्रक सुरू झाला त्यावेळी श्रींनी खिडकीचे बाहेर हात

काढून पावसास हाताने दूर जाण्याची खूण करून सूचना दिली. आणि आश्चर्याची गोष्ट अशी की स्वामींचा ट्रक उस्मानाबादला पोहोचेपर्यंत त्या तेवढ्या ट्रकच्या मार्गात पाऊस पडला नाही. बाकी चोहीकडे पाऊस रस्त्याच्या दोन्ही बाजूसही- पाऊस पडत होता. फक्त पुढच्या मार्गावर पाऊस नव्हता. बरोबर पोचविण्यास गेलेल्या मंडळीना याचे अतिशय आश्चर्य वाटले. आणि संतांच्या सामर्थ्याचा प्रभाव निसर्गावरही कसा चालतो याचा अनुभव मिळाला.

* * *

## ॲड. रघुनाथ राघोजी गरड, उस्मानाबाद

१९६४ सालांत कांही दिवस व पुढे १९६६ च्या मार्चनंतर ६ महिने स्वामींचे वास्तव्य उस्मानाबादला माझे घरी होते. या काळात श्रीरामचरित मानसाची काही पारायणे स्वामींनी केवळ शहाळ्याचे पाण्यावर राहून केली होती.

स्वामींचे वास्तव्य असतांना एक भागवत-सप्ताह माझे घरी झाला. त्यावेळी वाचक श्री हनुमंताचार्य दशम स्कंध वाचत असतांना पिशाच्चांनी त्यांची वाचाच बंद केली. पोथी टाकून वाचक हनुमंताचार्य श्री स्वामींच्याकडे माडीवर गेले. धावत येण्याचे कारण समजतांच स्वामींनी आपल्या कमंडलूतील पाण्याने प्रोक्षण करून पिशाचापासून त्यांचे निवारण केले. त्यानंतर भागवत सप्ताह पुरा झाला. याच काळात बऱ्याच लोकांची पिशाच्चबाधा स्वामींनी दूर केली व कांहीना रोगमुक्त केले. मलाही स्वामी म्हणाले की, 'असे अगदी पीडित झालेले कोणी आले तर द्रव्य न घेतां त्याचा हात पाहून त्याला औषध देत जा म्हणजे लोक बरे होतील.' या आशीर्वादाचा उपयोग करून मी बऱ्याचजणांना रोगमुक्त केले आहे.

स्वामींच्या कृपेने कवित्वस्फूर्ति झाली आणि सुमारे २५० अभंग लिहून झाले. व पुढेही होत राहणार आहेत.

बरेच अध्यात्मिक ग्रंथ वाचनाची आवड म्हणून मी वाचीत असे परंतु ते नीट समजत नसत. आतां स्वामींचे कृपेने त्यातील गूढार्थ उत्तम रीतीने समजतो.

आज माझी सांपत्तिक स्थिति उत्तम आहे हे स्वामींच्याच कृपेचे फळ आहे असे मी समजतो. श्रीस्वामी प्रायोपवेशनास बसल्यानंतर मला बोलावणे आल्यावरून मी परांड्यास गेलो, त्यावेळी स्वामींनी आपल्या हाताने मला वस्त्र व गोमुखी दिली आणि *'हेचि देही हेचि डोळा! पाहे भक्तिचा सोहळा।।'* असा आशीर्वाद दिला.

* * *

## कै. सौ. कमूताई लेले, सातारा

आमचे ज्येष्ठ गुरुबंधू कै. ना.भा. उर्फ बाबूकाका जोशी हे आमच्या सातारच्या कन्याशाळेत शिक्षक होते. ते आपला शिक्षकी व्यवसाय सांभाळून तुलसी रामायणावर प्रवचने करीत असत. मी रोज प्रवचने ऐकायला जात असे त्यामुळे मला या ग्रंथाची गोडी लागली.

१९५४ साली श्री. जोशीकाकांनी सातारा येथे साधक मेळावा भरवला होता. त्यासाठी अनेक ठिकाणची श्रींची अनुग्रहित मंडळी जमली होती. या मेळाव्यास स्वत: श्री स्वामीपण हजर होते. मेळाव्यात स्वामींची सुश्राव्य व भक्तिरसपूर्ण प्रवचने ऐकली. त्यांचा दिनक्रम, त्यांची राहाणी, पाहून विचार मनांत रुजला, व माझे पति नि घरची मंडळी यांची संमति घेऊन मी गुरुमंत्र घेतला. कांही दिवसांनी स्वामी इतरत्र गेले व त्या वर्षी चातुर्मासासाठी पुन्हा सातारला आले. या चातुर्मास काळात श्री स्वामींचा सहवास साताऱ्यातील गुरुबंधु – भगिनींना व इतरही अनेकांना मिळाला. व भक्तीचा निर्भेळ आनंद लुटता आला.

सातारच्या पुरंदरे वाड्यात आम्ही ध्यानाला बसत असू, त्यावेळी अनेक सुंदर अनुभव येत असत, व जपातही गोडी येत असे. जपाचे वेळीही अनेक अनुभव येत. एकदां जपात असे दिसले की सर्व बाजूंनी माझ्या अंगावर ज्वालांच्या लाटाच्या लाटा येत आहेत तेव्हा भीती वाटून डोळे उघडले, आणि हा अनुभव स्वामींना सांगितल्यावर ते म्हणाले की, 'ते निराकार भगवंताचे रूप होते।'

अशीच एकदां जप करीत बसले असताना असे दिसले की खूप मोठ्या समुद्रात दोन फळ्या आहेत व त्या फळ्यांवर मी पाय टाकून तरंगत जात

आहे व घाबरले आहे. तोच एका व्यक्तीने माझा हात धरून एका नावेत मला बसविले. आणि हे सर्व दृश्य नाहीसे झाले. हा अनुभव मी स्वामींना सांगितला, तेव्हा ते म्हणाले की, 'रामनाम हीच ती जोडफळी होती, त्यावर तू बसली होतीस. आणि तुझा हात धरून तुला भक्तिरूपी नावेत बसविले आहे. तेव्हां जप सोडू नको.'

अशा पारमार्थिक अनुभवामुळे नामाची गोडी वाढत गेली. आणि खात्री झाली की पूज्य स्वामींजींच्या सारखे सद्गुरु आपणास लाभले आहेत तेव्हां त्यांच्या कृपेने आपण भवसागर नक्कीच तरून जाणार यात शंका नाही.

ज्यांचे अंतक:रण नुसत्या राम या शब्दानेही भरून येत असे अशा सद्गुरुंचा लाभ मला प.पू. कै. जोशी यांचेमुळेच झाला.

संत अंतर्ज्ञानी कसे असतात आणि आपले मन कसे दोषयुक्त असते याचा एक लहानसा अनुभव सांगण्यासारखा आहे. सवामीजींच्या दर्शनास जी मंडळी येत ती कांही फळे, सुकामेवा, पेढे, खडीसाखर वगैरे ठेवीत. स्वामी हे जिन्नस प्रसाद म्हणून वाटून टाकीत. फक्त काजू तेवढे एका कांचेच्या बरणीत ठेवीत असत. माझ्या मनांत येई की हे स्वत:ही कांही खात नाहीत मग हे काजू फक्त कशासाठी जमवून ठेवतात? एक दिवस हा विचार वरचेवर मनांत घोळायला लागला. त्या दिवशी रात्री ८। ८।। चे सुमारास स्वामींचे पुढे दूध ठेवून मी निघाले तेव्हां स्वामी म्हणाले 'अग कमू हे काजू का साठवून ठेवलेत हे तुला माहीत आहे का? आम्हीं येथून गेल्यावर याचा प्रसाद वाटा' असे म्हणून हंसले.

हे ऐकून मला माझ्या मनातील विचारांची अतिशय लाज वाटली. संतांचे संगतीत असताना आपल्या भावना किती शुद्ध असायला पाहिजेत याची जणुं शिकवणच मिळाली.

स्वामींचे लिखाण चालू असल्यामुळे व्यत्यय नको म्हणून स्वामींनी दर्शन देणे बंद केले होते. आणि त्याचवेळी मी मनांत नेम केला होता की स्वामींचे दर्शन घेतल्याशिवाय पाणी सुद्धां प्यायचे नाही. कांही दिवस गेल्यानंतर स्वामींनी मलाच प्रश्न केला की 'आम्ही दर्शन बंद केले आहे, आणि तुझ्याच बाबतीत दर्शन देणे का घडते? कसला नेम धरून बसली आहेस?'

हे ऐकल्यावर मी नियम सोडला व परत रोज दर्शनाचा हट्ट धरला नाही. प्रभुचित्त ज्यायोगे संकोच पावते ते करणे योग्य नव्हे ही रामायणातील शिकवण आठवली.

एकदां असे झाले की श्री. जोशीकाकांच्या प्रवचनास बसले असता, मधेच स्वामींना दूध देण्याची वेळ झाली म्हणून रात्री ९ चे सुमारास उठले. व दूध घेऊन माडीवर स्वामी होते तेथे गेले. मी मधेच उठून गेलेली पाहून माझ्या सासूबाईही माझ्या मागे गुपचुप आल्या. मी स्वामींचे पुढे दूध ठेवून नमस्कार करून परत निघाले तेव्हां जिन्यातच सासूबाईंना धडक बसली. त्यांना कुतूहल असावे की आपली सून माडीवर एकटी गेल्यावर काय करते! म्हणून त्या आल्या होत्या. मला या संशयाचे दुःख झाले व मी हे स्वामींना सांगितले तेव्हां स्वामी म्हणाले की, ''तुझ्या सासूबाईंचे वागणे बरोबर होते. तरुण मुलगी किंवा सून ही कोठे जाते, काय करते हे पाहणे सासूचे वा आईचे कर्तव्य आहे. त्यांनी केले ते बरोबरच केले.''

माझी मुलगी नीला ६ महिन्यांची असतांना बरेच दिवस आजारी पडली, औषधपाणी चालू होते. सुरुवातीस स्वामींना काही कळवले नव्हते पण तिला उलट्या सुरु झाल्या व तिचे दुखणे वाढले तेव्हां श्री स्वामींना हकिगत कळवली, उलट टपाली उत्तर आले की लहानशी भाकरीची चांदगी करून त्यावर तेल तिखट हळद कुंकवाची चार बोटे, काजळाची ४ बाजूस ४ बोटे असे लावून तिच्यावरून ओवाळून टाक म्हणजे बरे वाटेल. त्या प्रमाणे केल्यावर दुखणे पळाले व ८ दिवसांत मुलगी गुटगुटीत झाली.

एका बाईने श्रींना तिळगुळाचा लाडू दिला. आणि गुप्तदान म्हणून त्यात एक पैसा घातला होता. नेहमींच्या भिक्षेनंतर स्वामींनी तो लाडू तोंडात टाकला तो त्यात पैसा निघाला. तेव्हां ते लगेच माडीवरून खाली आले. खाली सर्वजण जेवायला बसले होते म्हणून ते परत वर गेले. असे एक - दोनदा खाली आलेले पाहून मुलांनी विचारले, की आपणांस कांही हवे आहे का? कारण त्यावेळी मी कामात होते.

दुपारी वर जाऊन चौकशी केली तेव्हां कळले की पैशाचा स्पर्श झाल्यामुळे त्यांना स्नान करण्यास पाणी हवे होते. पण कोणाला त्रास नको म्हणून त्यांनी भस्मस्नानावरच भागवले. * * *

## सौ. सुधा कुलकर्णी, औंध - पुणे

सुरूवातीस जेव्हां श्री स्वामी परांड्यास आले तेव्हां मी लहानच होते. त्यांच्या दर्शनाला जायचे, त्यांनी कांही किरकोळ कामे सांगितली, की ती धावंत पळत जाऊन करायची, यात मोठा आनंद वाटे. स्वामींच्या प्रेमळ स्वभावामुळे नेहमी त्यांच्या भंवती असावे असे वाटे. माझ्या माहेरी, म्हणजे मुंगावकर कुटुंबाला स्वामींचे सांगणे होते की कांदा लसूण खाऊ नका. त्या प्रमाणे आम्ही खात नव्हतो. पण पुढे उन्हाळा आला, उन्हातान्हातून आम्हां मुलीना व इतरांना लांबून पाणी आणावे लागते हे स्वामींनी बघितल्यावर ते म्हणाले, 'मुलींनो आता उन्हाळ्यांत कांदा रोज खात जा. त्यामुळे शरीराला उष्णतेचा त्रास होत नाही.'

यावरून असे दिसते की स्वामी स्वत: जरी शास्त्राला धरून वागत होते तरी इतरांच्या बाबतीत आवश्यकतेप्रमाणे सूट देत होते.

मी मॅट्रीक झाल्यानंतर इंदोर बोर्डाच्या इंटरच्या परिक्षेचा अभ्यास करीत होते. अभ्यासात कांही अडले तर तो विषय स्वामी समजावून सांगत असत पण नेहमी म्हणायचे की कशाला ही खटपट करते आहेस? कशाला परीक्षेस बसते आहेस? पण तरीही मी परीक्षेसाठी इंदूरला जायचे ठरवले. तेव्हां ते म्हणाले की येतांना ओंकारेश्वराचे दर्शन करून ये. स्वामींना बहुधा माझ्या परीक्षेचा रिझल्ट आधीच कळलेला असावा व म्हणूनच ते मला परिक्षेस बसू नको म्हणाले असावे. इंदूरला जायला सोबत मिळेना, प्रवासात गाडीत जागा मिळेना. फारच त्रास झाला आणि शेवटी इतके करूनही मी पास झाले नाही. मग मात्र परीक्षेचा नादच सोडला.

माझ्या लग्नाची खटपट सुरू झाली आणि मला एके ठिकाणी दाखवले. हे स्वामींना कळल्यावर ते म्हणाले 'सुधा तू आतां लवकर सासरी जाणार! उभयतां लग्नानंतर दर्शनाला येऊन जा.' पण पुढे योग असा आला की स्वामी समाधिस्थ झाल्यावर माझा विवाह झाला व आम्हां पतिपत्नींना त्यांच्या समाधिस्थानाचे दर्शन घ्यावे लागले. स्वामींची माझ्यावर कृपा आहेच आहे. माझा धाकटा मुलगा सुमारे ६ महिने सारखा रडत असे. रात्रीं तर अतीच त्रास देत असे. त्याला रस्त्यावर हिंडवावे लागे. मी रडकुंडीस येऊन एकीकडे श्रीं नी दिलेल्या मंत्राचा जप चालू ठेवी.

माझ्याकडे श्री स्वामींचा एक फोटो होता पण तो ट्रंकेतच ठेवून दिला होता. त्याची आठवण झाली व तो फोटो बाहेर लावून त्यांची प्रार्थना केली आणि तेव्हांपासून आश्चर्य म्हणजे मुलाचे रडणें थांबले. आतां घरी कोणी मुले आजारी वगैरे पडली की श्रींचे स्मरण करून तुकडा ओवाळून टाकला की गुण येतो असा माझा अनुभव आहे.

माझ्या मावसभावास नेहमी फिट्स येत. तो एकदा फीट येऊन दगडी पायरीवर पडला. स्वामींना हे कोणीतरी सांगितल्यावर कमंडलूतील पाणी त्याच्यावर शिंपडले व तो उठून बसला. यावर उपाय म्हणून स्वामींनी माझ्या मावशीला शाकंबरी नवरात्र करण्यास सांगितले व त्याची तब्येत उत्तम झाली. व त्याच्या फीट्स कायमच्या बंद झाल्या.

* * *

## कै. श्री. गणेश गंगाधर पुरंदरे, जबलपूर (डोंबिवली)

मी जबलपुरला रेल्वे इंजिनीयरचे ऑफिसात हेडक्लार्क म्हणून असताना १९५३ साली सेवानिवृत्त झालो. निवृत्तीनंतर मी जबलपुरातच राहत होतो. १९५७ च्या सुरूवातीला मी पुण्याला श्री. प. पू. गुळवणी महाराजांचे दर्शनास गेलो होतो. मला कुंडलिनी योगाबद्दल खूपच जिज्ञासा होती. गुळवणी महाराजांकडे बसलो असतां कै. डॉ. भाऊराव वैद्य यांच्या साधुसंतांचा देवयानपंथ या पुस्तकाचा विषय निघाला तेव्हां माझ्या मनांत कुतूहल निर्माण झाले व हे पुस्तक मी विकत घेतले, त्या पुस्तकाच्या नवीन आवृत्तीत डॉ. बा. श्री. वैद्य, (डॉ. भाऊराव वैद्य यांचे चिरंजीव) यांनी श्री.प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती महाराज यांचा अल्प परिचय दिला होता. तो वाचून स्वामी महाराजांचे दर्शन घेण्यास मन आतुर झाले. पण त्यावेळी कांही दर्शनाचा योग नव्हता.

जबलपूर येथे एका भव्य दत्त मंदिराचे बांधकाम चालू होते. व दत्तात्रेयांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा कोणी अधिकारी व्यक्तीकडून करवावी याचा विचार चालू होता. तेथील मंडळींना मी स्वामींजींची माहिती सांगितली. ती ऐकून त्यांनाच प्राणप्रतिष्ठेसाठी बोलवावे असे कार्यकारी मंडळाने ठरविले आणि त्याप्रमाणे स्वामींना पत्र लिहिले.

त्यांच्याकडून होकार आला व प्राणप्रतिष्ठेचा दिवसही निश्चित झाला. स्वामी महाराजांनी इस्लामपूरहून केव्हां निघावे, जबलपुरास कसे कसे व केव्हां यावे वगैरे सर्व योजना ठरली. आम्हापैकी कोणीच स्वामींना अजून प्रत्यक्ष पाहिले नव्हते व शिवाय प्रवासही लांबचा होता, तेव्हां मी समक्ष इस्लामपुरास जावे असे ठरविले. त्या प्रमाणे प्रथम पुण्यास जाऊन इस्लामपुरास पोचलो. तो दिवस चंद्रग्रहणाचा होता व संध्याकाळ झालेली होती.

स्वामींचा जेथे मुक्काम होता तेथे म्हणजे डॉ. वैद्य यांचे घरीच एकदम गेलो. डॉक्टर व त्यांच्या सौभाग्यवती कमाताई यांनी माझे स्वागत केले. विचारपूस केली. थोडी विश्रांती घेतली व नंतर स्वामींनी माडीवर बोलाविल्यावर त्यांच्या दर्शनास गेलो. दर्शन घडतांच स्वामींच्या तेजाने दिपून गेलो. स्वामींनी जबलपूरच्या मंदिराबद्दल वगैरे चौकशी केली, आणि म्हणाले, आज चंद्रग्रहण आहे व वेध लागले आहेत. सकाळपासून तुम्ही प्रवासात आहात तेव्हां तुमचे जेवणाचे कसे काय? तेव्हां मी म्हटले की आज ग्रहण आहे तेव्हां जेवणाची आवश्यकता नाही. तेव्हां कमाताई वैद्य म्हणाल्या, वेध लागले आहेत म्हणून जेवण नको असले तरी दूध व फळे तरी द्या. स्वामींनीही त्यावर मान डोलविली.

नंतर स्वामींनी विचारले की ग्रहण रात्री एक वाजतां लागते आहे व पहाटे ५ ला सुटते आहे, तेव्हां या काळात तुम्ही काय करणार आहांत? मी म्हणालो की जप करीत बसेन. त्यांनतर थोडी विश्रांती घेतली. रात्री एकचे सुमारास कमलाताईंनी मला उठवले. मी स्नान केले व श्रीस्वामींचे खोलीत जाऊन उभा राहिलो. स्वामी म्हणाले जपाला कुठे बसतां? त्यावर मी आपण सांगाल तेथे बसेन असे उत्तर दिले. स्वामी माझ्याकडे पाहात म्हणाले, येथेच माझ्यासमोर आसन घाला. आसन घालून मी जो १ वाजता जपाला बसलो तो पहाटे ५ नंतर स्वामी जेव्हां म्हणाले 'पुरंदरे उठा, ५ वाजून गेले' तेव्हा मी उठलो. ४ तास केव्हां गेले याचा पत्ताच लागला नाही. स्वामीही फार प्रसन्न झालेले दिसले आणि तेव्हांपासून स्वामींनी माझ्यावर कृपा केलेली आहे; मला जवळ केलेले आहे याची खात्री झाली.

स्वामींचा अधिकार फार मोठा होता. त्यांच्या सान्निध्यात ध्यानांत मला अनेक देव देवतांची दर्शने झाली आणि अनेक सुखदायक व सुंदर

असे अनुभव आले.

स्वामी चमत्कार वगैरे करीत नसत पण कुंडलिनीशक्तीवर त्यांचा केवढा ताबा होता, हे सांगण्यासारखे आहे.

एकदा जेवणाच्या पंक्तीत मी डोळे मिटून जो स्तब्ध झालो आणि ध्यानांत गेलो तो ध्यान कांही उतरेना व पंक्तीतील इतरांचेही जेवण माझ्यामुळे थांबले. माडीवर स्वामी होते तेथे कोणीतरी जाऊन हा प्रकार सांगितला. त्याच गृहस्थांना स्वामीं म्हणाले की पुरंदऱ्यांच्या समोर जाऊन 'चंडे! स्वामींनी सांगितले आहे की पुरंदऱ्यांना जेवू दे' असे म्हणा.

हा निरोप माझ्या समोर उच्चारतांच त्यांची आज्ञा कानावर पडताच माझे ध्यान झटकन् उतरले व डोळे उघडले. याचा अर्थ असा की चैतन्यमयी कुंडलिनीला कोणाबरोबर तरी दिलेला निरोप ऐकतांच ती खाली उतरली. कुंडलीनीशक्तीवर केवढा हा अधिकार! हे साधारण काम नाही. असाच प्रयोग स्वामींच्या गैरहजेरीत दुसऱ्या एकाने केला पण उपयोग झाला नाही.

आतां मी वृद्ध झालो आहे, शरीर विकल झाले असले तरी शांति व समाधानाचा लाभ पू. स्वामींनी केलेल्या कृपेमुळे घेत आहे.

* * *

## कै. श्री. बाबूशेट कटारे, चास कमान

*(निवेदन : श्री. लालचंद हिमतमल कटारे)*

१९४५ साली प्रथम स्वामी चासकमानला आले, त्यावेळी त्यांचा मुक्काम गावातील विठ्ठलमंदिरात होता. गावातील एक ओळखीचा पोस्टमन ज्ञानेश्वरभक्त होता. त्याने सांगितले की विठ्ठलमंदिरात एक साधुपुरुष उतरले आहेत, त्यांचे दर्शन करून या! पण मी विशेष लक्ष दिले नाही. पुढे तो पोस्टमन मला रोज विचारी की दर्शन करून आलात का? म्हणून एक दिवस स्वामीजी दुपारी मोकळे असतात असे कळल्यावर दुपारी ४ वाजता मंदिरात गेलो आणि थोडे लांबच एका खांबास टेकून बसलो. गावातले बरेच लोक तेथे होते. त्यात माझ्या परिचयाचे एक वृद्ध शिक्षकही होते. मला देवळात पाहून ते म्हणाले 'तू येथे कसा काय आलास? यांनाही पळवून लावण्याचा विचार आहे की काय?' त्यांनी मला असे म्हणण्याचे कारण

की मी नास्तिक असल्याने गावात कोणी साधू बैरागी आला की त्याची टिंगल करून त्यास खरोखरीच पळवून लावी. देवळात जमलेली मंडळी हळूहळू निघून गेली आणि मी एकटाच राहिलो. स्वामींनी मला जवळ बोलावून माझी चौकशी केली आणि म्हणाले, 'आत्मकल्याणाकरता कांही करता का?' मी म्हटले, 'तसे कांहीही करत नाही. लहानपणी पूजा पाठ करीत होतो, पण आता काही करत नाही. देव आहे असे बरेच जण सांगतात पण तो दिसल्याचे कुणी सांगत नाही' तेव्हां स्वामी हंसत म्हणाले, 'देव पाहाण्याची तुमची इच्छा आहे काय? इच्छा असेल तर मी दाखविण्याचा प्रयत्न करीन, पण मी सांगितलेल्या मार्गाने तुम्हांस जावे लागेल.' यावर मी कांहीच विचार केलेला नव्हता पण रोज स्वामींच्या दर्शनास जाण्यास सुरुवात केली. मग हळू हळू त्यांच्या सांगण्याप्रमाणे देवपूजा करू लागलो. संध्याकाळी धुपारती करू लागलो, आपणहूनच स्वामींसाठी दूध घेऊन जाऊ लागलो. असे सुमारे वर्षभर चालू होते. त्यानंतर स्वामींनी मला गावातील देवळे, दररोज एकएक देऊन, या प्रमाणें झाडून येण्यास सांगितले. अशी कनिष्ठ सेवा करून घेतली. तसेच गावातील उत्सवप्रसंगी पडेल ते काम ईश्वरसेवा म्हणून कर असेही ते म्हणाले. २ वर्षानंतर गावाच्या जवळ असलेल्या गणेश गिरीवर स्वामी रहाण्यास गेले. तेथे ते फळावर व दुधावरच राहात. क्वचित् भिक्षेसाठी गावात येत. त्या ठिकाणी ते एकटेच राहात व जवळच्या भुयारात झोपत असत. त्या भुयाराला दार नव्हते. तेव्हां मी एक सुतार नेऊन दार करविले. तेथेही अनेक मंडळी स्वामींचे दर्शनास जात असत. याच गणेश गिरीवर मला अनुग्रह मिळाला स्वामींनी माझ्या मस्तकावर हात ठेवला. त्या वेळी माझे ध्यान लागले आणि बालकृष्णाचे दर्शन होऊन त्यातच मी तल्लीन झालो. सुमारे १/२ तास मी त्या आनंदात होतो. हा अनुभव मी स्वामींना सांगितला तेव्हां त्यांनाही फार आनंद झाला.

याच गावात माझ्या घरात मोठी चोरी झाली आणि सुमारे ३०००० रू. चा ऐवज चोरीस गेला. श्रींना ही गोष्ट सांगितली व त्यांच्या आशीर्वादाने महिनाभराने चोरी सापडली आणि नुकसान टळले. सर्व शिष्यमंडळीत मी एक खोडकर शिष्य म्हणून प्रसिद्ध होतो. पण स्वामींचे माझ्यावर खूपच प्रेम होते. स्वामींच्या कृपेने सर्व व्यवस्थित चाललेले आहे. * * *

## सौ. पद्मा विनायक पारखी, पुणे

श्री. ना. भा. जोशी उर्फ बाबूकाका हे माझे वडील. मी १०–११ वर्षांची असतांना स्वामी कुंडलला आमचे घरी आलेले होते तेव्हां मी त्यांना पाहिले. त्यावेळी मला विशेष कांही समजत नव्हते. वडिलांच्या सांगण्यावरून रोज त्यांना नमस्कार करीत असे. एक दिवस माझ्या वडिलांनी मला सांगितले की स्वामींच्या जवळ जा, आणि त्यांना म्हण की माझ्यावर अनुग्रह करा. त्याप्रमाणे मी स्वामींना सांगितले तेव्हां स्वामीं हंसून म्हणाले की तुला बाबूने पढविलेले दिसते आहे! तुला प्रश्न विचारतो, पास झालीस तर अनुग्रह मिळेल. त्यांनी प्रश्न विचारले की सगळ्यांत पहिल्यांदा कोणाला नमस्कार करशील? मग कोणाला करशील? सांग पाहू.

मी म्हणाले 'पहिल्याने आईला मग वडिलांना मग गुरूंना आणि शेवटी देव!' हे ऐकून स्वामी म्हणाले 'परिक्षेत पास' आणि त्यांनतर दुसरे दिवशी लहान वयातच मला अनुग्रह मिळाला. त्यावेळी माझ्या बालमनाप्रमाणे स्वामींनी सांगितलेला जप मी करीत असे. पुढे विवाह झाल्यावर स्वामींच्या दर्शनाचा लाभ दुर्मिळ झाला म्हणून वाईट वाटे. दिलेला मंत्रजप निष्ठेने चालूच होता व आजही जप चालू आहेच. एकदां स्वामी माझ्या स्वप्नात आले आणि म्हणाले, 'पद्मा १३ कोटी जप पूर्ण कर म्हणजे तुझ्या घरी येईन.' संसारी बंधने सांभाळून मी होईल तितका जप व साधन चालू ठेवलेले आहे. नाममंत्राचा महिमा अगाध आहे. त्यामुळे मनःस्वास्थ टिकून राहते. संसारात जरी त्रास झाला तरी रामकृपेने आपण मनःशांती मिळवू शकतो असा माझा अनुभव आहे. संसारात कांही वेळेला मन विषण्ण होते व आपले कोणी नाही असे जेव्हां वाटते, तेव्हां एकदम श्री स्वामींची आठवण होते आणि ते आपल्या पाठीशी आहेत, आपल्याला काय कमी आहे? जगात आपल्या सारखे भाग्यवान् कोणी नाही असे वाटून दुःखपरिहार होतो.

* * *

## कै. अच्युत शंकर दामले, सांगली

१९५५ साली सांगली येथील विठ्ठलमंदिरात श्री. बाबूकाका उर्फ श्री. ना. भा. जोशी यांची तुलसीरामायणावर सुंदर प्रवचने चालू होती ती मी कुतूहलाने

ऐकण्यास जात असे. श्री. जोशीकाकांची ओळख झाल्यावर त्यांचेकडून स्वामींची माहिती झाली व असे कळले की लौकरच सांगलीच्या घाटावरील विष्णुमंदिरात चातुर्मासानिमित्त स्वामींचे वास्तव्य होणार आहे, व विष्णुमंदिरात प्रवचनेही होणार आहेत. पुढे स्वामीजींच्या प्रवचनांना मी नियमित जात असे. त्यांची थोरवी समजली. सहवास घडला, आणि मी विनंती केल्यावरून श्रीनी १९५६ मधील एकनाथषष्ठीस मला अनुग्रह दिला.

मी पोलीसखात्यात नोकरीस होतो आणि त्या नोकरीस कंटाळलो होतो. त्यातच त्यावेळी माझी बदली मुंबईस झाली. तेव्हां नोकरीचा राजीनामा देऊन मी मुंबईस हजर न होण्याचे ठरवले. रिटायर होण्याचा प्रयत्न चालू केला पण ते कांही जमेना. श्री स्वामींच्या कानावर ही सर्व हकिगत घातली. तेव्हां स्वामींनी सांगितले की ताबडतोब जाऊन मुंबईस कामावर हजर हो. ६ महिन्यांचे आत तुझ्या मनाप्रमाणे व्यवस्थित होईल. ती आज्ञा मानून मी मुंबईस कामावर हजर झालो. पुढे ३ महिन्यांतच नवीन सरकारी जी. आर. निघाला व त्याचा मला उपयोग होऊन सर्व फायद्यांसह मी रिटायर झालो. पुढे होणाऱ्या घटनांची संतांना कल्पना असते. त्यांच्या शब्दावर भरवंसा ठेवून वागणे योग्य.

माझी पत्नी सतत आजारी असे म्हणून स्वामींचे आज्ञेनुसार मी हनुमान चालिसाचे अनुष्ठान केले. अनुष्ठानानंतर तिला खूपच बरे वाटले व प्रकृति सुधारली.

* * *

## कै. श्री. कुसूमताई जोग, मुंबई

माझा अनुभव – प्रथम मला काही व्याधी उत्पन्न झाली म्हणून माझ्या वडिलांचे एक सत्पुरुष मित्र होते त्यानी, मला श्रीगुरुचरित्राला १०८ प्रदक्षिणा घालावयास सांगितल्या, म्हणून मी २।। वर्षे नित्यनियमाने प्रदक्षिणा घातल्या १ लाख प्रदक्षिणा झाल्या आणि इस्लामपूरहून माझ्या भावाचे पत्र आले की इथे एक सत्पुरुष आले आहेत दर्शनाला ये. तेव्हां श्री. प. पू स्वामींची भेट झाली. श्रीगुरुचरित्राची देवताच प्रगट रूपाने आपल्यावर अनुग्रह करण्यास आली आहे ह्याचा फार फार आनंद झाला. तेव्हांपासून त्यांच्यावर श्रद्धा बसली ती ह्या क्षणापर्यंत! त्यांचे पण माझ्यावर प्रेम तसेच

होते. त्यांची नुसती आठवण झाली तरी मी सारखी रडत असते. आता ते दिसत नाहींत पण माझ्या हृदयमंदिरातून ते कधीच जाणार नाहींत.

आमच्याकडे श्रीकाशीविश्वेश्वराचा फोटो आहे त्यात, मला जेव्हां त्यांची आठवण होऊन मी खूप रडले, त्याच दिवशीं तिथे प्रगट झाले आहेत. आता ते तिथे कुणालाही दिसतात. सोळा सोमवार नंतर तर त्यांनी मला ध्यानाला बसल्यावर प्रत्यक्ष पायांचे दर्शन दिले. त्यादिवशी माझी जी अवस्था झाली ती पहाण्यास ह्याच मार्गातील एक अधिकारी व्यक्ती हजर होती. बस, मला खरोखरच पुढे लिहवत नाही!

* * *

## श्री. न. गो. अन्नछत्रे, पुणे

१९५९ साली माझी धुळ्याहून मालवण सावंतवाडी भागात बदली झाली. त्या भागातील हवा पाणी सौभाग्यवतीस मानवण्यासारखे नसल्यामुळे, तिला व मुलांना तिचे माहेरी म्हणजे परांड्याचे श्री. मुगांवकर यांचेकडे ठेवून मी एकटाच नोकरीचे गाव मालवणला हजर झालो. मन थोडे नाराजच होते. तेथून कोठेतरी कोरड्या हवेच्या ठिकाणी बदली व्हावी म्हणून अर्ज केला पण २॥ /३ महिने झाले तरी त्याचा उपयोग होण्याची चिन्हे दिसेनात. शेवटी ७ दिवसांची किरकोळ रजा घेऊन मी परांड्यास आलो. त्यावेळी श्री स्वामींचा मुक्काम परांड्यासच होता. मुगांवकर मंडळी स्वामींची अनुग्रहित होती. म्हणून मीही स्वामींचे दर्शनास गेलो व बोलतां बोलतां नोकरीतील बदलीचे खटपटीबद्दल स्वामींना सांगितले. आणि येथूनच पुण्यास हेड ऑफीसमध्ये जाऊन आतां खटपट करणार आहे असे म्हणालो. तेव्हां स्वामी म्हणाले, पुण्यास जाण्याची जरूरी नाही. तुमचे काम झालेले आहे. तेव्हां पुण्यास न जाता मालवणला कामावर हजर व्हा. स्वामींचे आज्ञेप्रमाणे रजा संपताच मी मालवणला गेलो तो तेथे माझी बदली, तळोदा (जि. धुळे) येथे झाल्याची ऑर्डर आली होती. मग मी ताबडतोब चार्ज देऊन बदलीच्या रजेच्या मुदतीत परांड्यास आलो. गेले २ – ३ महिने सौभाग्यवती माहेरी परांड्यास होती. त्याकाळात मुगावकर मंडळींचे बरोबर ती स्वामींचे दर्शनास, ध्यानास, भजनास जात असे. आपल्याला श्री स्वामींचा अनुग्रह

मिळावा अशी आपली इच्छा तिने स्वामींना सांगितली. तेव्हां स्वामी म्हणाले मी तुला एकटीला अनुग्रह देत नाही. एक तर उभयतांनी अनुग्रह घ्यावा किंवा पतींची तुझ्या अनुग्रहाला संमति असलेली आम्हास कळली पाहिजे.

हे सर्व मला पत्नीने सांगितले, वरील रजेच्या मुदतीत परांड्यास आम्ही दोघांनी स्वामींना अनुग्रहासाठी विनंती केली व अनुग्रह घेतला. माझी फिरतीची व आदिवासी भागातील नोकरीचा विचार करून स्वामींनी आम्हास जे साधन सांगितले होते ते अनुसरून असल्याने त्या आदिवासीच्या-भागातही आम्ही आनंदात होतो. तळोद्याचे जंगलभागात राहावे लागे. मुलांच्या शिक्षणाची नीट सोय नव्हती म्हणून काळजी वाटे. सातपुड्याच्या डोंगरी भागात व नर्मदा काठावरील जंगलातील खेड्यापाड्यात, मलेरिया बंदोबस्ताचे काम मला करावे लागे. जंगलात मोठे साप, रात्री बोरे खाण्यास येत असलेली अस्वले, खूप पाऊस, महापूर या सर्वांचा अनुभव घेतला व या त्रासाची हकिगत अधूनमधून स्वामींना कळवीत असे. त्यांनी एका पत्रात, यातून लवकरच मार्ग निघेल असे कळवले होते. असाच एकदां कामासाठी जंगलभागात फिरत असतांना खात्याचे डायरेक्टर डॉ. राव यांची गाठ पडली. आणि त्यांना काय वाटले कोणास ठाऊक! त्यांनी माझी ताबडतोब धुळ्यास बदली केली व सामान नेण्यासाठी सरकारी गाडी वगैरे देण्याची व्यवस्था केली. 'स्वामींनी लवकरच मार्ग निघेल' असे जे लिहिले होते त्याचा प्रत्यय आला. माझ्या मुलांच्या मुंजी करण्याचे ठरल्यावर स्वामींनी मला कळवले की आत्मशुद्धीसाठी तुम्ही १०००० गायत्री जप ३ दिवसांत करा. त्या प्रमाणे ३ दिवसांत मी तो केला. अनुभव असा आला की पहिल्या दिवशीपेक्षां दुसऱ्या दिवशी, व दुसऱ्या दिवशी पेक्षा तिसऱ्या दिवशीं शरीरांतर्गत कांहीतरी बदल होत आहे. हा अनुभव स्वामींना कळवला तेव्हां ते म्हणाले की, आत्मशुद्धी, शरीरशुद्धी होतांना असे होते. त्याच बरोबर त्यांनी असेही लिहिले की मुंजीत बटूस ज्यावेळी गायत्रीमंत्र द्याल, तो एका शांत खोलीत जाऊन एकांतात द्या. त्याला मंत्राचें महत्त्व व अर्थ पटवून द्या. त्याचा बटूस विद्येत, शरीरवाढीस, शरीर शुद्धीसाठी उपयोग होईल. त्यांचे आज्ञेप्रमाणे सर्व केले. त्याचा परिणाम आज असा दिसतो की

मुले बुद्धिमान निघाली. डॉक्टर, इंजीनीयर वगैरे झाली. आणि सर्व कांही उत्तम आहे यावरून असे वाटते की गायत्रीमंत्रांमध्ये व गुरूंच्या आज्ञेमध्ये मोठे सामर्थ्य असते.

* * *

## कै. लक्ष्मणराव मुगांवकर, वकील, परांडा

१९४३ साली कांही कामानिमित्त पुण्यास गेलो असतांना तेथील आमचे मित्र श्री वैद्यमास्तर यांना सहज विचारले की गायत्री पुरश्चरणाची माहिती असलेले तुमच्या ओळखीचे कोणी आहे का? तेव्हां ते म्हणाले की नुकतेच गायत्री पुरश्चरण करून संन्यास घेतलेली एक अधिकारी व्यक्ति खेडला आहे. तेथे गेलात तर समक्षच तुम्हांस माहिती मिळेल. त्याचप्रमाणे सवड मिळतांच मी खेडला गेलो. खेडला माझे कोणी ओळखीचे नसल्याने एकदम श्रीस्वामींचेकडेच गेलो. स्वामी त्यावेळी नदीकाठच्या एका घरात राहात होते. स्वामींनी माझी विचारपूस करून मला सांगितले की आतां घाईने परत जाऊ नका. रात्री येथेच थांबा, आपण दोघे सविस्तर बोलू, मी येथील दीक्षित वकिलांकडे तुमची भोजनाची वगैरे व्यवस्था करावयास सांगतो. त्याप्रमाणे मुक्काम करून मी पुरश्चरणाबद्दलची व इतर माहिती विचारून घेतली. या पहिल्याच भेटीत हे एक अधिकारी व त्यागी संन्यासी आहेत अशी माझी खात्री झाली. मी त्यांना परांड्यात येण्याची विनंती केली.

कांही काळाने परांड्यास येत असल्याचे स्वामींचे पत्र आले. त्या काळात कुर्डुवाडीहून बसेस वगैरेची सोय नसल्याने कुर्डुवाडी स्टेशन ते परांडा, बैलगाडीने परांड्यास घेऊन आलो, आणि आमच्या मळ्यातील शंकराचे देऊळ, तेथील विहीर वगैरे पाहून स्वामींनी तेथेच मुक्काम करण्याचे ठरविले. एका पहाटे स्नानास विहिरीवर गेले असतां विहिरीतील सर्पाने त्यांच्या पायाच्या पोटरीस विळखा घातला होता. तो त्यांनी हातानेच सोडवून त्या सर्पास सोडून दिले.

परांड्यास असतांना आमचे घरी श्रीस्वामी आले असतांना माझे वडीलबंधू श्री. आबासाहेब पूजा करीत बसले होते. पूजा करून जेव्हां बंधू बाहेर आले तेव्हां स्वामींनी त्यांना विचारले की तुम्हीं कोणाचा उपदेश वगैरे घेतला

आहांत काय? नाही असे म्हटल्यावर स्वामींनी त्यांना आपल्या समोर आसन घालावयास सांगून, दोन्ही हाताचे पंजे गुढघ्यावर ठेवून, बसावयास सांगितले व स्वामींनी आपले हात त्यांच्या हातावर ठेवताच मूलाधार चक्रांपासून मुंग्या वरवर चढत असल्यासारखे त्यांना जाणवले व शरीरांतर्गत एक प्रकारची गति चालू झाली. थोड्या वेळानंतर स्वामींनी त्यांना डोळे उघडण्यास सांगितले. या घटनेमुळे माझ्या बंधूंचाही स्वामींशी विशेष परिचय झाला व पुढे त्यांनी स्वामींचा अनुग्रह घेतला.

* * *

## श्री. पुरमवार गुरुजी, नांदेड

श्रींच्या मुखावाटे एकादा शब्द निघाला की तो बदलला जात नसे. माझ्या सांगण्यावरून श्री स्वामींनी एका धनगरास अनुग्रह देण्याचे मान्य केले. तो प्रपंची होता. त्याने दाढी जटा वगैरे वाढविलेल्या होत्या. स्वामींच्या दर्शनास त्याला नेला त्यावेळी स्वामी त्याला म्हणाले, की या जटा, दाढी वगैरे काढून अनुग्रहास अमुक एक तिथीस ये. धनगर पुन्हा २ दिवसांनी केव्हा येऊ म्हणून विचारावयास गेला तेव्हां त्याने दाढीमिशा काढलेल्या नव्हत्या. तेव्हां स्वामी त्यास म्हणाले की तू फार शहाणा दिसतोस, तू सांगितलेलेही ऐकत नाहीस, तेव्हां तुला अनुग्रह नाही. त्या धनगराच्या वतीने मी स्वामींना विनविले तेव्हां ते म्हणाले 'त्याच्या दैवातच आतां नाही. मी जे एकदां बोललो ते बोललो.' स्वामींच्या पुढे जास्त बोलण्याचे कोणाचेही धाडस होत नसे. एवढेच काय पण त्यांच्या तेजस्वी मुखाकडे सुद्धां ते रागावलेले असले म्हणजे पाहण्याची हिम्मत होत नसे.

एका गुरुपौर्णिमेच्या दिवशीं सकाळी आकाशात काळेकुट्ट ढग जमा झाले आणि जोराच्या पावसाची चिन्हें दिसूं लागली. आम्ही शिष्यांनी स्वामींना सांगितले की, 'आतां जोरात पाऊस पडला तर कसे करायचे? समारंभात मोठाच व्यत्यय येणार!' तेव्हां स्वामी म्हणाले, 'आमचा निरोप वरुणाला सांग की इतक्यांतच पाऊस पाडू नकोस.' आश्चर्य असे की खरोखरीच हा निरोप सांगितल्यावर ढग हळू हळू वितळले व पाऊस त्या दिवशी पडला नाही.

स्वामीजी कुणाला स्पर्श करूं देत नसत पण दिवाळीच्या पाडव्यास फक्त त्यांच्या शिष्यांना स्पर्श करण्याची मुभा असे. त्याच फायदा घेऊन मी, श्री. बळिराम पाटील, श्रीराम गिल्डा, आदिनाथराव यादव यांनी असे ठरविले की आज स्वामींचे अंगास उटणी वगैरे लावून तेलाने त्यांचे अंग मर्दून द्यावे. स्वामींनी पण ते मान्य केले. मग आम्ही चौघांनी तेल लाविले तेव्हां स्वामींच्या अंगात किती ताकद आहे हे आम्हांस कळले. स्वामी मला म्हणाले, 'मी हात असा आडवा करतो तू खाली दाब बघू!' तेव्हां मी पुष्कळ बळ लावून हात खाली दाबण्याचा प्रयत्न केला. पण हात किंचित् सुद्धां खाली आला नाही. तसा मी चांगला पेहलवानासारखा सशक्त आहे. पण मला येवढेही जमेना. स्वामी म्हणाले, ''अरे पुरमवार, हत्तीला बुक्की मारायचे ठरविले तर तो सुद्धां मरेल.'' यावेळी स्वामींचे वय साधारण ६० वर्षांचे होते.

स्वामीजींच्या नुसत्या संकल्पाने, स्पर्शाने, किंवा नामाच्या उच्चाराने देखील कुंडलिनी जागृत होत असे. परांडा येथील अनेकांना श्रींनी दीक्षा दिली तेव्हां विविध आसने दीक्षा घेतलेल्यांच्याकडून होत असत. पण सावध झाल्यावर तशी आसने करू म्हटलें तरी जमत नसत. एकदां एकजण बेडकासारखा उड्या मारू लागला तेव्हां मी विचारले की, 'हा असे काय करतो?' तेव्हां स्वामी म्हणाले की, 'पूर्वजन्मींचे संस्कार जागृत होत असतात.'

स्वामी म्हणत की, रामकथा ऐकण्यास हनुमंत येत असतात त्यांना रामायण वाचनाचे वेळी आसन ठेवावे. याचा अनुभव मला १९६६ मधें देगलूर येथे आला. मी माझे आजोळी एक मास पारायण केले. माझी मावळण सौ. धोंडाबाई मुलगीलतार या भाविक होत्या व त्यांची परमार्थात चांगलीच प्रगति होती. त्या ऐकायला बसत. पारायण चालू असतांना त्यांचा मुलगा आजारी पडला. तेव्हां त्या म्हणाल्या, रामायण चालू असताना ते ऐकायला रोज मारुतीराय येतात म्हणून तुम्ही म्हणतां तर मग आपल्या घरातील मुलाला ताप कसा काय आला?

मी काहींच बोललो नाही पण दुसऱ्या दिवशी न्यास करून मी श्री मारुतीरायांना आवाहन केले. त्यावेळी सौ. धोंडाबाईना असे जाणवले

की आपल्या डोक्यावरून उडी मारून समोर ठेवलेल्या पाटावर मारुतीराय येऊन बसले आहेत. त्यांचे केस सोनेरी आहेत. त्यांची शेपूट आपल्या मांडीवर आलेली आहे. काही बोलावे म्हणून प्रयत्न केला तर बोलताच येईना. वाचाच बंद झाली होती. पारायण संपल्यावर रोजच्या विधिप्रमाणे हनुमंताना निरोप देण्याचे श्लोक म्हटले. तेव्हां आलेल्या वाटेनेच उड्डाण करून हनुमान परत गेले. त्यावेळी हा अनुभव फक्त त्यांनाच आला. इतर कोणालाही दर्शन झाले नाही. आणि त्या संध्याकाळीच मुलाचा ताप ही गेला. आवाहन केल्यावर देवता खरेच येतात याची खात्री झाली.

असेंच दर्शन हरे (ता. उद्‌गीर) येथील मठात रामायणातील सुंदरकांड वाचीत असतां एका श्रद्धावान् गोसाव्यांना झाले.

अनुग्रहाचे वेळी किंवा गुरुपौर्णिमेचे वेळी दक्षिणा म्हणून जे कांही पैसे जमा झालेले होते त्याचा विनियोग गुरूंचे नांवे परांडा येथे एक लहानशी धर्मशाळा व एक विहीर बांधून केला गेला. कारण त्यावेळी परांड्यात पाण्याचे दुर्भिक्ष होते.

दुसऱ्याकडून स्वागत करून घेणे त्यांना आवडत नसे. एकदां स्वामी नाशिकला जाणार होते. तेथील मंडळीचे पत्र आले की स्वामींच्या आगमनाची तारीख व वेळ कळवावी म्हणजे आम्ही त्यांचा स्वागत समारंभ आयोजित करू. त्यावर स्वामींनी लिहिले की समारंभ वगैरे करणार असलात तर स्वामी नाशिकला येणार नाहीत. यावरून दिसले की त्यांना स्वत:ची महती वाढवायची नव्हती.

श्री. स्वामीजींनी देह ठेवण्यापूर्वी त्यांच्या नित्य वापरातल्या वस्तु म्हणजे कंदील, चष्मा, चिपळ्या, खडावा, पुस्तके, वस्त्रे, जपमाळ पेन, पेन्सिली वगैरे आलेल्या शिष्य मंडळींना देऊन टाकल्या आणि पांघरण्याच्या शालीच्या गोमुख्या करून घेऊन, जे कोणी नित्य जप करतील त्यांना प्रसाद म्हणून द्याव्यात असे सांगितले होते. यापैकी कंदील व एक वस्त्र स्वामींच्या हस्ते मला मिळाले आहे.

प्रायोपवेशन करून स्वामींनी देह ठेवू नये, असे मी व अनेक भक्त मंडळींनी विनविले, त्यावेळी स्वामी म्हणाले की या देहाने यापुढे संन्यास धर्माचे पालन होऊ शकणार नाही, आणि देहही जीर्ण झाला आहे, मग या

देहाचा उपयोग काय? तेव्हां मी म्हटले की आपले सगुण दर्शन व मार्गदर्शन यांना आम्ही मुकणार!

तेव्हां श्री स्वामीं म्हणाले की जो कोणी नित्य रामायण वाचील, दिलेला मंत्रजप करील, स्वामींच्या शिकवणीप्रमाणे वागेल, त्याला स्वामी दूर नाही. हा अनुभव मला नेहमी येतो. हांकेला स्वामी नेहमी धावून येतात.

* * *

## सौ. कमल निलंगेकर, लातूर

माझ्या यजमानांची परांड्याला बदली झाली. तेव्हां मंडईजवळ आम्ही राहात होतो. जवळच देशमुखवाड्यात श्रीस्वामींची प्रवचने सकाळच्या वेळी होत असत. हा देशमुखवाडा भुतांचा वाडा म्हणून प्रसिद्ध होता. दिवसासुद्धां या वाड्याकडे कोणी फिरकत नसे. स्वामींनी त्या ठिकाणी मुक्काम केल्यावर प्रवचनासाठी येथे गर्दी जमूं लागली, कधी कधी मी सायंकाळी श्रींचे दर्शनास जात असे तेव्हां तेथे कांही शिष्यमंडळी ध्यानास बसलेली दिसत. ते वातावरण पाहून मल वाटे की आपल्यावरही स्वामी अनुग्रह करतील काय? असे श्रेष्ठ संत पुन्हां आपल्याला भेटतील काय? त्यांच्या प्रवचनातील कांही उपदेश तर माझ्या मनांत चांगला बसला होता. स्वामी मध्यंतरी कांही काळ नाशिकला गेले व माझ्या यजमानांची बदलीही दुसऱ्या गांवी झाली. त्यामुळे जवळ जवळ ४ वर्षांचा मध्यंतरीचा काळ तसाच गेला.

१९६१ साली मी माहेरी असतांना एका गृहस्थाने मला स्वामींनी लिहिलेल्या 'रामचरित मानसा'ची एक प्रत आणून दिली. आत मधे स्वामींचा व श्रीरामांचा फोटो होता. तो पाहून फार आनंद वाटला. मग नियम केला की दररोज एक अध्याय वाचायचाच. त्यामुळे मला रामायण वाचनाचीही गोडी लागली आणि स्वामींचे सतत स्मरण होऊ लागले. याच काळात माझे यजमान भूम येथे आजारी पडले. ते एक महिनाभर बेशुद्धावस्थेतच होते. त्यांच्या कुंडलीतही त्या वर्षी गंडातर योग होता, व ज्यांनी हे भविष्य वर्तविलेले होते त्यांनी लिहिलेल्या घटना तशातशा आधी खऱ्या झालेल्याही होत्या. त्यामुळे मी अत्यंत घाबरले होते. स्वामी प्रवचनात सांगत असत

की, संकटाच्या वेळीं देव किंवा गुरु यांना अत्यंत कळकळीने हांक मारली तर ते तुमच्या हाकेला 'ओ' देतात. या वाक्यावर विश्वास ठेवून मी अगदी निष्ठेने संकटमुक्तीसाठी स्वामींची व रामरायाची तळमळून प्रार्थना करीत होते. मला खात्री आहे की श्री स्वामींनीच माझी प्रार्थना ऐकून माझे सौभाग्य मला परत दिले. काही कालानंतर माझ्या यजमानांची प्रकृति उत्तम झाली आणि उस्मानाबादला बदली झाली. योग असा की त्यावेळी स्वामीही उस्मानाबाद येथे गरड वकिलांच्या माडीवर चातुर्मासानिमित्त आलेले होते. फारच आनंद झाला. मी रोज दर्शनाला जात होते.

मला स्वामींकडून अनुग्रह घेण्याची तीव्र इच्छा होती पण विचारण्याचे धाडस होईना. इकडे चातुर्मास संपायचे दिवस आले. शेवटी मनाचा हिय्या, करून एक पत्र लिहिले व त्यांत विनंती केली की आपला अनुग्रह व्हावा अशी अत्यंत इच्छा आहे. पत्र पाहिल्यांनतर स्वामींनी सांगितले की 'हरे राम हरे राम' ह्या ३२ अक्षरी मंत्राचा ६० हजार जप आधी कर, आणि पतीची लेखी परवानगी आण म्हणजे अनुग्रह मिळेल. त्याप्रमाणे मी जपास सुरुवात केली व दोन महिन्यात ६० हजार जप केला. यजमानांनीही अनुग्रहास पूर्ण संमति दिली. तारीख ११-१२-६४ रोजी स्वामींनी मला अनुग्रह दिला व श्रीकृष्ण उपासना दिली. एकदां स्वामींचे समोर ध्यानास बसले असतांना मला जोरात घशातून ठसका येऊ लागला. मी तो तसाच दाबून टाकू लागले व तोंड घट्ट मिटून ठेवले. तो काय आश्चर्य! माझा ठसका थांबला आणि स्वामींनाच जोराने ठसका लागला. शिष्यांचा त्रास गुरूंना भोगायला लागतो म्हणतात, त्याची प्रचीती आली. मी ध्यानाला नियमितपणे बसत असे व मला निरनिराळे अनुभव येत. वेगवेगळ्या क्रिया होत. देह वेगळा व आपण वेगळे अशीही जाणीव होई. केव्हां आनंदोर्मी येत, केव्हां भीतीची भावना येई. असे येणारे अनुभव मी पत्राने स्वामींना कळवीत असे. तेव्हा त्यांचे उत्तर येई, की सर्व योग्य चाललेले आहे, नियमितपणे अभ्यास चालू ठेव.

एका गुरुपौर्णिमेला मला स्वामींकडे जाण्याची इच्छा होती. पण जाता आले नाही म्हणून मी स्वामींना लिहिले की देह हा पराधीन असल्याने संसारातून सुटका होत नाही. त्याला स्वामींचे खरमरीत उत्तर आले की

तुझ्यापेक्षा म्हणजे स्त्रीपेक्षासुद्धा पुरुषालाच पराधीनता जास्त. नीचांची सेवा करावी लागते. गुलामगिरीत राहावे लागते. प्रपंचाची पूर्तता करण्यासाठी मानहानी सहन करावी लागते. तुला अनुग्रह घेण्यास परवानगी दिली व जप करू देतात हे त्यांचे अनंत उपकार समज. स्त्रियांना घरची कामे ही असणारच. पारमार्थिक साधन न केले तरी चालेल. स्त्रीने आधी पतिव्रता धर्म पाळायला पाहिजे. कितीतरी पत्रात त्यांचा बोध हाच की पतीच्या विरुद्ध थोडेसुद्धां वागू नको. म्हणजे तुझी ज्ञानलालसा पूर्ण होईल.

एकदा मी पत्रातून लिहिले की ध्यानास बसले असता विघ्ने येतात. सारखी झोप येते. त्यावर त्यांनी लिहिले की स्वामींचा वा गोपालकृष्णाचा फोटो समोर ठेवून बसत जा वा दृष्टी तिथे ठेवीत जा म्हणजे झोप येणार नाही. मग मी तसे करीत असे.

मध्यंतरी माझ्या मुलाची मुंज झाली. मुंजीत भिक्षावळीचे कांही पैसे जमले ते मी यजमानांपासून लपवून ठेवले होते. त्यामुळे मला सतत त्या पैशांविषयी खोटे बोलावे लागे. पुन्हापुन्हां एकीकडे स्वामींचे प्रवचनातील वाक्य आठवे की, 'असत्यासारखे दुसरे पाप नाही.' व आपले हातून तर तेच पाप होते आहे.

मी एकदां स्वामींना पत्रातून विचारले की पतीच्या हितासाठी खोटे बोलावे का? ह्यांच्या जवळ पैसा राहात नाही म्हणून मी पैसे बाजूला ठेवावेत का? पुष्कळ माणसांचे असे मत असते की खोटे बोलल्याशिवाय प्रपंच होत नाही. कांही वेळा खोटे बोलावे लागते. आपल्या प्रपंचातील आडीनडीला उपयोगी पडावे म्हणून चार पैसे बाजूला ठेवायला लागतात!

हे पत्र स्वामींना मिळतांच त्यांचे खमंग उत्तर आले. त्यांनी लिहिले होते की तुझ्या साधनेत व्यत्यय येण्याचे कारण तुझ्या पत्रावरून कळले. तुम्हीं बायका पतिरूपी दैवताजवळ जर इतक्या खोटे बोलता तर इतरांचे जवळ तर किती खोटे बोलत असाल? तर आता या पुढे कधीही खोटे बोलायचे नाही. पैसा मिळणे वा शिल्लक राहाणे हे प्रारब्धानुसार घडते. ते कोणाच्या प्रारब्धाने वा भाग्याने मिळते हे सांगता येणे कठीण आहे. तर तू आतां पतीच्या पायावर डोके ठेवून पश्चात्तापपूर्वक क्षमा मागितली पाहिजे व तसे तू केल्याबद्दल तुझ्या पतीची पत्रात सही असली पाहिजे. तरच पुढे तुझ्या

पत्राचे उत्तर दिले जाईल. नाहीतर नाही. खोटे बोलणे, लपवालपव हे साफ सोडले पाहिजे. असे त्यांचे कडक पत्र आले. पुढे माझ्या यजमानांचे सहीचे पत्र जेव्हां त्यांना गेले तेव्हांच त्यांचे उत्तर आले. खरोखर शिष्यांना सन्मार्गाला लावण्याची किती ही तळमळ! या क्षुद्र जीवाच्या हृदयातील असत्याचा मळ अशाप्रकारे त्यांनी काढून टाकला. आतां मात्र असत्याकडे जीभ चुकूनही वळत नाही. तेव्हांपासून चमत्कार असा घडला की कुठे कमतरताच भासत नाही. २ रु.ची अपेक्षा केली तर १० रु. मिळतात. सत्याचा परिणाम इतका झाला.

एकदा मी स्वामींना पत्रातून लिहिले की एकाद्यावर आपण पुत्रवत् प्रेम केले पण पुढे ते साधी ओळखही द्यायला तयार नाहीत असे झाले म्हणजे मनाला फार दुःख होते. तर त्यांच्याशी कसे वागावे? त्यांच्या उत्तरात स्वामी लिहितात 'अग कमल, त्याचे वाईट वाटून न घेतां ती परमेश्वराची कृपाच समजावी. कारण एकएक मायापाश कमी होतात. हल्ली आपली मुले सुद्धां अशीच वागायला लागलेली आहेत. अशावेळी विरोध न करता त्यांच्या विषयींचे योग्य ते मातृकर्तव्य करीत राहावे व मधून मधून जशास तसे वागावे. व मायारूपी पाश कमी झाले म्हणून प्रभूचे आभार मानावेत. आपले कर्तव्य मात्र आपण सोडू नये. या प्रसंगावरून त्यांनी पुढचा मार्ग जणूं सांगून दिला.

स्वामी १९६६ साली साताऱ्यास सौ. कमूताईकडे होते. त्यांना ७३ वे वर्ष लागले होते. व त्यावेळी त्यांचे देहविसर्जन करण्याचे चालले होते. ते कोठेही असले तरी १५ दिवसांनी पत्र येतच असे. प्रत्येक पत्रात निर्वाणीचे शब्द असत. त्या वेळच्या एका पत्रात ते लिहितात 'कमल, येत्या गुरुपौर्णिमेपर्यंत हा देह नक्कीच राहात नाही. तथापि पायावर डोके ठेवून दर्शन घेण्याचा अनुभव तुला घेता येईल.'

स्वामींनी उस्मानाबद येथे असतांना लिहून ठेवलेल्या मृत्यूपत्रात असे लिहिले आहे की, ''या देहाला खड्ड्यात न पुरतां तो नदीच्या डोहात सोडून द्यावा. तो विधि धर्मसिंधूत दिलेला आहे.'' हे वाचल्या नंतर मन बैचेन झाले. माउली गेल्यानंतर आपले कसे होईल? असे वाटे. मनुष्य जन्माचे सार्थक कसे होईल याची या जीवाला तळमळ लागली आहे. आणि

परमेश्वर कृपेने ब्रह्मनिष्ठ सद्गुरु कर्णधार मिळाले आहेत. पण प्रारब्धयोग पहा कसा! त्यांच्या सहवासाचा लाभ अगदी थोडा मिळाला. या जीवाला काहीही ज्ञान झाले नाही. मी पत्राने माझी तळमळ त्यांना कळवी. व ते उत्तर धाडून माझे मन शांत करीत. स्वामी एका पत्रात लिहितात, 'हा देह जरी गेला, तरी तुला तुझ्या अडचणीच्या वेळी मार्गदर्शन मिळत राहील. जन्माला आलेल्या प्रत्येक देहाला मरण केव्हांतरी येणारच. ते जेव्हां जिथे ज्या प्रकारे ठरले असेल त्याप्रमाणे येणारच. राम व कृष्ण इत्यादि अवतार झाले, त्यांचेही देह जेथे गेले तेथे इतरांचे काय? त्यातही या देहाला आता मे महिन्यांत ७४ वे वर्ष लागेल. तेव्हां तू काळजी करू नकोस.' किती निष्काम प्रेम!

पत्र आल्यावर, आपण दर्शनास जावे असे सारखे वाटायला लागले. पण मला ते कसे शक्य होते? घरात दुसरे घर सांभाळणारे कोणी नाही. माझी ५ मुले. पहिला १० वर्षांचा व शेवटचा २ वर्षांचा. सगळीच लहान होती. पुन्हा इतक्या लांबचा प्रवास! त्या बाजूची मला काहीच माहिती नाही. पण तीव्र इच्छा असल्याने माऊलीने ती इच्छा पूर्ण केली. पतींनी परवानगी दिली व मुलेही आनंदाने जा म्हणाली. आपल्याला तिकडचा भाग माहिती नाही हा विचार सुद्धां केला नाही. श्री. पैंच्या हरणामावशींना घेऊन निघाले. (तिला व मला स्वामींचा अनुग्रह एकाच दिवशी मिळाला होता. आम्ही दोघी एकमेकींना जुळ्या बहिणी समजत होतो.तिथे सातारला पोचल्यावर बस स्टँडवर पाहाते तो पाठकजी (स्वामींचे एक शिष्य) न्यायला आलेले! फारच आश्चर्य वाटले. कारण आम्ही येत असल्याचे कांहीच कळवलेले नव्हते. स्वामींच्या पत्रात जो घरचा पत्ता असे, तेवढ्या आधारावर मी निघालेली. घरी आल्यावर स्वामी म्हणाले की पाठकजींना जर पाठवले नसते तर कसे झाले असते? असे म्हणून हंसले.

सद्गुरु अंत:साक्षी असतात याचा प्रत्यक्षच अनुभव आला. यावरून तळमळ असणाऱ्या शिष्यांवर त्यांचे किती प्रेम होते हे दिसून येते. खरोखर जन्मदात्री आईसुद्धां इतके प्रेम करणार नाही. म्हणूनच जगात सर्वात श्रेष्ठ सद्गुरु आहेत. तेथे वाचा मुकी होते. ते वर्णन करतां येणार नाही.

मी साताऱ्यास जायच्या अगोदर माझ्याकरितां एक स्वत:च्या लोकरीच्या

वस्त्राची गोमुखी कमूताईकडून शिवून घेतली होती, ती पाकिटात घालून मला एकटीलाच दिली आणि सांगितले की हरणामावशीला व ताईला तेथे गोमुखी दाखवू नकोस. तुझ्या गांवी गेल्यावर दाखविलीस तरी हरकत नाही. किती प्रेम!

मी घरी आल्यानंतर पत्र लिहिले की हरणामावशी २० वर्षांची अनुग्रहित व ताईची भावना सुद्धां अगदी शुद्ध. असे असतांना गोमुखी मला एकटीलाच मिळाली हे कसे? तर त्यांनी लिहिले, 'कमल ज्याचा जसा भाव तसा देव. तुझी जशी नियमित पत्रे येतात, तशी ताईची वगैरे कुठे येतात? पत्र व्यवहार कमी झाला म्हणजे परमार्थातील प्रगति आपोआप कमी होत आहे हे आपोआपच ठरते.'

पुढे स्वामी चिकुर्ड्यास विश्वनाथ आप्पाजी कुलकर्णी यांच्याकडे गेले. तेथे ते २। महिने होते. त्यानंतर परत परांड्यास आले.

मला सारखे वाटे, की स्वामींचा सहवास जवळून लाभावा. त्यांच्या समोर ध्यानाला बसावे, कांहीतरी सेवा घडावी त्यासाठी मी एक वर्षभर गुरुवारचे उपास केले. काहीही न खाता. आणि माझी इच्छा स्वामींना कळवली. त्यांचे उत्तर आले की तुम्हीं राहाता तिथे स्वामी येतील पण नैवेद्य वैश्वदेव होणाऱ्या ५-६ घरची भिक्षा मिळाली पाहिजे. माझे घर त्या वेळी उमरग्यास होते. रोज वैश्वदेव होणारी एक दोनच घरे मिळाली. शिवाय माझ्या घराजवळ स्वामींना राहण्याजोगी खोली मिळेना. सर्व गोष्टी प्रयत्न करूनही जमेनात. स्वामींना तर लौकरात लौकर कळवायला हवे होते. मला कांहीच सुचेना. सोय होत नाही म्हणून लिहिण्यास लेखणी धजेना. स्वामींनी कसेही करून यावे ही तर तीव्र इच्छा होती. आणि मुख्य म्हणजे ते स्वत: येण्यास तयार झाले असतां आपल्याकडून व्यवस्था घडू नये या प्रारब्धयोगाचे वाईट वाटू लागले. त्यामुळे त्यांना उत्तर लिहिण्यास उशीर लागला. पुन्हां स्वामींचे पत्र आले. 'कमल, आतां नैवेद्य वैश्वदेवाचे अन्न पाहिजे ही अट काढून टाकली आहे. भिक्षा एका घरची व श्रद्धेने देणाऱ्याकडची असली तरीही चालेल.' संतांचे मन किती मोठे असते पहा! नाथांनी राणू महाराचे आमंत्रण स्वीकारले तसाच हा प्रकार. त्यांचे सर्व नियम इतके कडक की ज्या गोष्टी झाल्या पाहिजेत, त्या झाल्याच पाहिजेत. पण या

अज्ञान बालिकेकरतां चालत आलेले नियम मोडण्यास ते तयार झाले. त्यांच्या शुद्ध प्रेमाची आठवण झाली की हृदय भरून येते.

पण इतके होऊनही त्यांच्या राहण्याची सोय होईना. माझी धडपड चालू होतीच. पण माझा नाईलाज झाला. शेवटी स्वामींचेच पुन्हां पत्र आले. 'कमल तू खटाटोप करीत बसू नकोस. इथे सध्यां मुगांवकरांकडे वृद्धी आली आहे. त्या करतां तूच ८/१० दिवस परांड्यास राहण्यास ये. म्हणजे तुला स्वयंपाक करणे, वस्त्रे धुणे, स्नानास पाणी देणे वगैरे सर्व सेवा तुझ्या मनांत आहे तशी घडेल.'

हे पत्र आल्यानंतर माझ्या यजमानांनीही परवानगी दिली व मग मी १५ दिवस राहण्याच्या बेताने गेले. परांड्यास गेल्यावर माझ्या मागे दुसरी कांहीच उपाधी नसल्यामुळे मनाप्रमाणे सेवा घडली. खूप आनंद झाला.

त्यावेळी स्वामींची निरवानिरवीची भाषा चालू होती. कारण पत्रातही लिहिले होते की या देहाचा अंतकाळ चैत्रमहिन्यापूर्वीच आहे असे वाटते. मी पौष महिन्याचे अखेरीस गेलेली होते. म्हणूनच माझी सेवेची इच्छा पूर्ण करण्याची धाई त्यांनी केली.

मी तेथे असताना एके दिवशी स्वामींचे क्षौर चालू होते. माझ्या मनांत आले की काय भाग्य त्या न्हाव्याचे! त्याला यतिस्पर्श होतो. आणि आपणास पदस्पर्श करून दर्शन होत नाही. स्वामी प्रथम प्रथम पायावर डोके ठेऊन दर्शनास परवानगी देत असत म्हणे, तेही फक्त गुरुपौर्णिमेस व अनुग्रह घेतलेल्या दिवशी. पण ती पद्धत आमच्या वेळी बंद झाली होती. कोणाचाच स्पर्श करून घेत नसत. जाऊन पाय घट्ट धरावेत असे मनात येई. पण तो धृष्टपणा माझ्याच्याने झाला नाही. मी १५ दिवस परांड्यास राहून उमरग्यास गेले. गेल्यानंतर माझी ती इच्छा स्वामींना कळवली. स्वामींचे उलट टपाली उमरग्यास पत्र आले. माझ्याही मनांत बरेच वेळा असे येई की अपवाद म्हणून 'डोके ठेव' असे तुला म्हणावे. पण विस्मरणामुळे ते राहून गेले. पण प्रभू तुझी ती इच्छा पूर्ण करेल. तुला ध्यानाला बसले असतां प्रत्यक्ष दर्शन होईल.

किंवा हा देह असेपर्यंत पुन्हां परांड्यास येशील अशी कृपा प्रभू करतील. त्या प्रमाणे पुढे घडले. केवढी शिष्याविषयीं तळमळ.

शेवटी स्वामींच्या प्रायोपवेशनाचे निश्चित झाले. माझ्या मनाची घालमेल सुरू झाली. स्वामी अगदी थोड्या दिवसांचेच सोबती आहेत. त्यांना काय विचारावे कांही कळेना मी दर दिवसांनी पत्र पाठवी व स्वामी पण त्या पत्राचे उत्तर लगेच पाठवत.

स्वामींची निरवानिरव चालू होती. उस्मानाबादला गरड वकिलांचे घरी एका लहानशा चंदनांचे पेटीत स्वामींचा व त्यांच्या गुरूंचा (वासुदेवानंदांचा) फोटो होता. ती पेटी स्वामींनी मागवून घेतली व मला दिली. बऱ्याच आपल्या वस्तु आपल्या हाताने त्यांनी अनुग्रहीतांना दिल्या. पांघरण्याच्या शालीच्या गोमुख्या शिवून बऱ्याच शिष्यांना दिल्या.

प्रायोपवेशनाचा दिवस ठरला. फाल्गुन वद्य प्रतिपदेपासून अन्न व पाणी वर्ज्य केले. सर्व शिष्यवर्गाला पत्रे गेली. २० तारखेपर्यंत म्हणजे नाथषष्ठीला या देहाचे निर्वाण होईल असे पत्रही मला आले. तू अवश्य ये असेही पत्रात होते. पुन्हां दुसरे दिवशी तार आली की तू ताबडतोब ये. ह्यांनी परवानगी दिली. सकाळच्या गाडीने जाण्याची तयारी केली पण प्रारब्धकर्म आडवे आले आणि मासिक पाळी चालू झाली.त्यावेळी मनाची काय अवस्था झाली हे लिहिता येत नाही. स्वामींच्या पत्रातून प्रायोपवेशन काळात कोणालाही पत्रे लिहिली जाणार नाहीत असे होते. तरीपण मला २ पत्रे व तार आली पण माझे कर्म आड आले म्हणून फारच वाईट वाटले. लगेच रात्री मी पत्र लिहिले की अशी अशी अडचण आली, मी ५ वे दिवशी येते. त्याप्रमाणे ५ वे दिवशी स्नान करून परांड्यास गेले. त्याच दिवशी पत्र पोचले होते व स्वामी वाट पाहातच होते. गेल्यावर आधी लांबून दर्शन घेतले व नंतर स्नान करून सौ. माईंचे सोवळ्याचे पातळ नेसून स्वामींच्या पायावर डोके ठेवून दर्शन घेतले. मनाला खूपच समाधान वाटले. आपला नेम बाजूला ठेवून स्वामींनी माझी बऱ्याच दिवसांची इच्छा पूर्ण केली. त्यांच्या प्राणोत्क्रमणाचा दिवस नाथषष्ठीचा ठरला असतांही ४ दिवस या अज्ञान बालिकेकरितां यातना सहन करून, दर्शन देऊन त्याच दिवशी देह ठेवला. शेवटची आरती माझ्या हातून झाली. फाल्गुन वद्य दशमीला रात्री १ वाजता निर्वाण झाले. त्या आठवणी झाल्या की कांही सुचत नाही. मति कुंठित होते. वाणी मौनावते.! मग वर्णन कशाचे करणार!

या मनाला स्वामींचे निर्वाण झाले असे वाटतच नाही. फक्त सगुणरूपाचा त्याग केला. पण पूर्ण विश्वांत व्यापून राहिले. आणि आश्वासन दिल्याप्रमाणे वेळोवेळी सहाय्य करतात. त्याची १-२ उदाहरणे. पहिल्या पुण्यतिथीस मी परांड्यास गेले असतांना सगुण रूपाची अगदीं तीव्रतेने आठवण झाली, व समाधीपुढे ध्यानास बसले असता 'अखंड मंडलाकार' स्वरूपाचे दर्शन झाले. स्वामी असतांनाही एकदा हा अनुभव आलेला होता. यावरून सगुण व निर्गुण दोन्ही स्वरूपे एकच आहे हे दाखवून दिले. पुढे १-२ वर्षांनी साधनेत व भावनेत संगतीमुळे मलिनता यायला लागली. याची जाणीव मात्र स्वामींच्या कृपेने सतत जागृत होती. आपण परमार्थ मार्गातून घसरत आहोत अशी सारखी तळमळ लागली. त्यावेळी मी स्वामींची प्रार्थना करी, की सद्‌गुरुनाथा आपला मुद्रांकित असलेला जीव असा वाया जाऊ देऊ नका. खरेच त्यांनी ओ दिली. माझ्या यजमानांची बदली अहमदपूरला झाली. तिथे चूडामणी महाराज म्हणून एक संत होते. त्यांची संगति जणु स्वामींनीच घालून दिली.

स्वामींनी मला दररोज महादेवाच्या देवळात जाऊन महादेवास पाणी व बिल्वपत्र वाहण्यास सांगितले होते. या नियमात इथे आल्यापासून खंड पडत होता. कारण महादेवाचे देऊळ बरेच दूर होते.

एके दिवशी डोळे मिटून महादेवा समोर बसले असतां पिंडीत मला चूडामणी महाराजांचा चेहरा दिसू लागला. यावरून मला असे वाटले की जणु स्वामींनीच अशी सूचना केली की तू आता यांचे दर्शन घेत जा. स्वामींनाच माझ्या अंतकःरणावर बसत चाललेली मलिनता पाहवली नाही म्हणून त्यांनी संगति घालून दिली. अनन्य भक्तावर सद्‌गुरूंचे किती प्रेम असते याची साक्ष पटली.

स्वामींच्या निर्वाणाच्या वेळचा प्रसंग. स्वामींनी सर्वांना अगोदरच सांगून ठेविले होते की कदाचित् आम्हाला विस्मरण होईल तरी अगदी शेवटच्या क्षणाला शालिग्राम-शिला हृदयाजवळ ठेवा, व तुळसीपत्रे मुखात घाला. परंतु इतकी मंडळी बसली असतांनाही ते कोणाच्याही लक्षात आले नाही. त्यांनी स्वतःच मागून घेतले व शालिग्राम जरा खाली पोटावर ठेविला गेला असतांना आपल्या हातांनीच तो हृदयाशी ठेवून, ध्यानास बसले असतांना

सारखे डोळे उघडे ठेऊन प्राण ब्रह्मरंध्रात नेले. मनुष्यास अंगातील कपडे काढायला तरी प्रयत्न करावा लागेल, इतक्या सहजतेने त्यांनी देह वेगळा केला व इहलोकीची यात्रा संपवून ब्रह्मांडात विलीन झाले.

ते स्मृति रूपाने सतत आपल्या जवळ असतातच. कुठे नाहीत असे स्थानच ठेविले नाही.

*जय जय गुरु महाराज गुरु । जय जय परब्रह्म सद्‌गुरु ॥*

* * *

## कै. श्री. लंबोदर काशीकर, सातारा

मी प. पू. रामकृष्ण परमहंस यांच्या शिष्य परंपरेतला. मला उपासना करण्याच्या दृष्टीने मी माझ्या घराच्या हॉलमध्ये प.पू. रामकृष्णांची मोठी तसबीर ठेवून तेथे ध्यानाला, भजनाला, बसत असतो. माझ्या हॉलला मठाचे स्वरूप आले आहे.

श्री स्वामींजींचा मुक्काम साताऱ्यास असतांना ते या हॉलमध्ये येत असत. ते ठिकाण त्यांना फार आवडे.

एकदां घरी हॉलमध्ये स्वामींचे प्रवचन चालले असतांना मी बाहेरून घरी आलो. प्रथम रामकृष्ण परमहंसांचे फोटोस नमस्कार करण्यास गेलो तो ते तेथे नाहीत असा मला भास झाला. माडीवर खाली असे २-३ वेळा जाऊन आलो व गडबडल्यासारखे झाले. स्वामींचे प्रवचन चालूच होते. मी स्वामींचेकडे पाहिले तर स्वामींचे ठिकाणी रामकृष्ण परमहंस स्वामीच मला दिसले. जणु. प.पू. रामकृष्णांनीच मला दाखवून दिले की मी व इथे बसलेले स्वामी हे दोन नाही. एकच आहोत.

* * *

## श्री. सुशिला गोडे, पुणे

श्रीस्वामीजींचा मुक्काम इस्लामपूरला डॉ. वैद्य यांचे घरी होता. त्यावेळी ता. ८-७-५६ साली मला श्रीस्वामींकडून दीक्षा व राममंत्र मिळाला. त्यावेळी दुपारच्या वेळी सौ. कमलाबाई वैद्य यांचे घरी आम्ही भगिनी तुलसीरामायण वाचनासाठी जमत होतो. रामायणी भगिनींच्या सहवासात

फारच सुंदर अनुभव येत असत. पुष्कळ वेळा स्वप्नांत श्री राम, लक्ष्मण, श्री. गणपती यांचे दर्शन होई. श्री रामाचे भव्य दिव्य स्वरूप दिसे व ते सर्वत्र उभे आहेत असे दिसे.

प.पू. स्वामींजी वैद्यांचेच घरी माडीवर तुलसीरामायणावर टीका लेखनाचे कार्य करीत असत. श्री. स्वामींच्या सहवासात असतांना पुष्कळ काव्यस्फूर्ति होत असे. श्री रामावर पुष्कळशी पदे त्या काळात सहज स्फुरली.

पण अनुभव असा आला की साधनेत खंड पडू लागला की प्रगतीही मंदावते. अखंडपणे साधना वा उपासना यासाठी सत्संग हवा.

* * *

## श्री. श्रीपाद जर्नादन दीक्षित, नरसोबावाडीकर

मी किर्लोस्कर हायस्कूल, किर्लोस्करवाडी येथे शिक्षक असतांना, श्रीस्वामी प्रज्ञानानंद सरस्वती हे एक अधिकारी सत्पुरूष आहेत असे मला समजले, नरसोबावाडीच्या दीक्षित स्वामीमहाराजांच्या कुलपरंपरेतील आम्ही दीक्षित मंडळी १९६५ च्या सप्टेंबर आक्टोबर मध्ये मी माझ्या वैयक्तिक अडचणी २ पत्रे लिहून स्वामींजींना कळवल्या होत्या. त्या पत्रांना स्वामींनी ताबडतोब उत्तरे लिहून जे कांही मार्गदर्शन केले. त्यातील जरूर तो मजकूर सर्वांनाच मार्गदर्शनपर असल्याने देत आहे.

**पहिल्या पत्रात स्वामीजी लिहितात –** तुमच्या पाठीशी अशी दिव्य कुलपुण्याई असतां तुमची अशी दशा होण्याचे कारण आचारविहीन व फॅशनचे गुलाम बनलेले जीवन हेच होय! तरी आतां 'मानवता पूर्तिसाधन व संध्योपासना' या ग्रंथात सांगितल्याप्रमाणे पहाटे उठण्यापासून सर्व कर्मे यथाविधि करा. रोज १२०० गायत्री जप सूर्योदयाबरोबर आटपेल असा सुरू करा म्हणजे चार महिन्यांत तुमच्या उपास्य देवतेचे ज्ञान तुम्हास नक्की होईल. मंत्रसिद्धी होण्यास सत्यपालन, परान्न न घेणे व परिग्रह न घेणे हे पथ्यपालन केलेच पाहिजे.

विवाह झाल्यावर उभयतांनी कुलदेवतेच्या दर्शनास जाऊन आला नसल्यास, शक्यतो लवकर कुलदेवता दर्शन दोघांनी करून आले पाहिजे.

चहा – कॉफी पिणे अजिबात सोडा. ते एक बाटण्याचे व आरोग्यविघातक

अगदी सोपे पण व्यर्थ खर्चाचे साधन आहे.

पंचमहायज्ञ, आचारपालन यथाविधि संध्या करून सोवळ्याने जेऊन इतर वेळ सापडेल त्यात 'हरे राम हरे राम राम राम हरे हरे । हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।। या ३२ अक्षरी मंत्राचा जप करावा, या मंत्राला गुरु, न्यास ध्यान आदि लागत नाही. (कैवल्योपनिषद) यातील मंत्राचा उच्चार पूर्ण झाला पाहिजे.

**दुसऱ्या पत्रात स्वामींजी लिहितात –** शाळा कॉलेजातून वागताना परान्न, चहा, स्पर्शास्पर्श या गोष्टी पाळणे किती अशक्य झाल्या आहेत इत्यादि आपले म्हणणे कमकुवत मनाचे लक्षण आहे. ते सत्य नाही. हा देह सुद्धा हायस्कूलमध्ये २० वर्षे नोकरी करीत असतां अनेक वर्षे चहा – कॉफी परान्न – ब्राह्मण व भगिनी इत्यादी नातेवाईकांकडेही घेत नव्हता व दाढी जटा ठेवल्या गेल्या. या कालातही शाळा हायस्कूलातील २०/२५ वर्षांच्या तरूणांनी सुद्धां चहा कॉफीपान बंद करून विना औषध रोगमुक्तता करून घेतली आहे. चहा, कॉफी, परान्न न घेतले तर काय कोणी गर्दन कापील की नोकरी जाईल? पण जीवाला अर्थात् बुद्धीला जे आवडते ते करण्याचे मन सोडीत नाही व लंगड्या सबबी ते सांगते. अनेक ब्राह्मण ब्राह्मणेतर सुशिक्षित तरुण – वृद्ध स्त्रियांनी सुद्धां ते करण्याचे सोडून रोग मुक्तता प्राप्त केली.

स्वामींजींचे वरील विचार स्पष्ट, सत्य, आत्मविश्वासपूर्ण आहेत. त्यांचे मार्गदर्शन ज्यांना लाभले असेल ते धन्य होत. खऱ्या संताशिवाय इतकी तळमळ, जिव्हाळा, आपुलकी कोठे दिसणार? मी त्यांचा अनुग्रहित नाही, पण ते समाधिस्थ झाल्याची वार्ता कळली तेव्हां मी हतबुद्ध तर झालोच पण दर्शन न देतांच हा मार्गदर्शक इहलोकांची यात्रा संपवून निघून गेला याचेच अनिवार दुःख झाले.

* * *

## कै. डॉ. कृष्णाजी शंकर दामोदरे

श्री स्वामींजींचा मुक्काम चासला असतांना मला त्यांचे प्रथम दर्शन झाले व नंतर कांही काळाने मला अनुग्रहही मिळाला. मला सिद्धींबद्दलचे

औत्सुक्य असल्यामुळे त्यासाठी मला कांही उपासना मिळावी म्हणून मी स्वामींना विनंती केली, तेव्हां त्यांनी मला प्रकाशरूपाचे ध्यान सांगितले होते. यासाठी, रात्री १२ वाजता स्नान करून समोर दिवा ठेवून व बेंबीला चंदनाच्या गंधाचा त्रिकोण लावा व त्या त्रिकोणाकडे दृष्टी ठेवून गायत्रीचा जप करा, व असे १। वर्ष करा. व मुख्य म्हणजे या काळात ब्रह्मचर्य पाळले पाहिजे. उपासना अखंड झाली पाहिजे असे नियम सांगितले.

अशी उपासना पूर्ण झाली तर तुम्हाला भिंतीपलिकडचे सुद्धां दिसूं लागेल, भिंतीपलिकडचा कागदही वाचू शकाल, अशी दिव्य दृष्टी प्राप्त होईल परंतु ब्रह्मचर्य मात्र टिकले पाहिजे. सावध राहा असे बजावले.

पण इतके बजावूनही आमच्याकडून प्रमाद घडलाच. पण तरीही या उपासनेचे फळ म्हणून मला ज्योतिष शास्त्राचे ज्ञान, या विषयाचा कांहीही अभ्यास नसतां होऊ लागले.

असेच एकदा एका बाईच्या प्रसूतीकरिता मला जावे लागले. मी तिला तपासले. मूल आडवे आले होते त्यामुळे ऑपरेशन करून मूल काढावे लागणार अशी स्थिती होती. माझ्या जवळ जरूर ते साहित्य नव्हते व हॉस्पिटलही जवळ नव्हते. तेव्हा शेवटचा उपाय म्हणून मी श्रींचे स्मरण करून, या बाईला सोडवावे म्हणून कळकळीने प्रार्थना केली व पोटावरून हात फिरवला तेव्हां मला जाणवले की मूल फिरले आहे. नंतर त्या बाईची ताबडतोब सुटका झाली व तो मुलगा पायाळू जन्माला आला.

स्वामींच्या आज्ञेप्रमाणे मी नित्य वैश्वदेव करीत असे. एकदा पत्नीशी काही वादविवाद झाल्यामुळे वैश्वदेवाला तिने वेळेवर अग्नी दिला नाही. कुंडात गोवऱ्या वगैरे लावून मी डोळे मिटून आसनावर बसलो. आणि आश्चर्य म्हणजे अग्नी आपोआप पेटला व वैश्वदेव यथासांग पार पडला. दुसऱ्या दिवशी श्रींच्या दर्शनास गेलो असतां मला पाहिल्यावर ते म्हणाले, 'अग्नी नारायणाचे दर्शन झाले?' तेव्हां मी म्हटले, 'होय, आपल्याच कृपेने मी पावन झालो.'

असाच एकदां श्रींच्या दर्शनास म्हणून निघालो. वाटेत खडीसाखर घेतली व मारुतीच्या देवळावरून जाऊ लागलो. एकदम आवाज आला की, 'स्वामींना खडीसाखर नको. तपकीर ने.' आसपास तर कोणीच नव्हते. मी

मारुतीच्या देवळासमोर त्या वेळी होतो तेव्हां मारुतीरायांचाच आदेश असेल असे समजून मी परत गावात जाऊन तपकीर घेऊन स्वामींचे दर्शनास गेलो. तेव्हां स्वामींनी विचारले की, 'खडीसाखर का नाही आणलीस?' तेव्हां झालेली हकीगत त्यांना सांगितली. स्वामी म्हणाले, 'तुझी उपासना आतां सिद्ध व्हावयास लागली आहे. तेव्हा अशीच उपासना चालू ठेवावी.'

आणखी एक आठवण म्हणजे एके काळी माझी आर्थिक स्थिति अत्यंत कठिण झाली होती. परिस्थिती अत्यंत खालावली, उधारी वसूल होईना म्हणून मोठ्या विवंचनेत पडलो – दुसऱ्या दिवशी लागणारे धान्यही घरांत नव्हते. म्हणून कांही उधारी वसूल होते का ते पाहण्यास घराबाहेर पडलो. इकडे घरी एक बाई पाटीमध्ये सर्व शिधा घेऊन घरी आली व माझ्या पत्नीस म्हणाली की हा शिधा डॉक्टरांना द्या. मी जवळच्या वाडीतूनच आले आहे. पत्नीने तिला कुंकू लावल्यावर ती गेली. घरीं आल्यावर मला हे वृत्त समजले. पुढे हळू हळू माझी परिस्थिती बदलली व सर्व व्यवस्थित चालू लागले. ही हकिकत मी जेव्हां स्वामीना सांगितली तेव्हा ते म्हणाले, 'अरे ती अन्नपूर्णा होती.'

याच उपासनाकाळात एकदा मी नेहमी प्रमाणे गायत्रीदेवीचे आवाहन करून पूजन केले, व बाहेर कोणी पेशंट आला म्हणून घाईने दवाखान्यात गेलो. परत आल्यानंतर देवघरात कोणीतरी आहे असा भास झाला. म्हणून कोण आहे? असा मनांत विचार आला. तेव्हां आतून आवाज आला की विसर्जन करावयास विसरला आहेस, म्हणून थांबले आहे. तेव्हां माफी मागून परत स्नान करून, देवीचे विसर्जन केले. स्वामी नेहमी म्हणत असत की देवांना आवाहन केल्यानंतर देवता येतात. पूजा झाल्यानंतर त्यांना स्वस्थानी जाण्यासाठी त्यांचे विसर्जनही करावे.

या घटनेने आवाहन- विसर्जन ही सत्य गोष्ट आहे. याची खात्री झाली.

* * *

**कै. ज. चि. ओक, सांगली**

इस्लामपूर येथे श्री. ना. भा. जोशी उर्फ जोशीकाका १९५०/५१ साली तेथील विद्यामंदिर हायस्कूलमध्ये शिक्षक होते. सायंकाळी त्यांचे

घरी प्रवचन, भजन, चाले. प्रवचनास आम्ही उभयतां जात असू. तेथेच त्यांचा परिचय झाला. त्यांचे कडून प. पू. स्वामींची माहिती व महती समजली. आणि त्यामुळे स्वामींचा मुक्काम इस्लामपुरात डॉ. वैद्य यांच्या घरी झाला तेव्हां आम्ही दर्शनास जात होतो. राहण्याची व्यवस्था त्यांच्या बंगल्यात स्वतंत्र खोलीत केलेली होती. त्यावेळी स्वामीजी रामचरित मानसावरील मराठी टीका लिहीत होते. डॉक्टरांचा व आमचा घरोबा असल्याने साहजिकच आम्ही स्वामींच्या दर्शनास जात होतो. डॉ. नी व सौ. कमलाबाई यांनी श्रींच्या कडून अनुग्रह घेतलेला होता, आणि आम्ही पतिपत्नीनीही ही संधि सोडू नये, स्वामी फार मोठे सत्पुरुष आहेत, असे सांगितल्यावरून मी स्वामींना आम्हांस अनुग्रह मिळावा म्हणून, विनंती केली. स्वामी आम्हाला म्हणाले 'तुम्हाला कांही परमार्थाची गोडी आहे का? कांही साधन सांगितले तर करणार आहात का?' आम्ही 'होय' म्हटल्यावर त्यांनी पंचाग काढून शुभ दिवस पाहिला आणि डोक्यावरचे सर्व केस काढून थोडी शेंडी ठेवून ठरल्या दिवशी या असे सांगितले. 'होय' म्हणून घरी आलो. घरी आल्यावरं विचार आला की मंत्र दीक्षा घेण्याचे वेळी, गुरु मस्तकावर हात ठेवतात.पण त्यासाठी केस काढण्याची काय जरूरी? हे कांही आपल्याला पटत नाही. हा (मूर्ख) विचार बळावला. व त्यातच पत्नीनेही भर घातल्याने ठरलेल्या दिवशी दीक्षेस गेलोच नाही. २-३ दिवस तिकडे फिरकलोच नाही. पण मग दर्शनास तरी जाण्याची बुद्धी झाली. ठरलेल्या दिवशी दीक्षेसाठी का आला नाहीस असे स्वामींनीही विचारले नाही. पण हळू हळू माझेच मन मला म्हणू लागले, की दर महिन्याला पैसे देऊन जे केस कापायला लागतात, आणि जे नित्यनूतन पुन्हा पुन्हा उगवतच असतात. ते एकदां संपूर्ण काढले तर बिघडले कुठे? डोक्यावरच्या केसावर सुद्धा आपले इतके ममत्व हे कांही बरे नाही. या विचारासरशी मी स्वामींकडे गेलो आणि माझी चूक झाली म्हणून सांगितले. आणि पुन्हा दीक्षेसाठी केव्हां येऊ म्हणून विचारले. यावर स्वामी हसले आणि पुन्हा एकदा त्यांनी शुभ दिवस पाहिले. स्वामींनी आमची थोडीशी परीक्षा पाहिली. पण आम्ही नंतर पास झालो. पुढे स्वामींची यथाविधि पूजा वगैरे करून आम्ही उभयतांनी दीक्षा व मंत्र घेतला. स्वामींचे आशीर्वाद

घेतले. पुढे एके दिवशी स्वामी मला म्हणाले की आतां असे कर की पानात एकदाच जेवढे वाढलेले असेल तेवढे सर्व एकत्र करून असे जेवत जा पाहू! होईल का तुमच्याने? तेव्हां मी होय म्हटले, व त्या प्रमाणे सकाळ संध्याकाळ जेवू लागलो. १०/१२ दिवस झाल्यानंतर स्वामींनी विचारले की काला करून जेवतो आहेस का? कसे काय वाटते? मी सांगितले की चांगले वाटते. सर्व एकत्र केले की तेही चांगले लागते. मग स्वामी म्हणाले, 'मग आतां तसे बंद कर. नेहमीप्रमाणे जेवत जा.' स्वामीनी पाहिले की याला जिभेचे चोचले किती आहेत । पण जिभेचे चोचले नाहीत असे दिसल्यावर काला बंद करण्यास सांगितला. अशी हळू हळू नकळत परीक्षा घेत असत.

स्वामी पहाटे ३।। ला उठत शौच मुखमार्जन, स्नान, गुरुपूजा वगैरे आटोपल्यावर ५-५।। ला ध्यानास बसत. त्यावेळी आम्ही कांही शिष्यमंडळीही त्यांच्या सान्निध्यात ध्यानास बसत होतो. त्यांच्या सान्निध्यामुळे ध्यानाचे वेळी सर्वांनाच उत्तम अनुभव येत.

त्यानंतर ७ चे सुमारास स्वामी कॉफी घेत. त्यानंतर दुपारी भिक्षेपर्यंत टीकालेखन करीत. मग भिक्षा. नंतर थोडीशी विश्रांती झाल्यावर पुन्हां टीकालेखनास बसत ते सायंकाळी ५।। वाजतां स्नानास उठत. पुन्हां स्नानानंतर संध्याकाळचे ध्यानास तासभर बसत. नंतर रात्री १० वाजेपर्यंत भजन वगैरे होई. भजनास आलेली मंडळी गेल्यानंतर स्वामींच्या लेखनास पुन्हा सुरुवात होई ते रात्री १२।।-१ पर्यंत चाले. व पुन्हां ३।। ला पहाटे उठून नित्याचा कार्यक्रम चालू होई. या काळात स्वामींनी कंटाळ्याने कधी जांभई दिलेली कांही पाहिली नाही. ते म्हणत दिवसातून १।।-२ तास जरी समाधी अवस्थेत राहिले तरी दिवसभर मुळीच थकवा येत नाही. शरीर कार्यक्षम राहते. १९५२ मध्ये स्वामी ५९ वर्षांचे होते पण ते चाळिशीचे वाटत. गौर वर्ण, पुष्ट अवयव, डोळे घारे आणि भेदक आणि चेहऱ्यावर बुद्धिमत्तेचे तेज असे श्रींचे स्वरूपवर्णन म्हणतां येईल. मला एकदां ते म्हणाले की ३५ वर्षांचा होतो, त्यावेळी शारीरिक तक्रारी होत्या, पाठीला पोंक आलेले होते. त्यावेळी मी ५०-६० वर्षांच्या म्हाताऱ्यासारखा दिसे पण ब्रह्मचर्य व योगसाधनेमुळे आतां साठीत ४० वर्षांचा असल्यासारखा दिसतो.

या टीकालेखनाच्या काळात अयोध्येहून प्रसिद्ध होणाऱ्या मानसावरील

मानस–पीयूष या हिंदी बृहत् टीकेतही स्वामींचे लिखाण प्रसिद्ध होत असे. हिंदी टीकेचे संपादन अयोध्येचे श्री. अंजनीनंदन शरणजी हे वृद्ध विद्वान करीत असत.

मी अधूनमधून सकाळी १०/११ चे सुमारास स्वामींचेकडे पुन्हां जात असे. त्यावेळी त्यांचेकडे आलेली पत्रे पाहावयास मिळत. एका पत्रात श्री. अंजनीनंदन शरणजींनी लिहिले होते की हल्ली दृष्टी मंद होत चालली आहे. संपादनकार्य कठिण होत चालले आहे. श्रीरामप्रभूची इच्छा काय आहे कोण जाणे? या वेळी त्यांचे वय सुमारे ८० वर्षांचे असावे.

पत्र वाचून स्वामी मला म्हणाले की शरणजींनी मोठे कार्य आरंभिलेले आहे. त्यांची दृष्टी गेली तर कार्य थांबेल. माझी एका डोळ्याची दृष्टी त्यांना दिली तर त्यांचे कार्य सुरु राहील. हे बोलणे एवढ्यावरच संपले. मला त्यावेळी त्यातला विशेष अर्थ समजला नाही. पुढे सुमारे १५–२० दिवसांनी श्री. शरणजींचे टीकेबाबत नेहमीप्रमाणे पत्र आले. व त्यात शेवटी त्यांनी म्हटले, होते की, श्री रामकृपेने माझ्या दृष्टीत चांगलाच फरक जाणवत आहे. आतां बरेच चांगले दिसू लागले आहे. पत्रातील या मजकुराबद्दल स्वामी कांहीच बोलले नाहीत. पण मला आठवले की १५–२० दिवसांपूर्वी स्वामी म्हणाले होते की एका डोळ्याची दृष्टी शरणजींना द्यावी, तसेच हे झालेले दिसते. मी स्वामींना मुद्दाम या बद्दल विचारले तेव्हां ते म्हणाले की संकल्प करून माझ्या एका डोळ्याची शक्ति त्यांना दिली. आतां माझ्या एका डोळ्याची दृष्टी मंद होत आहे. पण पुढील ४ – ५ महिन्यात गेलेली नेत्रशक्ति मी पुन्हां आणू शकेन. आणि त्या प्रमाणेच ४/५ महिन्यांनी स्वामींचीही दृष्टी पूर्ववत् झाली. पण मध्यंतरीच्या काळात स्वामींचे टीका लेखन एकाच डोळ्याच्या सहाय्याने चष्मा लावून चालू होते.

आपण स्वत: दु:ख सोसून दुसऱ्याचे दु:ख कमी करायचे व त्या बद्दल वाच्यताही करायची नाही म्हणूनच अशा व्यक्तींना महात्मा म्हणायचे! आम्हां मंडळींना मरणोत्तर नेत्रदान करून कोणाला दृष्टिलाभ होत असेल तर तेवढीही मदत करवत नाही.

एकदा श्रींचे दर्शनास गेलो असतांना एका व्यवहाराबाबत माझी वागणूक बरोबर झाली नाही अशी त्यांची समजूत होऊन स्वामी मला बरेच बोलले

व रागावले. माझ्या दृष्टीने त्या व्यवहारातील माझी बाजू बरोबर होती अशी माझी खात्री असल्याने स्वामी बोलत होते त्यावेळी मी नम्रतापूर्वक हात जोडून उभा होतो. स्वामींचे बोलणे संपल्यावर मी नेहमी प्रमाणे दंड प्रणाम करून ज्या दुसऱ्या कामासाठी त्यांच्याकडे गेलो होतो त्या बाबत बोललो. त्यावेळी स्वामी अगदीं शांत होते. १० मिनिटांपूर्वीचा क्रोध त्यावेळी मुळीच नव्हता. ते शांत आहेत असे पाहून मी म्हटले की मघाच्या बाबतीत मला थोडे सांगायचे आहे. आपली आज्ञा असेल तर सांगतो. त्यांनी परवानगी दिल्यावर मी माझी बाजू स्पष्ट केली. ती ऐकून ते म्हणाले, 'बरं बरं' तुझी चूक दिसत नाही. मला वाटते स्वामींनी माझी परीक्षाच घेतली. गुरूपुढे शिष्य वादविवाद करतो का हे त्यांना पहावयाचे असेल किंवा माझेवर रागावून माझ्यावर येणाऱ्या एकाद्या आपत्तीचेही त्यांनी निराकरण केलेले असेल. संतांच्या वागणुकीचा आपल्याला कार्यकारणभाव समजत नाही.

स्वामींनी इस्लामपूर सोडल्यानंतर बरीच वर्षे त्यांचा सहवास लाभला नाही. अधून मधून थोडासा पत्रव्यवहार चालू असे. स्वामींनी प्रायोपवेशनाचा निर्णय घेतल्यावर आम्हास पत्राने कळवले होते. व आधीच येऊन जा, मागून मौनामुळे बोलतां येणार नाही, असा पत्रातील मजकूर वाचून आम्ही दोघे ताबडतोब परांड्यास गेलो. स्वामी आनंदात होते. आम्हास वाईट वाटलेले पाहून ते म्हणाले, ''रडायला काय झाले, देह हा केव्हांतरी जाणारच. देह गेला तरी स्वामी कुठे गेलेला नाही. कळवळ्याने हांक मारा म्हणजे स्वामी कुठे दूर नाही.''

आता हा कळवळा, प्रेम, गुरुनिष्ठा, ज्या प्रमाणात आमच्या जवळ असेल त्या प्रमाणात आम्हांस त्यांचा अनुभव येईल.

* * *

### श्री. मंगला. ज. ओक, सांगली

परमार्थात कांही विशिष्ट टप्प्यानंतर सद्गुरूंच्या कृपेची अत्यंत आवश्यकता असते असे सर्वच संतानी आवर्जून सांगितले आहे. प्रथम जिज्ञासा उत्पन्न झाल्यावर सहजच वाचन, श्रवण, मनन होते, मग आवड उत्पन्न होते. सहजच विषयांबद्दलचे वैराग्य उत्पन्न होऊन कोणातरी सत्पुरुषाचे मार्गदर्शन

लाभावे अशी तळमळ उत्पन्न होते व ईश्वरकृपेने सद्गुरूंची गांठ पडते.

पण आमच्या उभयतांच्या बाबतीत असे झाले की आम्ही सर्वसाधारण संसारी माणसे असतांना अवचित, पूर्वसुकृतच असे जबरदस्त असेल की अत्यंत थोर श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा सद्गुरुंचा कृपाप्रसाद आम्हांस प्राप्त झाला. तसे आम्हां दोघांनाही बाळपणी उत्तम संस्कार व अनेक थोर सत्पुरुषांचा सहवास लाभलेला होता. पण तरुणवयात म्हणावी तशी परमार्थाची खास आवड कांही नव्हती.

साधारण १९५१–५२ साली आम्ही इस्लामपुरात होतो. कधी कधी श्री. जोशीकाकांच्या प्रवचनास जात होतो. श्री. जोशीकाका हे एम.ए.बी.टी., एल.एल.बी झालेले शिक्षक होते. संध्याकाळच्या वेळी घरी प्रवचने करीत, थोडे भजन करीत, स्तोत्रें वगैरे म्हणत. ऐकून समाधान वाटे. त्यांच्या शांत, सौम्य, समाधानी अशा व्यक्तिमत्त्वाचा व पवित्र वाणीचा सहजच चांगला परिणाम होई. त्यांच्यामुळेच आम्ही खरेतर या मार्गात ओढलो गेलो. त्यांच्यामुळेच श्री. स्वामींच्या बद्दलची माहिती आम्हांस कळली.

पुढे डॉ. वैद्य यांचे घरी स्वामींजींचे येणे झाले. डॉ. वैद्य हे यांचे मित्र, व सौ. कमल वैद्य या माझ्या मैत्रिण असल्याने व त्यांनीही स्वामींचेकडून नुकताच अनुग्रह घेतलेला असल्याने त्या उभयतांच्या सांगण्यावरून आम्हासही सद्गुरुकृपेचा लाभ झाला.

१९५२ साली आम्ही उभयतांनी अनुग्रह घेतला. श्रीस्वामी म्हणत असत की पतिपत्नी ही संसाररथाची दोन चाके. दोन्हीही समान असली म्हणजे चांगले. एकाने अनुग्रह घेतला व त्यांचे चित्त परामार्थाकडे वळले व दुसरा सांसारिक विषयांत निमग्न राहिला तर त्यांच्यात सुसंवाद राहात नाही, म्हणून दोघांनीही अनुग्रह घ्यावा. आम्ही दोघांनीही अनुग्रह घेतला.

घरी आमच्याने नियमितपणे ध्यानास बसणे, व भजन वगैरे होणार नाही म्हणून स्वामींनीच आम्हांला वैद्यांच्या घरी पहाटे व सायंकाळी ध्यानासाठी व भजनास येण्यास सांगितले होते. व त्या प्रमाणे जाऊन आम्ही स्वामींचे समोरच ध्यानास बसत होतो. त्यांच्या सान्निध्याच्या प्रभावामुळे ध्यानातील पुष्कळ अनुभव येत असत.

स्वामींनी यांना राममंत्र व मला देवी मंत्र दिलेला होता. स्वामी नेहमी

म्हणत की आपल्या उपास्य देवतेशी आपण एकादे नाते जोडावे व त्या नात्याप्रमाणे कळवळून हांक मारावी. मला म्हणाले होतें की, तू महालक्ष्मीशी आईचे नाते जोड व तू तिची लहान मुलगी आहेस हा भाव मनांत ठेव. तुझा देवीमंत्र जबरदस्त शक्तिशाली आहे. जितका जपावर तडाखा देखील तितके जलद अनुभव तुला येतील. रोज कमीतकमी ८०० व खरे तर रोज ८००० जप करून तर पाहा काय होते ते! तसेच रोज देवी माहात्म्य निदान एकतरी अध्याय वाचीत जा. आणि दर शुक्रवारी एका सवाष्णीला हळदीकुंकुवास बोलावून ती प्रत्यक्ष लक्ष्मीच घरी आलेली आहे या भावनेने तिला हळदीकुंकु लावून, दूध प्यायला देऊन, गव्हाने व तांदुळाने ओटी भरून तिचे पाय धरून नमस्कार करीत जा. अशी कांही उपासना त्यांनी सांगितली होती. पण माझा जप कधी होई, कधी नाही. कधी एखादीच माळ मी घाई घाईने करीत असे. वाचनाचीही तीच गत. मग स्वामींच्या पुढे गेल्यावर ते विचारतील, रागावतील म्हणून चटकन् नमस्कार करून त्यांच्या समोरून दूर होई. पण ध्यानासाठी गेल्यावर कधी कधी ते आळसाबद्दल बोलत. रागावत व म्हणत की अग तुमच्या भल्यासाठीच रागवावे लागते. तू नाही का तुझ्या मुलीवर तिने तुझे ऐकले नाही की रागावत? यांना रामउपासना दिलेली होती. व रामउपासना फलद्रूप होण्यासाठी आधी शिवउपासना घडली पाहिजे असे ते म्हणत असत. यासाठी आम्हां दोघांनाही सोळा सोमवारचे व्रत करण्यास सांगितले होते. कसलीही चालढकल न करतां शास्त्रोक्त रीतीने व मनापासून ते झाले पाहिजे म्हणून बजावून सांगितले होते. गणेशपूजन व शिवपूजन करीत असतानां प्रत्यक्ष त्या देवता येऊन पूजेचा स्वमीकार करतात या भावनेने व्रत करा असे म्हणत. त्या प्रमाणे आमचे १६ सोमवार निर्विघ्नपणे व उत्तमप्रकारे पार पडले. पूजा करताना खरेच त्या देवता आल्या आहेत अशी भावना होई. दर्शन होई व अतिशय आनंद वाटे. शेवटी उद्यापनाची मेहुणे बोलावितांनासुद्धा ज्यांना देवधर्माची आवड आहे, जे कांही आचारनिष्ठ आहेत, चारित्र्यशील आहेत, पोक्त आहेत, सोवळे नेसून जेवायला बसतील अशा दांपत्यांना बोलवा असे म्हणत. नाहीतर बरोबरीच्या मित्र-मैत्रिणींना त्या निमित्ताने बोलावू, इतर गप्पाटप्पा करू, हास्य विनोद करू असा विचार नको. सहजच एकत्र

जमणे झाले अशा भावनेने दांपत्य भोजन न घालतां ती दांपत्ये म्हणजे प्रत्यक्ष शिव पार्वतीच भोजनास येणार आहेत अशा भावनेने सर्व व्हायला हवे. त्यातील भाव हा महत्त्वाचा आहे म्हणून बजावीत.

एके वर्षी डॉ. वैद्यांच्याकडे गुरुपौर्णिमा होती. स्वामीही इस्लामपूरलाच होते. अनेक गुरुबंधु व भगिनी आलेल्या होत्या. प्रसादासाठी शिरा करायचा होता. स्वामी म्हणाले की मंगला शिरा तू कर. काही बायका रवा धड भाजत नाहीत आणि कांही तरीच करतात. तेव्हा ते काम तुझ्याकडे. त्याप्रमाणे गुरुपौर्णिमेचे दिवशी मी सोवळे नसून घरांत रवा वगैरे भाजत होते. बाहेर गुरुपूजनाची धांदल चालली होती. १-२ जणांची पूजा आटोपलीही होती. इतक्यांत स्वामींनी मला बोलावून घेतले नी म्हणाले, 'तुम्ही दोघांनी आधी पूजा करून घ्या पाहू! तू आंत गुंतली आहेस. मागाहून राहून जाशील नी मग वाईट वाटेल.!' असे स्वामींचे सर्वांकडे सारखे लक्ष असे.

रागवायच्या वेळी रागवायला कमी करत नसत पण खरोखरच आई - वडील काय प्रेम करतील असे प्रेमही करीत, कौतुकही करीत.

एकदां स्वामींनी आम्हां दोघांना विचारले की तुम्हाला तुमची प्रगति कशी काय व्हायला पाहिजे? तेव्हां आम्ही म्हटले की सावकाश होऊ दे कारण आमची ज्येष्ठ गुरुभगिनी जी होती तिने स्वामींजवळ प्रेमभक्ति मागितली होती. आणि स्वामींचे कृपेने ती तिला प्राप्तही झाली होती. पण त्यामुळे तिची काय अवस्था होई हे आम्ही जवळच असल्याने डोळ्यांनी पाहातच होतो. हर्षाने ती भजन करताना हसू नाचू लागे. विरहाने ऊर फुटेतो रडे - प्रेम उचंबळून येऊ लागे. आवरतां येत नसे. भजन थांबू म्हटले तरी शरीरास आलेल्या गतीमुळे थांबवतां येत नसे. अष्टसात्विक भाव जागृत झाल्यावर काय होते, ते पाहिले होते. थोडक्यात हा अनुभव अति उच्च व दुर्मिळ, केवळ सद्गुरुकृपेनेच प्राप्त होणारा असला तरी संसारी माणसाला न झेपण्यासारखा होता. शेवटी सांगावे लागले की हे थोडेसे कमी होऊ दे. असे सांगितल्यावर स्वामींनी आपल्या शक्तीने त्यांची गति कमी केली. कुठलीही गोष्ट दिली म्हटली की स्वामींच्या कृपेने प्राप्त होई, काढून घ्यायची म्हटली तर ते काढून घेऊ शकत वा कमी करू शकत, असे त्यांचे सामर्थ्य होते. संसाराच्या जबाबदाऱ्या आपल्या अंगावर असतांना

व पुरेसे वैराग्य प्राप्त झालेले नसतांना जर आपण माझी प्रगती जोरांत होऊ दे म्हटले तर स्वामीकृपेने होईलही पण आपणांस झेपणार नाही म्हणून अगदी आमची प्रगति सावकाश व हळू हळू होऊ दे असे म्हटले होते. स्वामी हसले आणि म्हणाले 'ठीक आहे. गृहस्थी आहात - जबाबदाऱ्या आहेत. हळू हळू पण निश्चितपणे तुमची या मार्गात प्रगति होईल. असा आमचा आशीर्वाद आहे.'

स्वामींना खरे व स्पष्ट बोललेले आवडत असे. त्याबद्दल ते रागवत नसत.

पुढे स्वामीजी इस्लामपूरहून अन्य ठिकाणी गेले. मग ४ - ५ वर्षांचे काळांत संतसंगती तुटल्याकारणाने आमचेही साधन सद्ग्रंथ वाचन, जप, ध्यान हळू हळू हळू हळू कमी होऊ लागले. मग महिलामंडळे, त्यात गोडी वाटू लागली. चंचल मनाला काय! वैराग्य पाशाने बांधलेले थोडेच आवडते? आम्हीही इस्लामपूर सोडून माधवनगरात राहायला आलो. माधवनगरला एक चांगला उपक्रम चालू केला होता. तेथीलच एक उत्तम कीर्तनकार व प्रवचनकार श्री. वासुदेवराव जोशी यांची ज्ञानदेवांच्या हरिपाठावर २८ निरूपणे करवली. अनेक माणसांवर त्याचा परिणाम झाला. आम्हासही श्रवणाचा लाभ मिळाला. विचारांना चालना मिळाली. मननही होऊ लागले. हा सारा पुन्हां सत्संगतीचा परिणाम झाला. स्वामींच्याच कृपेने पुन्हा परमार्थास योग्य अशी भवतालची अनुकूलता लाभली.

आणि आपणही कीर्तन बसवावे व महिला मंडळात करावे असे वाटू लागले. वक्तृत्वाची व थोडयाशा गायनाचीही अनुकूलता होतीच. सहजच सद्ग्रंथाचे वाचन मनन कांही पाठांतर होऊ लागले. कीर्तने भगिनींना आवडू लागली, इतर कांही आवडेनासे झाले. 'बोले तैसा चाले' असे आपण असले पाहिजे तरच आपणास बोलण्याचा अधिकार आहे, नाहीतर नाही, कारण कीर्तन म्हणजे कांही नाटक नव्हे - कांही आपली योग्यता असेल तरच आपल्या बोलण्याचा प्रभाव पडेल, असे वाटत असे व त्यामुळे आत्मपरीक्षण होई व अजूनही होते.

पुढे स्वामींना तुलसीरामायण अत्यंत प्रिय म्हणून ते वाचू लागले इतरांना सांगू लागले. तेही ऐकणाऱ्यांना आवडू लागले. सध्या त्याचा अभ्यास चालू आहे. मानसावरील प्रवचने लोकांना फार आवडतात.

आतां विचार येतो की आपण एकदम कीर्तनें व प्रवचने कशी करू लागलो? तर स्वामींनीच ओळखले की यातूनच हिची प्रगती आहे. कोणत्याही मनुष्यांत सत्त्व, रज, तम या त्रिगुणांपैकी एकाचा जोर असतो. रजोगुणी माणसाला त्याच्या आवडीप्रमाणे काम मिळाले की तो त्यात रमतो – जोडीला ईश्वरी गुणानुवाद गाण्याने सत्त्वगुणाची प्राप्ती होईल. पहिल्यापासूनच ध्यानाला बसण्यात मला गोडी वाटत नसे म्हणून स्वामींनीच जणु मला हा मार्ग लावून दिला. 'अधिकार तैसा करू उपदेश' या उक्तीप्रमाणे माझी कीर्तने व प्रवचने माझा विशेषसा अभ्यास नसतांनाही श्रोत्यांना आवडतात व त्यांच्यावर जो प्रभाव पडतो ती सर्वस्वी सद्‌गुरुकृपा आहे. माझी प्रगती त्यांना या मार्गानेच करून घ्यायची आहे. म्हणून मोक्ष मार्गातील कीर्तने व प्रवचने ही माझी साधनरूप आहेत. स्वामींनी आमचा स्वीकार केला आहे. आतां उद्धाराची जबाबदारी त्यांच्यावरच आहे. आम्ही फक्त त्यांच्यावर आत्यंतिक निष्ठा ठेवून त्यांनी सांगितलेल्या मार्गावरून वाटचाल करणे येवढेच आमचे काम आहे. शेवट गोड व कल्याणकारी कसा करायचा हे त्यांचे ते पाहून घेतील. आपण चिंता का करा!

* * *

### श्री. अय्याबुवा रामदासी, सज्जनगड

प.पू. प्रज्ञानानंद सरस्वतींचे चरित्र लेखन सुरुं असल्याचे ऐकून फार आनंद झाला.

१९३६ चे सुमारास रामदासी दीक्षा घेतलेले (पूर्वाश्रमीचे श्री. द. ना. कर्वे) ईश्वरदास रामदासी या नांवाने सज्जनगडावर येत असत. या वेळी आमच्या रामदासी मंडळीत नारायणबुवा गोडसे, बालाजीबुवा, केशवबुवा (बोरगांवचे) आणि श्रीधरबुवा बिवलकर म्हणजे प.पू. श्रीधरस्वामी आणि ईश्वरदास रामदासी म्हणजे प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी यांचे सज्जनगडावर वास्तव्य असे. त्यावेळी श्रीधरबुवा व ईश्वरदास रामदासी म्हणून ज्यांना आम्ही मानत होतो ते पुढे आत्मसाक्षात्कारी व अनेक जीवांचे उद्धारकर्ते होणार आहेत याची जाणीव नव्हती. पुढे यांची चरित्रें लिहावी लागणार आहेत याची कल्पना असती तर अनेक घटनांची नोंद ठेवली गेली असती.

वरील दोन सत्पुरुषांचा पुष्कळ सहवास घडून सुद्धां त्यांच्या चरित्रात घालण्याइतका मजकूर मजजवळ नाही.

सज्जनगडावरील वास्तव्यानंतर स्वामीजी पुणे जिल्ह्यातील खेडला गायत्री पुरश्चरणासाठी गेले व मीही हिमालययात्रेसाठी निघून गेलो. मी जेव्हां १९४२ साली परत आलो त्यावेळी श्रीधरबुवा व ईश्वरदास यांनी संन्यासाश्रम स्वीकारला होता व आपल्यापरीने साधन व आमच्यासारख्यांना समुपदेश करीत असत. श्रीधरस्वामींचा भर अध्यात्म व आत्मसाक्षात्कारावर तर प्रज्ञानानंदांचे साधन, पुरश्चरण, जपजाप्य यावर भर असे. पुढे पुढे स्वामीजींनी तुलसीरामायणाचा अभ्यास सुरू केला व त्यातील विशेष प्रसंग ते या बद्धास सांगत असत. मी समोर बसून ऐकत असे.

स्वामीजी मला गायत्री पुरश्चरणाचा पुष्कळ आग्रह करीत होते. ४८ सालापर्यंत योग आला नाही. पुढे श्रीस्वामी चास – कमानला होते तेव्हां त्यांनी गायत्रीपुरश्चरणाचा आदेश दिला. मग मात्र निश्चय करून श्रींच्या आज्ञेने प्रवरासंगम टोके येथे जाऊन पुरश्चरण सुरु केले. तेथील २–२॥ वर्षांच्या माझ्या वास्तव्यात माझ्या प्रकृतिबाबत, पथ्यपाण्या बाबत, बोधपर, पुरश्चरणाबाबत अशी अनेक पत्रे आलेली होती. त्यातील २ पत्रे खाली दिली आहेत.

**पद (चाल – पतित पावन नाम ऐकुनी)**

*नरस्तुती कधि करू नये बा योग्य न ती मनुजा ।*
*श्री रामा सुखधामा वाचुनि ईश्वर न कोणी दुजा ॥१॥*

*मीच असे या जगात भरलो, विचार बघ बरवा ।*
*जलगारासम जलवीचीसम कुंडल कनक रवा ॥२॥*

*स्वहिता सांडुनि सुचे न काही स्वार्थ सदा सुचतो ।*
*जगत्स्वरूपा मीच मला बा! तोषविण्या बघतो ॥३॥*

*श्री भागीरथि सतत वाहते तिचा स्वभावचि तो ।*
*इतरांचे हित साधायास्तव प्रयत्न तो नसतो ॥ ४॥*

*वनी मनोहर सुरम्य सुमने सुगंधीत फुलती ।*
*काय जयाचे हित साधू हा हेतु मनी धरिती ॥५॥*

मानवतनु भववारिधि तरणी, तरणि कुलोत्तम जो ।
झाला देशां देवा दुर्लभ, दीन दयाघन जो ॥६॥

सदा सर्वदा सत्य सनातन सर्वांतरि बसतो ।
अखिल जगति अग जग खग मृग नाग सुरासुर तो ॥७॥

जोवर वपु कार्यक्षम आहे तोवर राबविणे ।
चातक घन चिंतने तैसे स्वमना रंजविणे ॥ ८॥

कसा करु कंटाळा काया कष्टवु अनुदिन ही ।
कुजेल केव्हां कुणा कळेना शाश्वत ती नाही ॥९॥

मनुज तनुस दनुजारी भजनि दिन यामिनि राबविता ।
मिळे परमसुख शान्ति येइना वचनी दाखवितां ॥१०॥

गायत्रीचे पुरश्चरण तव प्रौष्ठपदीला हे ।
समाप्त होता प्रतिवर्षी मग एक करित राहे ॥११॥

शरीर कष्टा तपा वांचुनी तेज नसे प्राप्ति ।
घर्षण छेदन ताप ताडने कनका ये दीप्ति ॥१२॥

पुरश्चरण संख्या तू करिसी पूर्ण जरी बारा ।
लागेना तुज अल्प कधी हरिमायेचा वारा ॥१३॥

कल्पनाही जड वस्तूविषयी मनि अभिमानाला ।
ठाव अल्प जरि देशि तिने तू मुकशी स्वहिताला ॥ १४॥

अभिमाना स्थानाच्या गंगा अल्प जरी धरती ।
नदीपतीशी ऐक्य सुखाच्या लाभा नाठवती ॥ १५॥

समर्थ सद्गुरु काय मानिसी परिच्छिन्न जडसे ।
त्यांच्या वांचुनि रिता ठाव या जगिं अणुरेणु नसे ॥१६॥

गायत्रीमंत्राचा अर्थ पहा सदाचारी ।
महावाक्यमय सार असे तो वेदांचे चारी ॥ १७॥

गायत्रीसम द्विज पुरुषांना तारक अन्य नसे ।
गायत्री गायकांस तारी लोपे नाश असे ॥ १८॥

*श्री गायत्री प्रसन्न होउन नित्य सुखा दात्री ।*
*भज भज भावे श्रद्धेने जग बघ, सुखमय खात्री ।।१९।।*

*प्रज्ञानाचे अल्पबोल हे आणा आचरणी ।*
*रामभक्ति मुक्तीसह चारी लागतील चरणी ।।२०।।*

('सदाचार' हा ग्रंथ श्री हंसराज स्वामी (परांडा) यांची श्री शंकराचार्य स्तोत्र 'सदाचार' या स्तोत्रावरील ओवीबद्ध टीका आहे.)

**दुसरे पत्रातील पद्य**

*अय्या बाळा इथे एकटा दास असे पडला ।*
*पत्रि वाचुनी या चित्ताला विस्मय सा पडला ।।१।।*

*स्वजनापासुनि दूर राहिलो असे गमे तुजला ।*
*स्वजन कोण हे याचा सत्वर विचार कर पहिला ।।२।।*

*व्यतिरेकाने बघशी तरि बा कोणी नाहि तुझा ।*
*अन्वय बोधे विचार करितां तुजविण नाहि दुजा ।।३।।*

*एक एकटा विश्वि चराचर भरुनी तू असशी ।*
*विचार हा तो विमळ साधका कसा विसरलाशी ।।४।।*

*जीव बुद्धिने बघतां सखया तुज सन्निद्ध बसती ।*
*सीता रघुपति लक्ष्मण मारुति रक्षण तव करिती ।।५ ।।*

*ग्रामदेवता श्री सिद्धेश्वर तशी आदिशक्ति ।*
*जगज्जननि जी भक्तवत्सला देवी गायत्री ।।६।।*

*गायत्री ही माता तव बा पिता राममंत्र ।*
*यांची सेवा नित्य करिसि तू विसर भीतितंत्र ।।७।।*

*जरी म्हणसि मी सद्गुरुपासुनि दूर करी वसती ।*
*सद्गुरु तुझिया हृदयमंचकी स्थिती सदा करती ।।८।।*

*चार शब्द हे स्मरसि सदा तरि भीतिस ठाव नुरे ।*
*अनुष्ठान तव विघ्न रहित बा सिद्धिस जाइ खरे ।। ९।।*

*विघ्नें तुझिया सन्निध अल्पहि येऊं नच शकती ।*
*प्रसन्न होवो पूर्ण तुझ्यावरि देवि आदिशक्ती ।। १०।।*

*प्रज्ञानाच्या देहाची तू करु नको चिंता ।*
*त्याची चिंता सदा वाहतो राम जगजनिता ।।११।।*

(उस्मानाबाद येथे श्रींची प्रकृति फार बिघडली होती. त्यावेळी पत्र लिहिले, त्याचे उत्तर म्हणून वरील पद्यमय संदेश आला.)

या नंतरही त्यांचे बरोबर श्रीरामबन (मध्य प्रदेश) सातारा, इस्लामपूर वगैरे भागात राहण्याचा योग आला. खरोखर माझे प्रकृतिस्वभावानुसार विचार करतां परमार्थाचा अधिकारही नसतांना सुद्धां वरील दोघा सत्पुरुषांचा सहवास व कृपेमुळेच १/२ टक्के का होईना परमार्थ म्हणजे काय येवढे समजू शकतो. या बद्दल या दोघांचाही अत्यंत ऋणी आहे.

* * *

## सौ. शीला मोने, मालाड

प. पू. स्वामींचे दर्शन मला साधारण १९४९ साली झाले. तेव्हां मी १४–१५ वर्षाची असेन. चास – कमानला गुरुपौर्णिमेसाठी आम्ही गेलो होतो. चासला गं.भा. जोगळेकरबाईंकडे माझे वडील (श्री. ग. वि. जोशी) गुरुपौर्णिमेसाठी उतरण्यासाठी जात. मला त्यावेळी वडिलांनी बरोबर नेले होते. पौर्णिमेचे दिवशी स्वामींचेसाठी गरम पाणी तापवले होते (इतर वेळी ते नेहमी गार पाण्याने स्नान करीत). जमलेली शिष्यमंडळी त्यांना तेल लावून स्नान घालीत होती. मीही त्यात भाग घेत होते. स्वामी त्यावेळी अत्यंत तेजस्वी दिसत होते. नंतर गुरुपूजनाचा सोहळाही मी डोळे भरून पाहिला. रात्री प्रवचनही ऐकले. ४–५ दिवस आम्ही तेथे राहिलो.

श्री. बाबूशेठ कटारे प.पू. स्वामींची सर्व सेवा करीत असत. गावातील लोकही चांगले होते. सर्वजण मिळून स्वामींना कोणत्याही तऱ्हेची उणीव भासू देत नसत. गावाच्या आसपासचा परिसरही फार सुंदर होता. तो डोंगर, ती भीमा नदी, त्या नदीवर मी स्वामींची वस्त्रे तेथे होते तोवर धुतली. वाटे की आपण कांहीतरी स्वामींचे काम करावे. स्वामी कधी मुंबईस आले की आमचे घरी उतरत.आमचे सर्वांचे मोठे भाग्य म्हणून ते १५–२० दिवस अति आनंदात जात. प.पू. स्वामींची आम्हां सर्वावरच कृपा होती. आमचे

येथे असतांना तत्त्वज्ञान मंडळाचे प्रमुख श्री. रामभाऊ जोशी यांचे तर्फे मंडळात स्वामींची प्रवचनेही होत असत.

साधारण १९५४ साली इस्लामपुरात प.पू. स्वामींनी मला दीक्षा दिली. त्यानंतर ध्यानाला बसणे, थोडासा जप करणे वगैरे सुरू झाले. ह्या कलिकालात लाटेबरोबर आपल्यालाही वाहत जावे लागले. परिस्थितीमुळे मान तुकवावी लागते. पण सद्‌भाग्य म्हणूनच अशा थोर सद्‌गुरूंकडून अनुग्रह मिळाला, राममंत्र मिळाला. रामनवमी नवरात्र या दिवसांत नियमितपणे रामायणाची पारायणे करीत असे व सर्व अनुभव पत्राने स्वामींना कळवीत असे. पण आता जवळजवळ २५ वर्षांत कुठे जाणे नाही व येणे नाही. माझ्या विवाहापूर्वी जेथे जेथे स्वामींचा मुक्काम झाला तेथे तेथे मी एकदा का होईना गेलेली होते. इस्लामपूरला तर मी वैद्यांचे घरी स्वामी होते म्हणून १५ दिवस राहिले होते. माझी अधिकारी व अतिशय प्रेमळ असलेली गुरुभगिनी कमाताई वैद्य हिने मला कांहीच कमी पडू दिले नाही. त्याकाळांत स्वामींच्या सान्निध्यात आनंदाची मेजवानीच असे. आतां नुसती आठवण झाली तरी काय होते ते सांगता येत नाही.

प.पू. स्वामींनी सांगितल्याप्रमाणे पतिआज्ञा प्रमाण व त्यांच्या इच्छेच्या विरुद्ध न वागणे यांतच सारे सुख मानून राहा; आम्हाला भेटायला यायला मिळाले नाही तरी वाईट वाटून घेऊं नकोस, हे सर्व लक्षात ठेवून वागत असते. पण मला तर स्वामींच्या प्रायोपवेशनाचे वेळीही जायला झाले नाही म्हणून फारच वाईट वाटते.

माझ्या यजमानांना परमार्थाची आवड उत्पन्न होऊ दे म्हणून मी स्वामींची प्रार्थना खूप दिवस करीत होते. आता ते पण थोडा वेळ ध्यानाला बसतात. संध्या करून गुरुचरित्र वाचतात.

कांहीतरी नियमित साधन घडलं पाहिजे हे कळतं पण कांही जमत नाही. त्यात व्यत्यय फार येतात. तोंडाने जप करणे, रामायण वाचणे, सद्‌ग्रंथ वाचणे, व मानसपूजा करणे वगैरे साधेल तितके करते. माझे दादा (वडील) त्यांचेही मत असे आहे की सत्संगति, सद्‌ग्रंथवाचन, श्रवण, मनन असलेच पाहिजे. तसेच कोणतेही कर्म करतांना ते अखंडपणे, प्रेमाने चिकाटीने न कंटाळतां केले पाहिजे. स्वामीनी त्यांना वैश्वदेव करायला

सांगितला होता. कित्येक वर्षे अखंड न चुकतां, पहिल्या दिवसाच्याच उत्साहाने, ते तो करीत असत. कांही साधन घडलं की चित्तशुद्धि होते, असे ते म्हणत. थोडक्यात म्हणजे कांही तपश्चर्या, निष्ठा चिकाटी हवी.

माझ्या हातून तसे साधन असे कांहीच होत नाही. बाहेर कुठे श्रवणास वा भजनास गेले किंवा करुणाष्टके म्हणूं लागले की लगेच डोळे गळूं लागतात – त्यामुळे बाहेर जाण्याची सोय नाही.

मानसपूजेत काही वेळा स्वामींचे दर्शन होते व समाधान असते. मानसपूजा, जप, सर्वजण रामरूप पाहाणे व रामायण वाचणे ही साधना यथाशक्ती करीत असते. कधी कधी टेलिपथीचा अनुभव फार येतो. एकाद्या पुढे घडणाऱ्या घटनेची कल्पना मनाला चाटून जाणे किंवा त्याची पूर्वसूचना मिळणे किंवा तोंडून सहज काही बोलून जाणे व ते खरे होणे असल्या गोष्टींचा बरेच वेळा अनुभव येतो. पण मला प्रत्यक्ष याचा काय फायदा?

असो. आपण सांगितलेले साधन होईल तितके करीत राहायचे, सद्गुरु माउली आपल्या पाठीशी आहेच. अशी माझी श्रद्धा आहे.

* * *

## श्री. रामचंद्र वामन कुलकर्णी, इस्लामपूर

मी सेवानिवृत्त माध्यमिक शिक्षक आहे. इस्लामपूरला डॉ. वैद्य यांचे घरी माझे व माझ्या सौभाग्यवतीचे जाणे येणे होते. श्री स्वामींचा मुक्काम इस्लामपुरात असतांना वैद्यांचे घरी प्रथम दर्शन घडले. अनेक वर्षे सान्निध्य लाभले. जीवनावर झालेला परिणाम शब्दांत लिहिता येत नाही. १९६४ साली परांडे मुक्कामी मी गुरुपौर्णिमेसाठी गेलो होतो. माझ्या पत्नीने पूर्वीच अनुग्रह घेतलेला होता. पण माझा योग अजून आलेला नव्हता म्हणून त्यावर्षी मी प.पू. स्वामींचा अनुग्रह घेतला. स्वामींचे संगतीत खूपच बोध वचने ऐकावयास मिळत. खाजगी बोलण्यातही सर्व शिकवणच असे.

* * *

## कै. सौ. शांताबाई आठले, इस्लामपूर

प.पू. स्वामींचा मुक्काम इस्लामपूरला असतांना श्री विठ्ठलमंदिरात त्यांची रामायणावर प्रवचने होते, तेथे श्रवणास जाई. यातूनच गोडी लागली. मग ५० हजार जप केला व अनुग्रहाविषयी स्वामींचे जवळ विनंती केली तेव्हां मला अनुग्रह मिळाला. वैद्यवहिनी दुपारी रामायण वाचीत. त्यातील भावार्थ समजावून देत. त्यावेळी अंगदाचा एकदम संचार झाल्यासारखा होई. अंगद–चरित्राचा भाग आल्यावर त्याचा माझ्यावर फार परिणाम होई. संकटकाळी श्री. स्वामींवर भार घातला की संकट निवारण होते. असा अनुभव येतो. त्यांनी सांगितल्याप्रमाणे जप, वाचन वगैरे करीत असते.

* * *

## कै. सौ. इंदिरा कुलकर्णी, इस्लामपूर

१९५९ साली स्वामींचेकडून अनुग्रह मिळाला. अनुग्रहाचे वेळी बालरामाचे दर्शन घडले. राम माझ्यापेक्षा लहान भाऊ व मी त्याची मोठी बहीण असे नाते जोडले आहे. अकल्पितच काव्य स्फुरले. श्रींनी सांगितल्याप्रमाणे जप, वाचन, करीत असते. कोणतेही सुखदु:ख अन्य कोणापाशी न सांगतां श्रींचे पाशी सांगायचे, त्यांचे ते पाहून घेतात.मात्र पहिल्या इतके साधन होत नाही.

* * *

## श्रीमति माई हरदास, इस्लामपूर

इस्लामपूरला डॉ. वैद्य यांचे घरी मी प्रवचनाच्या निमित्ताने जात असे. तेथेच मला श्री. स्वामींचेकडून अनुग्रह मिळाला. मला त्रयोदशाक्षरी राममंत्र स्वामींनी दिला होता. अनुग्रहाचे वेळी शरीराला कंप सुटला. अश्रुधारा ओघळत होत्या. व श्रीरामाची मूर्ति दिसत होती. रामायण वाचनाचे वेळी मला बालरामाचा भाव येई. कमाताई वैद्य यांचे मुळेच आम्हां सर्व भगिनींना रामायण वाचनाची गोडी लागली. एकदां स्वप्नात मी तळ्यात उडी टाकली पण रामानी मला अंतराळीच झेलले असे दृश्य दिसले, ते मी श्रींना सांगितले. तेव्हां ते म्हणाले की कुठल्याही संकटातून श्रीराम तुला बाहेर काढतील. आणि खरोखरीच कित्येक संकटे आली पण माझ्या रामानेच

मला साह्य केले. एकदा घरातल्या चौघांना विषबाधा झाली पण रामकृपेने सर्वजण वाचले. रोजचा सांगितलेला जप व रामायण वाचन करीत असते.

* * *

## सौ. सुमति उरुणकर, इस्लामपूर

माझ्या इतर सर्व रामायण-भगिनीप्रमाणेच इस्लामपूरला मी श्री स्वामींचेकडून अनुग्रह घेतला. एकदां मी माझे प्रगतिविषयक स्वामींना विचारले असता ते म्हणाले, तू नियमाने रामायण वगैरे ऐकण्यास जात जा व पहाटे लवकर उठून ध्यानाला बैस म्हणजे तुझीही प्रगती होईल. मुलगा नसल्याने तू खेद करीत असशील हे मुख्य कारण दिसते. पण हल्लींच्या काळात किती स्त्रियांना मुलगा सुखदायक ठरतो? आई-बापांचा उद्धार करणारा पुत्र होणे तर हल्लींच्या काळात फारच दुर्लभ आहे. वाटल्यास प्रभु रामचंद्रानाच पुत्र मानून कौसल्येसारखी भावना ठेवून वाग. म्हणजे मग बघ कशी मजा होते ती! रामायण नियमाने वाच व गीतावलीतील प्रभूचे कौसल्येने वर्णिलेले बालचरित्र समजावून घे. ती पदे पाठ कर व एकटी घरी बसून बाळ प्रभूचा फोटो ठेवून पदें म्हणत जा म्हणजे दिवसेंदिवस प्रेम भावना, आनंद वाढत जाईल व चांगले अनुभव येतील. अशा रीतीने स्वामी एकादी गोष्ट फारच उत्तम रीतीने समजावून सांगत असत.

* * *

## श्रीमती सरोज अरविंद आराध्ये, पंढरपूर

माझे माहेरचे नांव यमुना लक्ष्मण मुगावकर - मी माहेरी परांड्यास असतांना स्वामी परांड्यास आलेले होते. त्यावेळी आम्हां सर्व भावंडाना ध्यानास बसावयास व संध्याकाळी भजन करावयास स्वामी सांगत असत. त्यानंतर स्वामी इस्लामपूरला वगैरे गेले. पुन्हां १९५८ साली श्रींचा मुक्काम परांड्यास होता. स्वामी आमच्या घरीच होते. गुरुपौर्णिमेच्यावेळी बरेच अनुग्रहित शिष्य जमले होते.आमच्या घराचे बांधकाम चालू होते. जागा अपुरी होती पण सर्वांनी आपले घर समजून आनंदाने गुरुपौर्णिमा साजरी केली. त्यावेळी परांड्यास नळाचे पाणी नव्हते विहिरीचे पाणी लांबून आणावे लागे. म्हणून स्वामी प्रत्येकास सांगत की २-२ घागरी का होईना

पण विहिरीचे पाणी सर्वांनी आणायला मदत करा. असे सगळीकडे त्यांचे लक्ष असे. चैत्रात सामुदायिक रामायणाची पारायणे होत तसेच शिवरात्रीच्या वेळी संध्याकाळी ६ ते दुसरे दिवशी सकाळी ६ वाजेपर्यंत ४ याम पूजा होत असे. शिवरात्रीच्या दिवशी कडक उपवास असे. पाण्याचा थेंबही न घेता. पण कधीही थकवा येत नसे. सर्व कार्यक्रमात स्वामीही भाग घेत. त्यामुळे तो सोहळा आनंदात पार पडे. प.पू. माऊलींच्या सहवासात दिवस फारच मजेत गेले. पहाटे ध्यान, दुपारी प्रवचन, संध्याकाळी भजन असे.

पुढे माझे लग्न झाले. श्री स्वामींची शिकवण असे की नीट वागा, आपल्या वागण्याने इतरांना त्रास होता कामा नये. सासरी सर्वांचे प्रेम संपादन करा. पतीलाच देव मानून त्यांचे रोज दर्शन घ्यावे.

पुढे माझे पति १९६५ साली स्वर्गवासी झाले. त्यावेळी सर्वांना खूप दु:ख झाले. स्वामी मला म्हणाले दु:ख करीत रडत बसू नका. आईवडिलांची भूमिका घेऊन मुलांचे संगोपन कर. कुळाला भूषणावह ठरतील अशी मुले होतील असे त्याना वळण लाव. शिक्षण दे. आणि आपला वेळ हरि भजनांत, श्रवणात, ध्यानधारणेत घालव.

त्यांच्या सांगण्याप्रमाणे वागत आहे. त्यांची कृपा पाठीशी आहेच.

* * *

## कै. श्री. नारायण सीताराम पाठकजी, सातारा

सातारा येथील श्री विश्वेश्वर मंदिरात श्री ना. भा. जोशी उर्फ बाबूराव जोशी यांची रामचरित मानसावर प्रवचने चालू होती. ती ऐकण्यास मी जाऊ लागलो. त्यांच्या प्रवचनात श्री प्रज्ञानानंद स्वामींचा उल्लेख होत असे त्यामुळे श्री स्वामींचेबद्दल जिज्ञासा वाढली. पुढे शनिवार पेठेत श्री. विष्णुमंदिरात स्वामींचीच प्रवचने सुरू झाली व माझा त्यांच्याशी परिचय वाढला. त्यांच्याशी बोलताना मला असे समजले की श्री स्वामींची व माझी पहिली भेट सज्जनगडला झालेली होती. त्यावेळचे त्यांचे नांव ईश्वरदास असे होते. श्री स्वामींनी १९४३ /४४ चे सुमारास संन्यासाश्रम स्वीकारला होता. कांही वर्षांनंतर स्वामी साताऱ्यास पुन्हां आले. तेथे ते रामचरित्राची पारायणे करीत. चातुर्मास समाप्तीचे वेळी मला श्री स्वामींची पूजा करण्याचा

योग आला. त्यावेळी एकदम श्री स्वामींच्या शरीरात संचार होऊन त्यांनी माझ्या डोक्यावर हात ठेवला. त्यामुळे शक्तिपात झाला. स्वामींच्या बद्दलची जवळीक वाढली व त्यांचा अनुग्रह घ्यावा असे वाटू लागले. पुढे मार्गशीर्षात १९५४ ला त्यांनी मला इस्लामपूरला बोलावले व आम्हां उभयतांना अनुग्रह दिला. मी देवीउपासक असल्याने मला देवीमंत्र दिला.

१९५५ साली स्वामींचा मुक्काम पुन्हा साताऱ्याला होता. ते मानस गूढार्थचंद्रिका लिहिण्याचे काम करीत होते. याच वेळी त्यांनी रोज १ याप्रमाणे ९ दिवसांत ९ पारायणे रामचरितमानसाची केली. त्यावेळी निरनिराळ्या व्यक्तींना निरनिराळे भाव येत असत. त्यावेळी माझ्या शरीरात हनुमंतांचा भाव येत असे.

पुढील वर्षी स्वामींचा मुक्काम परांडा येथे होता. त्यावेळी ते श्री. आबासाहेब मुगावकर यांचेकडे राहात होते. नंतर त्यांची स्वतंत्रपणे राहण्याची व्यवस्था श्री. आदिनाथ यादव यांनी तेथेच केली.

पूर्वी येत असलेले देवीचे भाव माझ्या शरीरात अजूनही येतात. रेडिओवर सुद्धां 'जोगवा' वगैरे सुरू झाल्यावर शरीर अस्वस्थ होते. यथाशक्ति साधना सुरू आहे व साधनात आनंद आहे.

* * *

## कै. ना. भा. जोशी

कै. ज्येष्ठ गुरुबंधू श्री. ना.भा.उर्फ बाबूराव जोशी (जोशी काका) यांच्यामुळे अनेक बंधुभगिनीचा श्री स्वामींशी परिचय होऊन त्यांना स्वामींच्या अनुग्रहाचा लाभ झाला.

श्री. जोशीकाकांचा जन्म १९०१ सालचा. जन्मगांव सांगली जिल्ह्यातील कुंडल. वेदविद्येचे अध्यापन व अध्ययन उत्तम प्रकारे करण्याबद्दल आसपासच्या गावात त्यांचे घराणे प्रसिद्ध होते. आचार संपन्नता व करारीपणा हा त्यांच्या २–३ पिढ्यातील गुण दिसून येतो.

त्यांनी मॅट्रिक पर्यंतचे शिक्षण वडिलांचे सहाय्याने केले. पुढील सर्व शिक्षण 'एम.ए.एल.एल.बी.' पर्यंत स्वत: नोकरी करून थोडी नातेवाईकांची मदत घेऊन केले. लहानपणापासूनच वडिलांचे सान्निध्य मिळाल्यामुळे

अध्यात्माची आवड निर्माण झाली. वयाच्या चौथ्या वर्षीच आई वारली.

एम.ए.चा अभ्यास कै. सोनोपंत दांडेकर यांचे मार्गदर्शनाखाली केला. श्री. शंकराचार्य व ब्रॅडले यांच्या तत्त्वज्ञानावर तुलनात्मक अभ्यास करून थिसिस लिहून १९५२ साली एम.ए. झाले. मुख्य व्यवसाय शिक्षकाचाच केला. मॅट्रिक पर्यंतचे विद्यार्थ्यास संस्कृत व इंग्लिश शिकवीत असत. नोकरीतील परावलंबित्व, स्वाभिमानी स्वभावास पोषक नसल्याने जमल्यास स्वतंत्र व्यवसायही करता यावा या उद्देशाने वकिलीचा अभ्यास करुन ४१ साली एल.एल.बी. झाले. परंतु वकिली करण्याचा प्रत्यक्ष योग कधी आला नाही.

स्वातंत्र्य-चळवळीच्या काळात लो. टिळकांच्या विचारांनी प्रभावित होऊन राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यासाठी निपाणी येथे पाठशाळा काढून काहीवर्षे यशस्वीपणे चालविली. त्या काळी काही लोकांचा झालेला परिचय दृढ होऊन पुढील आयुष्यात अनेकवेळा उपयोगी पडला. त्यापैकीच एक गृहस्थ श्री. अय्याबुवा रामदासी एकदा भेटले असतां प.पू. श्रीधरस्वामींमुळे परिचित झालेल्या प.पू. प्रज्ञानानंद स्वामींविषयी ते बरीच माहिती बोलले. त्यामुळे त्यांना भेटण्याची जिज्ञासा वाढून पत्रव्यवहार करून प्रथम भेटीस गेले. त्यावेळी १९४६ साली श्री स्वामींचा मुक्काम सध्याचे राजगुरुनगर जवळ असलेले चास - कमान येथे होता.

तेथून पुढे परिचय वाढून श्रींचे सह मराठवाड्याचा दौरा केला, त्यावेळी पुणे येथील गीताश्रमाचे प्रचारक म्हणून निरनिराळ्या गांवी रा. काकांचा मुक्काम प्रसंगोपात्त होत असे. तेथे आग्रहापूर्वक ते श्री. स्वामीना बोलावत व तेही येत असत. अशाच प्रसंगातून इस्लामपूर येथे श्रींचा मुक्काम होत गेला.

प्रथम पासून आध्यात्मिक ध्येय डोळ्यासमोर ठेवून आयुष्याची ३५/४० वर्षे काढल्यानंतर श्रींची भेट झाल्याने तेथून पुढील सर्व आयुष्य त्यांच्या प्रभावाखालीच गेले. देहाचे सार्थक करून घेण्याच्या एकमेव ध्येयाच्यामागे, भक्तियुक्त अंत:करणाने दीर्घकाल घालविल्याने स्वत:ची वैराग्याबद्दलची वैचारिक बैठक पक्की होती. व श्रीकृपेने ध्येय बऱ्याच अंशानी साध्य केले होते. उपासनापद्धतीतील अंधश्रद्धा काढून टाकून, पृथ्वीवरील नात्याप्रमाणे प्रभूशी नाते जोडा, तसेच श्रीहनुमानाप्रमाणे सेवा परायणता अंगी बाणवा, याच देहाने अंतिम साध्य साधा इत्यादि कितीतरी

अमोलिक उपदेश त्यांच्या प्रवचनामधून व साध्या बोलण्यातून ते करीत असत. श्री स्वामींचे जवळ इतर गुरुबंधूंच्या बाबतीत वकिली व बेलिफगिरी अनेक वेळा करावी लागे.

नरदेहाचे संपूर्ण सार्थक कसे करावे व त्याचे काय फळ मिळते हे या गुरुशिष्यांनी आपल्या कृतीने आम्हां सर्वांना दाखवून दिले. आम्हां शिष्यवर्गात ते अधिकाराने उच्च होते – स्वामींचे लाडके होते. खरे तर स्वामींचे चरित्र लिहायचा त्यांचाच अधिकार होता. त्या दृष्टीने त्यांचे प्रयत्नही चालू होते पण पुढेपुढे प्रकृतिअस्वास्थ्यामुळें ते काम त्यांच्या हातून झाले नाही. गुरुवारी ते मौन पाळीत. त्यांचा अंतकाळही गुरुवारी आषाढ वद्य ११/१२ रोजी झाला. अत्यंत शांतपणे, श्री रामाचा नामोच्चार करीत श्रींची संध्याकाळची आरती झाल्यावर १९७६ साली त्यांनी देह ठेवला. शेवटपर्यंत शुद्ध कायम होती. मृत्यूची चाहूल त्यांना आधी निश्चितपणे लागलेली होती. मृत्यूस शांतपणे सामोरे जाण्याचे धैर्य त्यांनी स्वतःच्या दीर्घकालीन तपश्चर्येने व श्रींच्या कृपाप्रसादाने कसे मिळवावे याचा वस्तुपाठच त्यांनी दाखवून दिला.

* * *

## श्री आदिनाथ यादव – वकील, परांडा

३१–१–५९ रोजी पू. स्वामीजींची प्रथम भेट होताच त्यांचा तपस्वी तेजःपुंज देह पाहून त्यांचे अधिकाराची जाणीव झाली व त्यांना गुरू करून घेण्याचा मनाने निर्धार केला. त्यावेळी ते महिनाभर परांड्यास होते तेव्हां दररोज नेमाने त्यांच्या दर्शनास जात असे. पुढे ते गंगाखेडला असतांना मी त्यांना कळवळून पत्र लिहिले की मला आपणाकडून उपदेश मिळावा. त्यांनी मला ताबडतोब गंगाखेडला बोलाविले. तेथे मी व स्वामीजी जवळजवळ ११ दिवस एकत्र होतो. त्यांची खोली झाडून सारवून काढणे व इतर सर्व कामे करीत, रात्रंदिवस आम्ही बोलत बसत असू. त्या बोलण्यातूनच श्रींनी मला ज्ञान दिले. श्रीस्वामीजी एकदम कोणालाच मंत्र व दीक्षा देत नसत. अगोदर कांही दिवस परीक्षा पाहून मगच अनुग्रह देत. मलाही ३२ अक्षरीं मंत्राचा ६० हजार जप करायला सांगितला होता. गुरुकृपेसाठी मी अगदीं वेडा झालो होतो की जणु मी अगदी माउली शिवाय जगूच शकत नव्हतो.

२६-३-५९ तुकाराम बीज या दिवशी श्रींनी मंत्रोच्चार करून मला राम उपासना दिली. व माझे नांव 'शंभू' असे ठेविले. तो अत्यंत आनंदाचा दिवस होता.

मे ५९ मध्ये स्वामीजी परांडयास आले. आणि त्यांचा मुक्काम ज्याला आम्ही भुताचा वाडा म्हणत होतो त्यांत झाला. श्री स्वामी म्हणायचे हे महाभूत येथे राहिल्यावर बाकीची भुते पळून जातील आणि अगदीं तसेच झाले. स्वामीजींचा मुक्काम त्या वाड्यात होता तोपर्यंत कोणालाही कसलाच उपद्रव झाला नाही. आम्हां सर्वांसाठी सद्गुरु माउली अखेर पर्यंत परांड्यासच राहिले.

मी ध्यानाभ्यासासाठी पहाटे सद्गुरुमाउली समोर बसून असे. त्यांच्या मंत्रउच्चाराने माझी कुंडलिनी जागृत झाली व मला योगदीक्षा मिळाली. फार उच्च कोटीतील अनुभव आले. यावेळी पू. माउलीने प्रत्यक्ष स्पर्श केला होता. सर्व चक्रे भेदन करून कुंडलिनी सहस्त्रदलापर्यंत पोहोचविली.

पुढे एकदां प.पू. माऊलीचे पट्टशिष्य बाबूकाका जोशी यांच्यामध्ये प.पू. स्वामींच्या सद्गुरूंचा म्हणजे पोटे स्वामींचा भाव आला. त्यात महाराज म्हणाले 'शंभू बाळ! निधान लाधले तुला. सांभाळ बाळ शंभू. अरे अनेकांचे हाती येऊन सुटले. भोवतालचे आगीत हे सर्व जीव भाजून जातात. तू जसा आहेस तसा राहा. हे पाय घट्ट धर म्हणजे भीति नाही. आम्हीं आमची शक्ति तुला देतो. काळजी करू नकोस. शंभू बाळा तू मोठ्या पुण्याईचा साठा घेऊन आला आहेस. देह कोणाचा हे देव पाहात नाही. भक्तीचे भांडवल पाहतो. तुझे भांडवल पाहून आम्हांला मोद वाटतो.

पुढे माझी पहिली गुरुपौर्णिमा आली. त्या दिवशी प्रत्यक्ष स्पर्श करून पू. माउलींची पंचोपचार पूजा करून, चरणकमल घट्ट धरून त्यावर मस्तक ठेवले. त्या दिवशी आनंदी आनंद झाला. अनन्य दृढ भक्ति करा. एक गुरु, एक देव, आणि एकच मंत्र ठेवा अशी माउलीची शिकवण असे.

मी माझेकडून होईल तितकी सेवा करीत असे. संडास रोज धुवून स्वच्छ करून ठेवीत असे. कोठलेही काम करतांना मला खूप आनंद व्हायचा व माउलीही अत्यंत प्रसन्न व्हायची.

प.पू. स्वामींनी देशमुख वाड्यात ९ दिवसांत तुलसी रामयणाची ९ पारायणे केली. त्या कालात स्वामीजी केवळ शहाळ्याच्या पाण्यावरच

राहात होते. म्हणून मुद्दाम कोकणातून शहाळी मागविली होती. ९ दिवस आनंदी आनंद झाला.

पुढे शेजारील भुताचा – वाडा मजला विकत घेण्यास सांगितले. त्या प्रमाणे मी तो घेतला. नंतर प.पू. माउलीनी पांढरी मोहरी मंत्रून टाकून भुताचे उच्चाटण केले. व मला बांधकाम करायला सांगितले. त्यांचे मार्गदर्शनाखाली बांधकाम केले व त्या वाड्यास 'राम विश्राम धाम' असे नांव ठेविले. प.पू. स्वामीजी अखेरपर्यंत याच वाड्यात होते. येथेच ९ दिवसांत पारायणे केली गेली.

याच ठिकाणी श्री. स्वामीजींनी दररोज जवळ जवळ १६ तास अशी ७ वर्षे ७००० पानी टीका लिहून पुरी केली. पूर्वी तुलसी रामायणावर (रामचरीत मानसावर) टीका लिहून झाली होती ती मराठीत होती. परांड्यास तीच सर्व टीका हिंदीत लिहिली गेली. परांड्यास श्री स्वामींचा एकदर ९ वर्षे मुक्काम झाल्याने आम्हांस चैतन्यमय असा सहवास लाभला.

त्यावेळी आम्ही साधनेच्या उत्तम अवस्थेत होतो. सर्वचजण फार रंगलो होतो. मी श्री स्वामींना म्हणालो की, 'जगाचा उद्धार करण्यासाठी आपण एक उत्तमपैकी मिशन काढू.' त्यावर प.पू. माउली म्हणायची की, 'जगाचा उद्धार करण्यासाठी तुम्हाला परमेश्वराने नेमले आहे काय? परमेश्वरी आदेश असेल तरच सर्व शक्य होईल.'

मधे साधनेचा वेग जरा मंदावला तेव्हा साधना सावकाश होईल असे मी म्हणालो, तर माउली म्हणाली की तुझ्या जीवनाचा निश्चित कांही अमरपट्टा आहे काय? तेव्हां होईल तेवढी जास्त साधना करावी. प्रथम स्वत:चा उद्धार करावा आणि मग जगाचा विचार करावा.

एकदां पहाटे उठण्यास उशीर झाला म्हणून श्रीस्वामी संतापले व तू नीट ऐकले नाहीत तर नरकात जाशील म्हणून म्हणाले. मी म्हणालो 'आपले चरण हृदयासी घट्ट धरले आहेत. आतां जगातील कोणतीही शक्ति आम्हांस नरकात घालू शकणार नाही. प्राण गेला तरी आम्ही आपले चरण सोडणार नाही. असे म्हणतांच माउलीचा कंठ दाटून आला व 'शंभू' म्हणून हांक मारली.

एकदां माउलीने मला सांगितले की तुला सर्व शक्ति देतो तू सर्व सोडून तपस्येसाठी गंगाकाठी जा. पण त्यावेळी एकदम सर्व सोडून जाण्याची

माझी छाती झाली नाही. त्याचे आता अत्यंत वाईट वाटते.

प.पू. माऊलीचे प्रायोपवेशन चालू असतांना मला सांगितले की मंत्राचे एक पुरश्चरण कर म्हणजे तुझी साधना चांगली होईल. मी होय म्हणून सांगितले.

तो अमृतयोग २ मे ते २२ जून १९८० रोजी आला. त्यांचे आज्ञेप्रमाणे अष्टाक्षरी राममंत्राचे आठ लाखाचे ५२ दिवसांचे विधियुक्त पुरश्चरण केले. प्रभूकृपेने व माउलीचे परमकृपेने सर्व पुरश्चरण निर्विघ्नपणे व्यवस्थित व आनंदात पार पडले असून प्रभूच्या व गुरुमाउलीच्या अपार कृपेचे दिव्य अनुभव आले आहेत. ते मी वर्णन करू शकत नाही. पू. माउलीनी या भोळ्या भाबड्या जीवाचे कल्याण केले. त्यांच्या परममंगल चरणकमल स्पर्शाने या जीवनाचे सोने झाले. आतां त्यांच्या आज्ञेप्रमाणे सर्व साधना चालू आहे. माउली वेळोवेळी दर्शन देते प्रभु रामरायाचेही दर्शन घडविते. माझे सभोवताली सावली सारखी हजर असल्याचे जाणवते. माझी माउली मजपासून दूर नाही. मजजवळच आहे अशी माझी निष्ठा आहे. खात्री आहे व तसाच अनुभव आहे. व 'शंभू' अशी लाडकी हांकही नेहमी कानावर येते.

* * *

### कै. श्री. ग. स नाईक, ठाणे

गेल्या साधारण २५ वर्षांपूर्वी छोटी छोटी धार्मिक पुस्तके दुकानावर घेत असताना प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराजांचे संध्योपासना हे पुस्तक मिळाले. पुस्तक वाचून डोळे भरून आले. त्यातील पूर्वार्ध वाचण्यात आला व प.पू. स्वामी महाराजांचे भेटीबद्दल तळमळ लागली व बेचैन होऊन श्री. आदिनाथराव यादव ॲडव्होकेट परंडा यांना मे १९६८ मध्ये पू. माऊलींचे भेटीसाठी पत्र लिहिले. उलट-टपाली उत्तर मिळाले की पू. माऊलीनी २ महिन्यापूर्वीच प्रायोपवेशन करून परंडा येथे समाधी घेतली व पू. स्वामींच्या समाधीचे बांधकाम पूर्ण झाले आहे. हे पत्र वाचताच माझी अत्यंत विचित्र अवस्था होऊन मी फारच शोकाकुल झालो. नंतर स्वामीजींचे ठाणे येथील प्रेमी श्री. अनंतराव जोशीकडे चौकशी केली. पण समाधान होईना. तळमळ थांबेना.

मग एक दिवस असाच डोळे मिटून बसलो असतांना आता समाधीची वारी कर असा आदेश झाला व त्याप्रमाणे १९७० चे मे महिन्यात त्या महापुरुषाचे परम पवित्र समाधीचे दर्शन परंडा येथे जाऊन घेतले. समाधीला अश्रूंचा अभिषेक केला. बराच वेळानंतर मनाची पूर्ण शांतता झाली. श्री आदिनाथरावांकडून पू. स्वामींजींचा गुणगौरव व तपस्या व सामर्थ्य ऐकले. आणि तोच दिवस माझे जीवनातील सुवर्णाचा ठरला.

माझे, या देहाचे सद्गुरु म्हणून मी या पू. स्वामींनाच मानले व तेव्हापासून त्यांचीच पूजा करू लागलो. ती सतत चालू आहे.

पू. स्वामीजी समर्थ आहेत व या बालकाला वाट दाखवितात. प्रसंगी त्याला मदत करतात असे अनेक दिव्य अनुभव आले असून तेच आपले मोक्षगुरु आहेत ही भावना दृढ झाली. त्यांच्या पवित्र अशा चरणांच्या भक्तीशिवाय कांही माहित नाही. संकटकाळी त्यांच्याच धावा करावा व त्यांनी धावून येऊन संकट निवारण होते असे घडले. पू. स्वामीजींचे नावाचा घोष करणे व प्रेमाश्रू गाळणे एवढेच माझे निश्चित ध्येय ठरले आहे.

गेल्या ४ वर्षापासून दर गुरुपौर्णिमेला समाधीदर्शनाचा लाभ होतो व कधी कधी अभिषेक करण्याचा योग येऊन धन्यता मिळते. श्री गुरुकृपेने श्री हनुमानजींचे दर्शन होते व भेटेन एके दिवशी सांगेन सर्व तुजपाशी असा त्यांचे कृपेचा अनुभव येतो. पू. स्वामींमहाराजांची प्रत्यक्ष भेट नसतानाहि त्यांचे समाधिदर्शनानेच जीवनाचे सार्थक होत आहे. तेच माझे सद्गुरु मोक्षगुरु आहेत.

* * *

## प.पू. स्वामींचे अनुग्रहित कै. अ. शं. दामले यांचे मनोगत – त्यांची कन्या सौ. रेखा पटवर्धन यांचे तर्फे...

। जय श्रीराम ।

१९५६ च्या चातुर्मासात जेव्हा प.पू. स्वामी सांगली येथे श्री कृष्णा नदीच्या घाटावरील विष्णुमंदिरात होते तेव्हा त्याना प्रथम पाहण्याचा योग आला. प्रथमदर्शनी पाहताच मला ते माझे तीर्थरूप (वडीलच) वाटले. तेव्हाचे त्यांचे मुखमंडळावरील दिव्य तेज, दृढनिश्चयी वृत्ती, अत्यंत शुद्ध आचरण

इ.नी. मी व सौभाग्यवती प्रभावित झालो. तेव्हापासून त्यांची ओढ लागली व तिकडे मन ओढ घेऊ लागले आणि तेव्हापासून नित्यपूजेत वैश्वदेव पुरुषसूक्त व सोवळ्याने जेवणे तसेच १२०० गायत्री मंत्र व १३०० राममंत्र हे सर्व स्वामींच्या आज्ञेनुसार करण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न करू लागलो. आणि तो सुवर्णदिन आला. २१-३-५७ एकनाथषष्ठी दिवशी प.पू. स्वामींनी आम्हां उभयतांस अनुग्रह देऊन उपकृत केले व ते आमचे 'सद्गुरु' बनले.

माझ्यापेक्षाही माझ्या सौभाग्यवतीची श्रींवर निष्ठा अत्यंत होती, याचे हे उदा. माझी थोरली मुलगी ५ वर्षाची असताना तिसऱ्या मजल्यावरून पडल्याची तार आली तरीही 'आई' असून माझी सौ. जराही विचलित न होता म्हणाली स्वामींची कृपा असल्यावर तिला कांहीही होणार नाही. काळजीच नको आणि खरोखर तस्सच झालेले होते. ती तीन दिवस बेशुद्ध होती. परंतु त्यातून झोपेतून जागी झाल्याप्रमाणे ती उठली. तिला कुठेही साधे खरचटले देखील नव्हते.

मी संन्यासग्रहण करावा अशी प.पू. श्रींची इच्छा होती परंतु मी स्पष्टच सांगितले मला भूक व झोप अजिबात आवरत नाही. माझे सौ. ने श्रींना अगदी आनंदाने समाधानपूर्वक 'माझे पतीने संन्यास घेणेस माझी संमती आहे' सांगितले होते. परंतु माझे प्रयत्नच कमी पडले.

माझी पारमार्थिक उन्नती व्हावी म्हणूनच की काय श्री. ग.गं. पुरंदरे मजकडे सुमारे २/३ वर्षे भाड्याने राहीले होते. गृहस्थाचे वय वर्षे ८० चे आसपास. पहाटे ४। ४।। ते ७ ७।। त्यांचा प्रणवोच्चार चाले, तदनंतर दुग्धपान, पूजा. या वयात स्वतःच मूगाची डाळ व तांदुळाची खिचडी स्वतः बनवून रोज जेवण करीत. उपवासाचे दिवशी रताळी, वरी तांदूळ इ. असे. दुपारी दासबोध, ज्ञानेश्वरी, तुकाराम-गाथा इत्यादि सद्ग्रंथाचा तौलनिक अभ्यास चाले. पुन: सायं. भजन, असा त्यांचा नित्यक्रम असे. पण माझी पूर्व कर्मे आड आल्याने कदाचित् त्यांचे सत्संगतीचा योग्य तो लाभ मला उठवता आला नाही. श्रींच्या आदेशानुसार कठोर तपश्चर्येत शेवटी मी कमी पडलो. परंतु शेवटी केवळ गुरुकृपेमुळेच जवळ जवळ प्रायोपवेशन घडले व (शंकराची) रुद्राची आवड असल्याने बरोबर सोमवारी निराहार अवस्थेत प्राणोत्क्रमण झाले व नेत्रदानही घडले. रुद्रोपासना फळली.

सौ. रेखा– प.पू. स्वामींना प्रथम पाहिले ते मी सुमारे ११ वर्षांची असताना श्री. चिकुर्डेकर यांचे घरी. माझे वडील स्वत: पोलिस सब. इन्स्पे. अत्यंत तापट व कडक असा त्यांचा सर्वत्र दरारा असूनही ते स्वत: स्वामींना भीत असत, हे पाहूनच मला लहानपणापासूनच श्रींचा अनुग्रह त्यांचा वरदहस्त आपल्यावर सदैव रहावा ही आंतरिक ओढ होती. का ते सांगता नाही येत. परंतु श्री. ना.भा जोशी काकांची श्रीरामचरीतमानसाची पारायणे व प्रवचने ऐकून पाहून श्रीरामचरितमानस वाचन वा पारायणाची गोडी लागली. श्री ज्यांना अनुग्रह द्यायचा त्यांना अमूक इतका जप करून या असे सांगतच असत. तेच माझ्याही बाबतीत अपरोक्षपणे घडले असावे, असे वाटते. कारण माझी लहानपणापासूनची इच्छा वयाच्या ४० व्या वर्षी फलद्रूप झाली. ती प.पू. स्वामींच्या अनुग्रहाने. गुरुपौर्णिमेस (१९९५) केवळ स्वामींच्या कृपेमुळेच त्रिदिन साधकमेळावा व श्रीरामचरितमानसाचे यथासांग आवाहनपूर्वक पारायणाचे स्वप्न साकारले. तसेच कृपेची जी माऊली भेटली त्यांचा सत्संग लाभला, त्या पूजनीय कमाताई. कमाताई म्हणजे प्रेम अन् वात्सल्य, करुणा अन् कृपा यांचे साक्षात् दर्शन! श्रींचा प. पू. स्वामींचा असा प्रदीर्घ सहवास लाभावा अशी फार फार इच्छा होती ती काही अंशाने कमाताईंच्या सत्संगाने पूर्ण होत आहे. हे कृपाछत्र दीर्घकाळापर्यंत लाभो हीच श्री चरणी प्रार्थना! तसेच पूज्य तेजोमयानंदजी (चिन्मयमिशनचे प्रमुख) यांचाही वरदहस्त कमाताईमुळे लाभला आहे. तसेच सर्व गुरुबंधु भगिनींचे प्रेम व श्रीरामचरितमानस प्रेमीमंडळामध्ये स्वामीकार्य करण्याची सद्‌बुद्धी व सद्‌भावना प्रत्यक्ष कार्य रूपाने सेवारूपाने अखंड प्राणज्योत मावळेपर्यंत घडो ही प.पू. स्वामीचरणी, श्रीचरणी कळकळून विनंती! श्रीरामविश्रामधामचे स्वप्न उत्तम रीतीने साकारो ही त्या दयाघन श्रीरामरायाच्या चरणकमली प्रार्थना!

**श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु**

**प्रज्ञाशिष्या रामदासी**

* * *

## हनुमान चालिसा का महत्व

समय बलवान होता है । योगायोग से कई वर्षो पश्चात् मेरे परम स्नेही श्रीराम गिलडा कुछ दिनों पहले धुलिया आये थे! शायद यह घटित होना था । वार्तालाप के दौरान उन्होने सुझाव दिया कि मैने सन् १९६२ /६३ में उनके माध्यमसे परांडा में पू. स्वामी प्रज्ञानानंदजी के सानिध्य और छत्रछायामें, उनके मार्गदर्शनानुसार, एकसप्ताह का अनुष्ठान–जप हनुमान चालिसा का किया था, उसके अनुभव लिख भेजुं! इस संक्षिप्त लेखमें अनुष्ठान का प्रत्यक्ष अनुभव व प्रयोग और उससे हुवा प्रत्यक्ष परिणाम लिखने का प्रयास मात्र है । सम्भव है कि इस विवेचनमें धार्मिक विधि विधान, होम का. अधिक तपशील नही दे पा रहा हूँ । कारण इतने साल पुरानी यादोंका, सविस्तर विधि का तपशील याद भी नही है । मेरे दृष्टीसे महत्त्व प्रत्यक्ष अनुष्ठान प्रयोग और अनुभव का है । अपने जीवनकाल के उस खंडमे जब मैं दिशाहीन, घोर निराशा और हर ओर से अपने आपको लुटा हुवा महसुस करता था उस समय दैवयोगसे मुझे स्वामींजी के दर्शन की और मार्गदर्शन की अन्त:प्रेरणा हुई । इस अंत:प्रेरणाने मुझे परांडा लाया और स्वामींजी के प्रथम दर्शन और दृष्टिक्षेपमे ही मैने वह खिचाव और शक्ति अनुभव की । बरबस नतमस्तक होकर खुशीसे विभोर होगया । पहले ही दृष्टिक्षेपमें उन्होने वह बाते कही जो वास्तविकता थी और जिसके कारण से ही मैं परेशानी में था ।

उन्होने एक सप्ताह के लिये मुझे हनुमान चालिसा का जप एवं अनुष्ठान करने को कहा और उसके लिये मुझे आवश्यक बातें और विधि बतलाई । संक्षेपमें उस सप्ताहमें मैने प्रतिदिन हनुमान चालिसा का प्रात:काल और शुरुवातके पहले २/३ दिनों के लिये सुबहशाम मिलकर हनुमानजी के फोटोके सामने बैठकर १०८ बार पारायण करना शुरू किया । प्रात: उठतेही शारीरिक स्वच्छता के बाद फोटो के सामने नतमस्तक होकर दिया बत्ती लगाकर यथाशक्य एकही बैठक में वह पारायण स्वाध्याय करना था । भोजन केवल एक समय लेने के लिये कहा गया । इस पारायणकालमें स्वामीजींने समय समयपर मार्गदर्शन किया और पुछताछ

भी करते थे । पहले दो तीन दिन तो केवल गाथाएँ रटतेही रहता था । कारण एकाग्रता नही थी और अनेक प्रकार के विचारों के कारण मन स्थिर हो नही पाता था । फिर भी मार्गदर्शन के अनुसार जाप चालुही रखा और जोरोंसे हनुमान चालीसा पढते रहकर गाथाओं के अर्थपर मन केंद्रित करने लगा । परंतु मन अतिचंचल ही रहा और मन की अस्वस्थता बढती ही रही । अैसे समय कुविचारोंकाही जमघट जमता था । फिरभी अधिक एकाग्रतासे जाप चालू ही रखा । इसप्रकार करीब ४/५ दिन बीतने के बाद और सप्ताह के १/२ दिन पहले जब मैं अपना जाप चालु ही रखा था उस दिन करीबन २ घंटे के बाद मेरे सिर और दिमागमें एकदम चक्कर शुरु होगया और अनुभव किया की सर घुम रहा है । साथ ही जाप न चालु रखने की जबरदस्त इच्छा हुई । जाप करना मुष्किल हुवा और सब छोडकर गुपचुपसे चले जाने की जबरदस्त इच्छा हुई । फिरभी अति एकाग्रता से फोटो के सामने एकाग्रता से देखते हुये जाप जोर जोरोंसे बोलकर पुरा करने लगा । यह दिमाग के चक्कर का क्रम करीबन आधे घंटे से ज्यादा देर चलते रहा । फिर यह अनुभव हुवा की सिरके चक्कर कम होते हुये बंद होगये और धीरे धीरे दिमाग इतना शांत होगया की मै कल्पना भी कर नही सका । मन निर्विचारी और प्रशांत होते रहा और वह शांतता धीरे धीरे पुरे शरीर पर परिणाम करने लगी । उसके बाद मैने इतनी शांतता का अनुभव किया कि जिंदगीमें ना पहले कभी और ना बादमें अनुभवी है । वह प्रत्यक्ष अनुभव मैं अपने शब्दोंमें लिखकर बतानेमे असमर्थ हुँ । कारण यह अनुभव गम्य ही है । सप्ताह अंतपर पारायण की पुर्णाहुती होम हवन, मंत्र से स्वामींजीके मार्गदर्शनानुसार की गयी । उस बिधी का तपशील मुझे याद नही है । फिर भी हर क्रिया मैने अतीव श्रद्धा और विश्वास से पूर्ण की । अर्थात् स्वामीजी का आशीर्वाद और बहुमूल्य मार्गदर्शन के कारण ही यह चमत्कार हो सका । और जीवन के तरफ देखने की दृष्टिमें फरक पडा जो कमी अधिक मात्रामें आज भी है । हनुमान चालीसा अपने आपमें सिद्ध मंत्र और गुरु कृपा रही तो यह सिद्ध मंत्र आदमी की वृत्तीयों को सात्विक बनाते हुये हर विपदा को नष्ट कर सकता है । मैं अपना कम भाग्य समझता हूँ की जो अनुभव और शांति मुझे बिजली के भांती आकर छछोर कर चली गयी वह

स्थिती मैं वापस प्राप्त न कर सका । स्वामीजी का स्थान अत्युच्च कोटी के योगीयों में है । मैं उनके सानिध्य मे आया यही मेरा सौभाग्य था । जीवन के संध्या के ओर बढते समय प्रभु से यही प्रार्थना है कि उस प्रेरणा का कुछ अंश भी अगर सौभाग्य से प्राप्त हो सका तो कल्याण होना निश्चीत है।

उनके स्मृती को अभिवादन करते हुये मैं अपने यह अनुभव उनके चरणों में समर्पित करता हूँ ।

निवेदन- **ॲडव्होकेट लक्ष्मीचंद एच.मुधा**

धुलिया (महाराष्ट्र)

* * *

### सौ. राधाबाई जोशी (इस्लामपूर)

१९६४ साली परंड्यास दुसऱ्या दिवशीं अनुग्रह मिळाला. रोज जप व रामायण वाचन करते. संकटांत २/३ वेळां श्री. स्वामींचे दर्शन झाले. यजमानांना अनुग्रह नसून २/३ वेळा प्राण संकटातून वाचण्याचा अनुभव आला त्यामुळे त्यांचीही श्रद्धा बसली आहे. 'दत्ताची आराधना' करा 'जप करा' इत्यादि आदेश मिळाल्याचा अनुभव आला. * * *

### कै. श्री. वासुनाना आरे

१९४८ मध्ये नरसिंगपूर (कोळे) येथील घर लुटले गेले. आणि इसलामपूरला आलो आणि कापड दुकान घातले. भाड्याने डॉ. वैद्य यांच्या घरीं राहात असतां श्री. स्वामींचे दर्शन घडले. डॉ. वैद्य यांच्याच बरोबर सूर्यग्रहणाच्या पर्वकाली अनुग्रह मिळाला. पहिल्याच दिवशी विदेह स्थितीचा अनुभव आला. मला देवीचा मंत्र दिला होता. दुसऱ्या दिवशी महालक्ष्मीचे सायुध दर्शन झाले. इस्लामपूरहून अनवाणी चालत कोल्हापूरला जायचे. दर्शन झाले की येतांना बसने यावयाचे अशा ९ वाऱ्या झाल्या. अनवाणी चालण्याने त्रास होई. पायाला फोड येत. यावर श्री म्हणाले, 'यास देहशुद्धी म्हणतात'. त्यांनी सांगितल्याप्रमाणे साधना केली. 'कडब्याचा धंदा होईल' असे श्रींनी सांगितले होते. म्हणून ऊस लावला. त्यांतून बराच फायदा होऊन आर्थिक परिस्थिती सुधारली. हरिपूर, ब्रह्मनाळ, बागेतला गणपती, त्र्यंबकेश्वर इत्यादी निरनिराळ्या ठिकाणी राहून साधना केली.

(यांनी आयुष्यांतील शेवटची ७/८ वर्षे परांडा येथे राहून समाधिस्थानाची फार सेवा केली.)

* * *

## श्री. श्रीरामजी सीताराम गिल्डा, डोंबिवली

परम पूज्य स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्या प्रमुख शिष्यवर्गात यांची गणना होते. कै. बाबूकाका जोशी (श्री. ना. भा. जोशी) श्री. आदिनाथराव यादव उर्फ शंभू यांच्या प्रमाणेंच श्री. गिल्डा हे पू. स्वामींचे लाडके होते. श्री त्यांना लाडाने 'रामू' म्हणत.

श्री. श्रीरामजी गिल्डा यांना आपले अनुभव कुणास सांगणे पसंत नसल्याने या लेखिकेस (श्री. कमल वैद्य) जेवढी माहिती आहे तेवढी येथे दिली जात आहे. याची वाचकांनी कृपया नोंद घ्यावी.

हे नोकरीनिमित्त परंडा येथे राहात होते व श्री. आदिनाथ यांच्याच वाड्यांत त्यांचे बिऱ्हाड होते. त्यांना व श्री. आदिनाथ यादव यांना १९५९ साली एकदमच अनुग्रह मिळाला. माझ्या समजुतीप्रमाणे त्यांना विष्णू उपासना देण्यात आली होती. त्यांची पत्नी सौ. राजकुवर यानाही अनुग्रह लाभला आहे. विशेष म्हणजे श्री. गिल्डा यांची व पू. स्वामीजींची जन्मतिथी एकच आहे. त्यामुळे कदाचित् पू. स्वामींच्या ठिकाणचे बरेच गुण त्यांच्यातही दिसून येत असावेत.

पू. स्वामीजी परंडा येथे असतांना त्यांना एक महिनाभर काष्ठमौन पाळण्यास सांगितले होते. तसेच, त्यांच्या मस्तकावर हात ठेवून, 'माये, अपसर अपसर अपसर' असे शब्द उच्चारले होते! त्याचा परिणाम म्हणूनच त्यांच्या ठिकाणी गृहस्थाश्रमांत असूनही पूर्ण वैराग्य बाणलेले आढळून येत होते. त्यांनी श्रीरामचरितमानसाची १०८ च्या वर नवाह पारायणे व श्रीज्ञानेश्वरीचीही अनेक पारायणे केली होती. तसेच १९८९ मध्ये नाशिक येथे ६ महिने त्यांनी व्रत पाळले होते. गुजरातेत श्री नारेश्वर, महुवा आदि ठिकाणी राहूनही त्यांनी साधना केली होती.

श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळाचे ते मुख्य आधारस्तंभ होते. पण त्यांनी एकही पद भूषविलेले नाही. ते विश्वस्त नसूनही सर्व विश्वस्तांपेक्षांही

त्यांनी मंडळाच्या प्रगतीसाठी अधिक परिश्रम घेतले आहेत. त्यांच्या निष्काम कर्मयोगामुळेंच आज मंडळास स्थैर्य प्राप्त झाले असून त्यांच्यामुळेच पूज्य आचार्य किशोरजी व्यास, पूज्य मुरारी बापू, पूज्य स्वामी तेजोमयानदंजी (चिन्मय मिशन) इत्यादि संतांचे तसेच इतरही अनेक मान्यवरांचे कृपाशीर्वाद व बहुमोल आर्थिक सहकार्य इत्यादींचा लाभ मंडळास झाला आहे. मंडळाच्या कार्यांत त्यांचा सिंहाचा वाटा आहे व त्याबद्दल मंडळास त्यांच्याविषयी अत्यंत आत्मीयता व सार्थ असा अभिमानही आहे.

अनेक ग्रंथांचा अभ्यास असल्याने ते उत्तम लेखकही आहेत. 'रामू' या नांवाने त्यांचे लेख नेहमी प्रकाशित होत आले आहेत. अनन्य गुरुनिष्ठा, गुरुसेवेसाठी कितीही कष्ट सोसण्याची तयारी, चिकाटी, सचोटी, अनालस्य, ईश्वरभक्ती इत्यादि सद्गुणांनी ते संपन्न होते.

एका वर्षी श्रीसद्गरुंच्या पुण्यतिथीच्या दिवशीं म्हणजेच फाल्गुन वद्य दशमीच्या दिवशी आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संत, व श्रीरामचरितमानसाचे अनन्य-प्रेमी भक्त पूज्य मुरारीबापू यांचे श्री. श्रीरामजी गिल्डा यांचे घरीं आगमन झाले व श्री. श्रीरामजींनी श्री सद्गुरुस्वरूप समजून त्यांचे पूजन केले, ते त्यांनी आनंदाने स्वीकारले! श्री. श्रीरामजींच्या अनन्य गुरुनिष्ठेची ही प्रचीतीच त्यांना मिळाली असे म्हटले तर ती अतिशयोक्ति ठरणार नाही.

* * *

### कै. सौ. सावित्री पल्लोड, नाशिक

सौ. सावित्री ही सौ. राजकुंवरजी आणि श्री. श्रीरामजी गिल्डा यांची सुकन्या. तिला वयाच्या १०/१२ वर्षापासून मधुमेहाचा तीव्र विकार होता. तिचा विवाह श्री. गोपीकिसनजी पल्लोड यांच्याशी झालेला होता. १९९२ साली जानेवारी मध्यें तिचा विकार बळावला व किडनी बिघडून तिला देवाज्ञा झाली. त्यापूर्वी तिला आलेले कांही अनुभव खाली मुद्दाम दिले आहेत.

१९९१ च्या डिसेंबर मध्ये श्री. श्रीरामजी हनुमानयज्ञासाठी परांडा येथे आलेले होते. यज्ञसमाप्तीच्या दिवशी सौ. सावित्रीची स्थिती गंभीर असल्याची तार आली म्हणून ते यज्ञ होताच लगेच नाशिकला गेले. तो दिवस ३१ डिसेंबरचा होता. त्या दिवशी तिने भाऊंना ओळखले आणि म्हणाली,

'भाऊ तुम्ही आलांत?' नंतर मात्र ती बोलू शकली नाही. त्या आधीही ती. भाऊ महुवाला साधनेसाठी गेले असतां तिची तब्बेत बिघडली होती तेव्हां त्यांना महुआहून बोलावून घेतले होते. तेव्हां ती सर्वांना म्हणाली होती, 'भाऊला कशाला बोलाविले? त्यांच्या साधनेंत अडथळा कशाला?' अशा परम सात्विक, परमभागवत सावित्रीचे प्राणोत्क्रमणही तसेच अत्यंत सुखद, परम परमात्म्याच्या स्मरणांत झाले.

त्यापूर्वी काही दिवस तिला पहाटे स्वप्न पडले. त्यांत कनक सिंहासनावर बसलेले भगवान श्रीरामचंद्र दिसले. श्रीरामरायांनी तिला 'जानवे' घालण्यास सांगितले. तिने आपल्या भाऊस सांगितले, ''भाऊ भाऊ, श्रीभगवान 'जानवे' '' मागत आहेत. भाऊनी सांगितले, ''थांब आपण मंत्रून मंत्रोच्चारणाने जानवे घालू.'' येथेच स्वप्न संपले.

दोन दिवसांनी दुसरे स्वप्न पडले. त्यांत एक वानर दुरून धावत धावत तिच्याकडे येत होता. येऊन लगेच तिच्या खांद्यावर बसला. ती घाबरली. सांत्वनासाठी तिने मागे फिरून पाहिले. मागे एक शिवालय व श्रीरामालय मंदिर होते. समाधान झाले, हे वानर केवळ श्री हनुमान आहेत. ती अत्यंत हर्षित झाली. येथे हे स्वप्न संपले.

त्यांनतर एक स्वप्न पडले. ती वनांत होती. चितेसारख्या गोवऱ्या रचल्या होत्या. त्यावर तिने आपलाच अग्निदाह संस्कार आपल्याच डोळ्यांनी पाहिला. येथेच स्वप्न संपले.

येथे संत शिरोमणि तुकारामांची आठवण होते. *'आपुले मरण पाहिले म्यां डोळां । तो सोहळा अनुपम।।'*

गंमत अशी की ज्या खोलीत ती. भाऊंचे (श्रीरामजींचे) मौन साधन झाले, त्याच खोलीत येऊन ती राहिली. शेवटची यात्रा तिला येथून संपवावयाची होती. तिचे मृत्युभय संपले होते. ती अमृता होणार होती. अमृता झाली पण! त्याच खोलीत पुन्हां श्री हनुमानचालिसाचे हवन झाले. काही संकेत काही तरी नकळत सांगून जातात.

भगवान् एक वा अनेक रूपाने येऊन स्वतःच त्रास भोगून इतरांची दुःखे दूर करण्यासाठी स्वतः ढाल बनतात. भगवंताची परम अनुकंपा अगाध असते. लीलया ते काही करून जातात. आम्ही माणूस म्हणून

त्यांची अवहेलना करून त्यांची दखल घेत नाही.

अशा परम भाग्यवान, श्रीगजाननमहाराजांच्या कृपांकित चिरंजीव सावित्रीस आम्ही कां म्हणून प्रणाम करू नये? जिला स्वत: परमपूज्य श्रीसद्गुरुनाथ प्रज्ञानानंद सरस्वती एका नावेतून घेऊन जातात! मोठा हिरवा गार सागर आहे. चोहोंकडे पाणीच पाणी आहे. गेरुवे वस्त्रधारी स्वामी नाव चालवत आहेत. सावित्री समोर बसली आहे! कां ती भवसागर तरून नाही जाणार? आणि तिचे मरणही धन्य धन्य झाले!

श्रीरामाला केवळ प्रेमच प्रिय आहे. या प्रेमभक्तिच्या पोटीं कांही अश्रु – पावन करणारे अश्रु सर्वांना पवित्र करणार!

* * *

### श्री. एम. आर. अघोर, सोलापूर यांचे अनुभव

मी साधारणपणे १९६५ च्या ऑगस्ट महिन्यांत प्रथम पूज्य स्वामींच्या सान्निध्यात आलो. १९६७ मध्ये पू. स्वामी उस्मानाबाद येथे मुक्कामी होते. उस्मानाबाद जिल्हा अत्यंत कमी पाऊसमान असलेला जिल्हा. परंतु १९६७ च्या जून महिन्यांत सतत महिनाभर सूर्यदर्शन नाही असा पाऊस झाला आणि ओल्या दुष्काळाची चिन्हे स्पष्टपणे दिसू लागली. असेच पूज्य स्वामींच्या दर्शनास गेलो असतां स्वामी मला म्हणाले की पाऊस थांबवला पाहिजे. मी विचारले, ''कसा थांबणार'' त्यावर ते मला म्हणाले की ''आम्ही सांगतो त्याप्रमाणे प्रयोग करशील?'' मी हो म्हणालो.

दुसरे दिवशी स्नान करून सोवळ्यांत पू. स्वामींच्याकडे गेलो. त्यांनी मला एक मंत्र सांगितला व गावाच्या साधारण दोन मैल इतक्या अंतरावर वाहत्या नदीच्या काठी हातात पाणी घेऊन मंत्र दहा वेळा म्हणून हातांत असलेले पाणी आकाशाकडे फेकण्यास सांगितले. अशी तीन आवर्तने करण्यास सांगितले. सूचनेप्रमाणे मी नदीच्या काठाने गांवाबाहेर दीड एक मैल गेलो आणि सूचनेप्रमाणे क्रिया केल्या. माझे सोबतीस श्री. वडगावकर ह्यानां पाठवले होते. आम्ही जातांना व पू. स्वामींच्या सूचनेप्रमाणे क्रिया करीत असता मोठा पाऊस पडतच होता. परत आल्यानंतर साधारणपणे पाऊस कमी होण्यास सुरुवात झाली आणि दोन तासाचे अवधीत पाऊस

पूर्णपणे थांबला. त्यावर्षी उस्मानाबाद जिल्ह्यांत अत्यंत चांगली पिके झाली.

२) अदृश्य सृष्टी नाही असे आपण म्हणतो पण अदृश्य सृष्टी असावी. असो. माझे मेव्हणे आणि त्यांचा मित्र १९६८ मध्ये बस्तरला गेले होते. परत आल्यानंतर त्यांचा मित्र कोणत्या तरी विचित्र शक्तीने झपाटल्यासारखा वागू लागला. त्याला स्वामींच्या समोर आणतांच 'या गंगाधर शास्त्री' असे स्वामी म्हणाले व त्यावर हातात पाणी घेऊन कोणत्या तरी मंत्राने प्रोक्षण केले. पुढे १/२ दिवसात त्याचे वागणे पूर्ववत् झाले.

३) अगदी ताजा अनुभव म्हणजे १९९६ च्या जुलै महिन्यांतील आहे. गुरुपौर्णिमेसाठी परंड्यास जाण्याचे ठरविले. २७ –७ –९६ दुपारी ४ च्या गाडीने जाण्याचे ठरवले पण काही कारणामुळे ४ ला ५ मिनिटे असतांना मी घरांतच होतो. तेवढ्यांत माझी मुलगी काम करत असलेल्या फॅक्टरीच्या मालकीण बाईंचा फोन आला की मला स्वामींसाठी ५१ रूपये गुरुपौर्णिमेसाठी पाठवायचे आहेत. तुम्ही घरीच थांबा. मी फोनवर माझी लगेच ४ वा. गाडी असल्याचे सांगितले, त्यावर मी गाडी पाठवते पैसे घ्या व त्याच गाडीने स्टँडवर जा. स्टँडवर पोहचविण्याची मी ड्रायव्हरला सूचना देते असे सांगितले. त्याप्रमाणे गाडी आली; मी स्टँडवर गेलो आणि मला गाडीही मिळाली. हा प्रसंग दि. २७ –७ –९६ चा म्हणजे स्वामी समाधिस्थ झाल्यानंतर २७ – २८ वर्षांनी आलेला अनुभव आहे.

* * *

**हे शारदे,**

तुझ्या सदा खुल्या आणि खच्चून भरलेल्या शब्दभांडारातून काही अमोल रत्न हस्तगत करावी म्हणून इकडे तिकडे पहात, दबकत, थबकत मांजराच्या पावलाने हळूच आले दारात तों काय -

तूंच साक्षात स्वागतास उभी, स्मितहास्य करीत -

हे मनहरिणी - चोराची पावलें चोराला ओळखली असं तर झालं नाही ना?

भिकाऱ्यावरून भाकर तुकडा टाकावा तो जसा त्या तुकडयाकडे आसावून विस्फारलेल्या डोळ्यांनी पहात राहील ना?

तशी झाली माझी अवस्था, तूं मायेने ये आत म्हणालीस आणि माझ्यावरून मूठभर चंद्रमणी ओवाळून टाक लेस ना तेव्हां, घे ना काय हवे ते मोकळ्या मनाने, आपल्या हाताने घे म्हणालीस / आणि काय सांगू? हृदय कसं उचंबळून आलं कृतज्ञता कशी व्यक्त करावी कळेना - मी आई म्हणून प्रेमभराने तुला मिठी मारली मात्र -

शब्दांचे बुडबुडे फुटूनच गेले. जिकडे तिकडे निळियाची खाणच उघडली. तू मी सारेच जे आहे ते निलमण्यांचेच दिसू लागले. शब्दरत्नांचे भांडार तू का खुले केलेस ते कळलं आई या शब्दात काही अर्थच नव्हता ग. त्या पलीकडले तू जे दिलंस / ते मी शब्दात कसं सांगू आई?

**कमा**

॥ श्रीगणेशाय नमः ॥

## । चन्द्रशेखराष्टकम् ।

जामातरं नगेन्द्रस्य कैलासशिखरे स्थितम् ॥
गङ्गागौर्यौ प्रिये यस्य नमामि चन्द्रशेखरम् ॥१॥

कर्पूरसुन्दरं देवं शशाङ्कं मस्तके धृतम् ।
शिवं विशालनयनं नमामि चन्द्रशेखरम् ॥२॥

व्याघ्राम्बरं महादेवं भक्तसङ्कटहारिणम् ।
मदनारिं विरूपाक्षं नमामि चन्द्रशेखरम् ॥३॥

कण्ठे धृतं विषं येन रामनामामृतं तथा ।
भुजङ्गेन भूषिताङ्गं नमामि चन्द्रशेखरम् ॥४॥

रामेश्वरं रामदासं राममित्रं चिदात्मकम् ।
त्र्यम्बकं स्कन्दपितरं नमामि चन्द्रशेखरम् ॥५॥

आशुतोषं गणेशाङ्कं शान्तमूर्तिं कृपाकरम् ।
काशीशं जगदाधारं नमामि चन्द्रशेखरम् ॥६॥

कामदं सुखदं शान्तं शङ्करं भस्मभूषितम् ।
लोकेशं ताण्डवे मग्नं नमामि चन्द्रशेखरम् ॥७॥

भक्तकामकल्पवृक्षं कामघ्नं करुणाकरम् ।
भक्तिदं मुक्तिदं दान्तं नमामि चन्द्रशेखरम् ॥८॥

स्तवं चन्द्रशेखरस्य परमानन्ददायकम् ।
विन्देत् शिवकृपां सर्वः पथः निष्कण्टको भवेत् ॥९॥

* * *

## ।। श्रीगणेशाय नमः ।।

## ।। राघवस्तवः ।।

भूषणं भानुवंशस्य चेक्ष्वाकुकुलवर्धनम् ।
रघूत्तममजपौत्रं तं नमामि रघुनन्दनम् ।।१।।

कौसल्यानन्दनं रामं दशरथस्य प्रियात्मजम् ।
सौमित्रभरतबन्धुं तं नमामि रघुनन्दनम् ।।२।।

वसिष्ठस्य प्रियं शिष्यं कौशिकमखरक्षकम् ।
सुबाहुप्राणहर्तारं नमामि रघुनन्दनम् ।।३।।

त्राटिकाप्राणमोक्तारं मारीचशासकं शिवम् ।
धनुर्वेदे सुनिविपुणं नमामि रघुनन्दनम् ।।४।।

अहिल्योद्धारकं विष्णुं भवकोदण्डभञ्जकम्।
भार्गवदर्पहर्तारं नमामि रघुनन्दनम् ।।५।।

जनकजामातरं सौम्यं जानकीप्रियवल्लभम् ।
अयोध्यानन्ददातारं नमामि रघुनन्दनम् ।।६।।

पित्राज्ञापालकं श्रेष्ठं भरतशोकहारकम् ।
मातुः सान्त्वनकुर्वाणं नमामि रघुनन्दनम् ।।७।।

चित्रकूटवासिनं शान्तमनसूयात्रिपूजितम् ।
जयन्तदण्डदं दान्तं नमामि रघुनन्दनम् ।।८।।

खरारिं दूषणारिं च रामं शूर्पणखारिपुम् ।
हेम्नमृगानुगच्छन्तं नमामि रघुनन्दनम् ।।९।।

सीताविरहव्याकुलं जानकीस्मृतिदुःखितम् ।
सीतान्वेषणकर्तारं नमामि रघुनन्दनम् ।।१०।।

शबर्या पूजितं राममङ्गदयौवराज्यदम् ।
वालीप्रमथनं वीरं नमामि रघुनन्दनम् ।।११।।

सुग्रीवराज्यदं रामं सुग्रीवसौख्यदायकम् ।
सुग्रीवकृतविश्वासं नमामि रघुनन्दनम् ।।१२।।
कपिसहायकं रामं सुग्रीवहनुमप्रित्यम् ।
अङ्गुलीयकदातारं नमामि रघुनन्दनम् ।।१३।।
प्राप्ते चूडामणौ देव्याः प्रियाविरहकातरम् ।
हनुमद्वरदातारं नमामि रघुनन्दनम् ।।१४।।
दृष्ट्वा बिभीषणाचारं लङ्काभिषेककारिणम् ।
बिभीषणशरण्यं तं नमामि रघुनन्दनम् ।।१५।।
कुम्भकर्णस्य हर्तारं रावणकुलमर्दकम् ।
दशग्रीवहरं रौद्रं नमामि रघुनन्दनम् ।।१६।।
लोकानां हितकर्तारं राघवं मुक्तिदायकम् ।
सीतास्वीकारिणं रामं नमामि रघुनन्दनम् ।।१७।।
सर्वदेवैः स्तुतं भद्रं ससीतापुष्पकारुढम् ।
भरतानन्ददातारं नमामि रघुनन्दनम् ।।१८।।
अयोध्यां प्रति गन्तारं प्रजानुरञ्जने स्थितम् ।
राज्यस्वीकारकुर्वाणं नमामि रघुनन्दनम् ।।१९।।

रामः बालकरूपेण आविर्भवतु सर्वदा
सगद्गदितेन कण्ठेन कमला स्तौति तं सदा ।।१।।
स्तवं रामचन्द्रस्य भक्त्या यश्च नरः पढेत् ।
दद्यात् रामपदं तस्मै कमलायाश्च प्रार्थना ।।२।।

* * *

# भूपाळ्या

## श्रीगणपतीची भूपाळी

उठि उठि बा गणराया, झाला अरुणोदय सखया ।
कृपा करि शिवतनया, सुंदर वदना दावोनी ।।धृ ।।
प्रदक्षिणा राम – नामीं, घालुनि झाला पूज्याग्रणी ।
नामीं श्रद्धा वाढवूनी, साह्य करावे दीनबंधो ।।१।।
साधकांची विघ्ने हरा, रामप्रेम हृदयीं भरा ।
प्रज्ञाशिष्या जोडुनि करा, प्रार्थितसे तव पायी ।।२।।

* * *

## श्री सद्गुरुंची भूपाळी

उठि उठि बा गुरुराया, करण्या दीनावरती दया ।
आम्ही आलो तुझिया पाया, दया सागरा सुखसिंधो ।। धृ.।।
तुम्ही रामाचे प्रिय दास, रामाहुनि थोर खास ।
तुमचे ठायीं त्यांचा वास, नाही येथे संदेह ।।१।।
आला तुम्ही गुरु राया, राम – कार्य करावया ।
रामायणा अनुवादुनिया, ऋणीं केले महाराष्ट्रा ।।२।।
झाला पंच उष:काल, टेकूं द्या तव चरणी भाल ।
दर्शन होता प्रात:काल, जन्म सुफल अमुचा हो ।।३।।

करावे प्रभु मुख प्रक्षालन, रामा लोणी साखर देऊन ।
प्रसाद द्यावा आम्हा लागुन, विनंती आमुचि ऐकावी ।।४।।
रामा तुम्ही आळवितां रामप्रेमा प्रवाहितां ।
स्नान प्रभुप्रेमी घडवितां तुच्छ वाटे मोक्ष सुख ।।५।।
इतुकी ऐकोनि विनवणी । कृपेने द्वार उघडुनि झणीं ।
दर्शन भक्तांना देउनी । प्रेमवृष्टी करीतसा ।।
(कृपादृष्टीं करीतसा )।। ६।।

* * *

## वायुनंदनाची (मारुतीची) भूपाळी

उठि उठि बा वायुनंदना, कमा विनवितसे चरणां ।
करूं इच्छिते रामदर्शना, साह्यकारी तुम्ही व्हावे ।।धृ.।।
सत्वर उठतील जगजेठी, त्यांचे चरणीं घालीन मिठी ।
करूनी द्यावी त्यांची भेटी । चरणीं आपुल्या प्रर्थितसे ।।१।।
वश तुम्हां रघुराणा । म्हणुनि विनवित मी चरणां ।।
विनंती माझी प्रभूचरणां । आठवण तुम्हीं करवावी ।।२।।

* * *

## सीतेची भूपाळी

उठि उठि वो जगजननी, राम प्रिय अर्धांगिनी ।
तुझिया सहाय्यावांचोनि, प्रभुलीला न घडे चि ।।धृ.।।
प्रभूची प्रेरणा मिळता । विधि हरि शंभुसी नाचवितां ।
अगाध महिमा तव वर्णिता । शेष शारदा ही थकती ।।१।।
कमा विनवितसे चरणां । सत्वर देई वो दर्शना ।
रामभक्ति प्राप्त होण्या । आशीर्वचना तुम्ही द्यावे ।।२।।
उठि उठि वो जगजननी...

* * *

## जगदंबेची भूपाळी

उठी उठी गे जगजननी । देवी मिथिलेश नंदिनी ।।
राम वल्लभे अवधवासिनी । सत्वर उठि जगदंबे ।।धृ.।।
निशा सरोनि उषाराणी । दर्शना तुझ्या पातली झणी ।।
दर्शन द्यावे भक्ता तुम्ही । विनवी कमला तव चरणी ।।१।।
राम प्रेम द्यावे आम्हां । हीच विनंती करतो तुम्हां ।।
सीताराममय जाणुनि सर्वां । घडावी सेवा विनवितो ।।२।।

* * *

## श्री प्रभु रामराजाची – रामचंद्राची भूपाळी

उठि उठि बा रामचंद्रा, सखया पुरे झाली निद्रा ।
बघु हसरी तुझी मुद्रा, राजीव नेत्रां उघडी रे ।।धृ ।।
मूळ पुरुष भानुराजा सत्वर येईल क्षितीजा ।
सेवे सादर व्हावे राजा, कर चिमुकल्या जोडी रे ।।१।।
लाडकी तव राघू – मैना, घेति मधुर स्वरें ताना ।
साद तुला राजीव – नयनां, घालिती उत्तर त्यांना दे ।।२।।
उठी बा राजीवा मोहना, सत्वर प्रक्षाळी आनना ।
करोनियां दुग्ध – पाना, शरयू – स्नाना जा वेगी ।।३।।
दारीं बंधु सखे तिष्ठती, राम उठला कां पुसती ।
बोलावी बा तुज सांगाती, उपहारासी बैसविते ।। ४।।
इतुके ऐकतांचि राम नेत्रां उघडी घनश्याम ।
संतोषोनि पूर्णकाम बंधुसख्यांना आलिंगी ।।५।।

* * *

## श्रीकृष्णाची भूपाळी

उठि उठी बा बाळकृष्णा । माझ्या जीवीच्या जीवना ।
पाही मजकडे राजीव नयना । प्राणाधारां हृषिकेशी ।।धृ.।।
उदयां येईल वासरमणी । छकुल्या उठ उठ बा झणीं ।
गायी हंबरती अंगणी । दर्शन उत्सुक त्या झाल्या ।।१।।
सत्वर प्रक्षाळीं आनना । लोणी साखर रुचते नां ।
दारीं तिष्ठती गोपांगना । दर्शन द्यावे त्या लागी ।।२।।
घालूं स्नान चक्रपाणी । पीत वस्त्रां लेववुनी ।
घालू विविध बाळलेणी । तिलक गोरोचन करूं या ।।३।।
उभा चैतन्याचा गाभा । पाहुनि अपार मुखशोभा ।
हर्षे यशोदा सुभगा । वारंवार आलिंगी ।।४।।
मुख चुंबी वारंवार । तिच्या भाग्या नाही पार ।
स्तनांतुनि दुग्ध – धार । स्रवे काय सांगावे ।।५।।
दामा पेंद्या बलराम । उत्सुक बघण्या घनश्याम ।
पुकारिती कृष्णनाम । कृष्ण येउनी आलिंगी ।।६।।
प्रात:काळिं दधिमंथनीं । गौळणी गाती तुज गाणी ।
डोळां भरले प्रेमें पाणी । भाग्या त्यांचे कशी वर्णू ।।७।।

* * *

## श्री शंकराची भूपाळी

उठि बा शिवशंकरा, दयाळा अरुणोदय झाला ।
गंगा गिरिजा नंदी भृंगी बाहती बा तुजला ।।धृ।।
अरुणोदयिचा नभीं लालिमा शोभतसे फार ।
जटेतून पावन गंगेची वाहतसे धार ।
भक्त प्रेमें तुझे गर्जती हर हर महादेवा ।
सगळे उत्सुक असती शंभो, करण्या तव सेवा ।।१।।

तुझ्या कृपेवीण रामभक्ति ना लाभतसे कोणा ।
तुला पूजितो प्रेमाने अति सदा रघूराणा ।
विश्वहितास्तव गरल प्राशिले विनवुं दुजां कवणा ।
कमा प्रार्थिते, रामप्रेम द्या कैलासराणा ।।२।।

* * *

## भूपाळी सर्व देवाची

उठि उठि बा गजानना । सत्वर ऊठ उमारमणा ।।
दशरथनंदन, नंदनंदना । भगवती दुर्गे ऊठ झणी ।।धृ.।।
महालक्ष्मी सरस्वती । अत्रिनंदना मारुती ।
गरूडवाहना, दिक्पती । उठा सर्व हो विनंवू पदी ।।१।।
कलियुग मातले फार । अत्याचार, भ्रष्टाचार ।।
यांचा झालासे सुकाळ । परमदयाळा तुम्ही वारा ।।२।।
दैवी संपदा लोपली । आसुरी संपद फोफावली ।।
देवगण हो तुम्हीच वाली । भक्तालागी रक्षावे ।।३।।
सद्गुरू रूपे तुम्ही तारा । द्यावे अभय कृपाकरा ।।
कमा जोडिते उभय करा । चरणी ठाव द्यावा हो ।।४।।

* * *

## भूपाळी खंडोबा (मल्हारी) ची

उठि उठि बा मल्हारी । उदया येतो तमारि ।।
भक्त तिष्ठति तुझिये दारी । दर्शन द्यावे दयाळा ।।धृ.।।
घोर मणि मल्ल मारिले । काम क्रोधाचि जणूं वधिले ।
इंद्रिय अश्वीं आरूढले । भक्त नेला निजपदीं ।।१।।
चंपक गौर कांती तुमची । गिरिजा भाळली साची ।।
म्हाळसा रूपे तुजला वरी । जेजुरीच्या खंडोबा ।।२।।

सत्वर उठुनि पुरारि । दर्शन द्यावे असुरारि ।।
भक्तां तोषवि अभयकरी । प्रज्ञाशिष्या विनविते ।।३।।

* * *

## भूपाळी लक्ष्मी नृसिंहाची

उठि उठि बा लक्ष्मीपती । नरसिंह रूप जगत्पती ।।
त्रस्त झालो कमलापति । कलियुग आम्हां छळतसे ।।ध्रु।।
साधक आम्ही भक्तजन । जणु की प्रल्हाद जाणून ।।
हिरण्यकशिपु अहंकार मारून, घ्यावे आम्हां अंकावरी ।।१।।
शांत व्हावे प्रल्हादपती । सौम्यरूप धरूनी अति ।।
अभय द्यावे वरद – हस्ती । कृपासागरा कृपा करी ।।२।।
उदया आला वासरमणी । मस्तक ठेवितो चरणीं ।।
कुळदैवत अमुचे तुम्हीं । सांभाळावे आंम्हासी ।।३।।

* * *

## भूपाळी दत्ताची

उठि उठि बा दत्तात्रेया । येई अंबरमणि उदया ।
दर्शन द्यावे करा दया । माया वारा सदया हो ।।ध्रु।।
करुणेची करा वृष्टी । दासा धरा आपुले पोटी ।।
सदा साह्य करा संकटी । धावुनी सत्वर यावे हो ।।१।।
अवगुण आमुचे सर्व हरा । ठाव पदीं द्या दिगंबरा ।।
कमा जोडितसे निज करा । विनंती मान्य करावी ।।२।।

* * *

## भूपाळी राघवेंद्र स्वामीची

उठि उठि बा राघवेंद्रा । अंबरमणि येईल उदया ।
भक्ता दर्शन देई सदया । प्रज्ञाशिष्या प्रार्थितसे ।।ध्रु।।

हनुमंताचे अवतार । भगवत् भक्ता आधार ।
धर्मरक्षणी तत्पर । म्हणुनी तुम्हां विनविते ।।१।।

* * *

## भूपाळी रामकृष्ण परमहंसाची

उठि उठि बा रामकृष्णा । सारदा मातेच्या जीवना ।।
नरेंद्राच्या संजीवना । ऊठ दयाळा, ऊठ झणीं ।।ध्रु.।।

अज्ञान तिमिर माझे हरा । ज्ञानसूर्य हृदिं उजळा ।।
भावभक्ति कमळ फुलवा । सुगंध पसरो अद्वैताचा ।।१।।

सतीचे प्रेम पतीवरी । अथवा मातेचे अपत्यावरी ।।
विषयीजनांचे विषयावरी । सर्व एकवटो प्रभुचरणी ।।२।।

कालिमातेच्या लडिवाळा । भक्त जन कृपाळा ।।
जगद्गुरो प्रणतपाळा । रामभगिनी विनविते ।।३।।

* * *

## भूपाळी गजाननाची

उठि उठि बा गजानना ।
लाडक्या पार्वतीश नंदना
प्रज्ञाशिष्या करी वंदना । दर्शन द्यावे तिजलागी ।।ध्रु.।।

रक्त पुष्पे रक्तांबर ।
ताजे दुर्वांकुर सुंदर ।
भाळी शोभतसे सिंदूर शमीपत्रे वाहतसे ।।(अर्पितसे)

तुझे रूप मनोहर ।
तुझे नाम विघ्नहर ।
पाहतां निवतसे - अंतर । अश्रूनेत्री दाटती ।।२।।

अंगारकी संकष्टीसी ।
भक्त तुजला उपासिती ।
मोदक मोदाने अर्पिती ।
पूजिती प्रेमें गणपती ।।३।।

विनवी प्रेमे तुज माता ।
उठोनि नमन करी ताता ।
दारी तिष्ठतो ज्येष्ठ भ्राता बोलवितो तुजलागी ।।४।।

ऐशी ऐकूनी विनवणी ।
उठता त्वरे चिंतामणी ।
माता प्रेमे अलिंगुनी लिंबलोणकरीतसे ।।५।।

हरि ॐ तत् सत्

* * *

## भूपाळी

उठो उठो भैय्या भयो हैं भोर ।
भगिनि मनावत नंदकिशोर ।।ध्रु.।।

गौ और बछडे करत हैं शोर ।
दर्शन उत्सुक सब हैं तोर ।।१।।

अनुज सखा और भक्त चकोर ।
नाम पुकारत सब हैं तोर ।।२।।

गोपी गात हैं भावविभोर ।
दर्शन देना, माखनचोर ।।३।।

माय जसोदाके भाग हैं थोर ।
आलिंगत उन्हे विश्वचित्तचोर ।। ४।।

* * *

# काकडारत्या

## श्री सद्गुरुची

काकडारती माझ्या श्री गुरूरायासी, स्वामी सद्गुरूरायासी ।
करितां प्रेमें मुक्त होते चरणांची दासी ।।धृ.।।
उपकारांची ज्यांच्या न ये करिता गणती ।
हृदयिं ध्याता चरण त्यांचे त्रिदोषही पळती ।।१।।
नखज्योतीचा प्रकाश हरतो अज्ञान भ्रांती ।
स्वरूप - ज्ञान नी भक्ती देऊनि देतो विश्रांती ।।२।।
रामकृपेविण न प्राप्ती भाविकास होई, तयांच्या भाविकास होई।
भाग्यें त्यांचे चरण लाभले, कैसी उतराई ।। होऊं कैसी उतराई ।।३।।

* * *

## श्री अंजनीतनय मारुतीची

काकड आरती अंजनी तनया, ओवाळितां भव जातसे विलया ।।धृ.।।
रामदास तुम्ही भक्त रामाचे, परम प्रिय त्यांना काय वानूं वाचे।
आणवुनि रामासी भेटवा सखया ।।१।।
सीतामातेच्या करूनि सांत्वना, रक्षक मर्दुनि जाळिले वना ।
लंका जाळुनी, मारुनी अखया, प्रभूकडे तुम्ही सत्वर परत या ।।२।।
कालनेमीला मारिले तुम्ही, द्रोणागिरी आणिला सहज उचलोनी ।
लक्ष्मणा जिववोनी, केले ऋणी रामराया,
गुण आठवितां होते पुलकित मम काया ।।३।।

* * *

## श्रीकृष्णाची

काकड आरती माझ्या श्रीकृष्णनाथा, माझ्या प्रिय जगन्नाथा ।
ओवाळुनी चरणीं तुझ्या मी ठेवितसे माथां ।।धृ.।।
देवकीनंदन वसुदेव सुता, अगम्य तव लीला, देवा अगम्य तव लीला ।
शेष शारदा वर्णू न शकती तुझ्या बाळलीला ।।१।।
श्यामसुंदरा जसुमतितनया नंदकुमारा रे कृष्णा, नंदकुमारा रे ।
प्रसन्न होउनि कधि मज देसी, भक्ति तुझी बा रे ।
प्रज्ञाशिष्या तुला प्रार्थिते कृपासागरा रे, प्रार्थिते दयासागरा रे ।।
प्रगट होउनी मला शांतवी, देइ दर्शना रे ।।२।।

* * *

## श्री शंकराची

काकड आरती देवा तुजला ओवाळूं प्रेमभराने आनंदाने तुझे गुणा गाऊं ।।
गरल – धरा गंगाधर ईशा, सदा तुला ध्याऊं, गौरीशा सदा तुला ध्याऊं।
तुझ्या कृपेने भवसागर हा सुखें तरून जाऊं ।।१।।
तुझ्या कृपेविण रामकृष्ण ना प्रसन्न कधी होती । ना प्रसन्न कधी होती,
भेद नसे तुम्हांमधी तिळभर, मूढ कसे जाणती ।।२।।
हे शिवशंभो, हे करुणाकर, रामसख्या देवा ।
रामसख्या देवा, तुझ्या कृपेने सदा घडावी रामाची सेवा ।।३।।

* * *

## पांडुरंगाची काकडारती

युगे अठ्ठावीस उभा पंढरीचा राणा ।
काकडा ओवाळू त्यांच्या धरूनिया चरणां ।।ध्रु।।
पुंडलिकासाठी आला भीवरेच्या तीरीं ।
उभा असे वीटेवरी कर कटावरी ।

कृपादृष्टी करी सदा निज भक्त राणा ।।१।।
पाहुनिया मुखशोभा तृप्ती नव्हे मना ।
फिरून पहावे वाटे रुक्मिणी रमणा ।
प्रज्ञाशिष्या विनविते दावी रामचरणा ।। (कृष्ण चरणा) ।।२।।

* * *

## सर्व देवांची काकडारती

काकड आरती सर्व देवमय गुरुला
ज्यांच्या रूपी देवगण हा सर्व एकवटला ।
अनंत रूपे, अनंत नामे एकचि तो नटला ।।
त्यास वंदिता सर्व देवांची कृपा लाभे मजला ।।१।।
महावाक्य उपदेशे हरती जे अज्ञानाला ।।
सद्गुरू चरण ते सोडुनि आम्ही वंदू कवणाला ।।२।।

* * *

## खंडोबाची काकडारती

काकड आरती खंडोबा तुजला ।
जेजुरी वससी दर्शन द्या मजला ।।ध्रृ ।।
पतित पावन म्हाळसाकांता ।
भक्तांच्या आता पाहू नये अंता ।।
आशुतोष नामे आळविती तुजला ।
का हो आम्हासी धरिला अबोला ।।१।।
हळद खोबरे उधळून भंडारा ।
येळकोट म्हणून जोडितो करा ।।२।।
पालखी वाहुनि करूं जयजयकारा ।
खंडोबा, मल्हारी तुम्ही आम्हा तारा ।।३।।

* * *

# पाळणा

## पाळणा हनुमंताचा

(चाल आरतीसारखी)

जो जो जो जो रे, जय हनुमंता
केसरी नंदन, अंजनी सुता ।।ध्रु ।।

वेंकटाचली, तप करी माता
प्रसन्न झाली, वायू देवता
प्रसाद ऽ पायस ऽ दिध ऽ ले हाता
प्राशूनी माता होई मूदिता ।।१।।

जो जो जो जो रे,

जन्मता झेप ऽ घेई आकाशी
खेळू लागला, सूर्य देवासी
राहू जो आला, ग्रासाया त्याशी
मुष्टीत धरला, पळे इंद्रासी ।। २।।

जो जो जो जो रे,

धरे ऐरावता, इंद्र घाबरे
वज्र फेकिता, हनु लागे त्वरे
सुत हो मूर्च्छित वायू बावरे
अवरोध करूनी जाई विवरे ।। ३।।

जो जो जो जो रे,

अवरोधे विश्व व्याकूळ झाले
प्रार्थिती वायुसी देव शरण आले
ब्रह्म्याच्या स्पर्शे बाळ ऊठले
पुष्पे वर्षूनी देवे वर दिधले ।। ४।।

जो जो जो जो रे,

राम सेवेलागी काया वाचा मनी
अक्रावा रूद्र प्रगटला भुवनी
अद्‌भुत चरित्र वानीता जनी
आनंद अमुच्या मावेना मनी ।। ५।।

जो जो जो जो रे,

* * *

## अंगाई गीत
## (अक्रूर)

नीज गडे, नीज गडे घनश्यामा (श्रीरामा)
निज नीज माझ्या रामा ।।ध्रु.।।

या रघुवंशी झाले नृपति अनेक,
गुण शीले जिंकिती लोक
तव पिताहि आहे थोर
सुरशत्रुसि ज्याचा घोर
थरकापति धाके वीर
निज आचरणे केले उज्वल नामा,
निज निज माझ्या रामा ।।१।।

अशि अनुपम बा, परंपरा तुज लाधे
करणे तुज काज न साधे

भरवसा असे मन्मनी
मम बाळ असे हा सुगुणी
पुरजनि हा प्रिय ग, सजणी,
निज वृद्ध पित्या, दे छकुल्या आरामा (विश्रामा).. निज निज ..।।२।।

ये, ये ग सये, बघ हा गाली हसतो
जणु जाणे वचना मम तो
किति हसतो बाई गोड
सखि, लावि मनाला वेड
जरी अवखळ येइ न चीड
गुण लावण्ये करि हा मोहित कामा .. निज निज... ।।३।।

निज रे छकुल्या, चिमण्या राजस बाळा
बघ झाली कातर वेळा
हे इवले मखमलि ओठ
जणु मोदाची लयलूट
या लावुं ग, गाली तीट
कुणि दुष्टाची नजर न हो श्रीरामा..निज निज... ।।४।।

किति अचपळ रे, झोप सावळ्या घे ना
चिमुकले नयन मिटती ना,
हे जावळ काळे कुरळे
ओढुनी हात ही दमले
का स्वस्थ न निजसी कळले
हा अंगारा भाळिं लावु गुणग्रामा, निज निज .. ।।५।।

* * *

## पाळणा सीतेचा

जो जो जो जो गे, जगजननी । मिथिलेश ऽनंदिनी ।
निद्रा करि बाळे, मन मोहिनी । स्मित मुखि चंद्राननी ।।
पाळणा लांबविला, मिथिलेसी । विदेहाचे वंशी ।।
कन्या प्रगटली, कमलाक्षी । सुनयनेचे कुक्षी ।
हालवि सुनेत्रा सुंदरी । आनंदली मंदिरी ।।
आशिष मुनिवरी । सुरवरी पुष्पे वर्षिली भारी ।
सुर संरक्षाया, आदिमाया । धरिते मानवी – काया ।।
दान ऽव छळती, मुनिराया । चिंता नेइल विलया ।।
माता नेणऽते प्रऽभावा । धरि वात्सल्य भावा ।
पुसते मुनिराया, सद्भावा । ठेवू काय मी नावा ।।
ठेवी नाम सीता, मुनि वदतां । आनंदऽली माता ।
सखि गाती गीता, निज सीता । जगदंबा करि स्मिता ।।

* * *

## शरणागती

श्री गुरूनाथा तव् शरणम् । सद्‌गुरुनाथा तव शरणम् ।
दीन दयाळा दीनानाथा भक्तवत्सला, तव शरणम् ।।
कौसल्यात्मज तव शरणम् । दशरथनंदन तव शरणम् ।
दीनदयाघन हे रघुनायक । हे सुख सिंधो तव शरणम् ।।
सीतानाथा तव शरणम् । मत्प्रियभ्राता तव शरणम् ।
भरतबंधो, लक्ष्मण भ्राता । शत्रुघ्नबंधो तव शरणम् ।।
हे रघुनाथा तव शरणम् । आशुतोष हे तव शरणम् ।
अधमोद्धारण, अघराशीहर । करुणानिधान तव शरणम् ।।
जगन्नाथ हे तव शरणम् । विश्वनाथ हे तव शरणम् ।
हे हनुमत् प्रभु पतित पावन । हे प्रिय भ्राता तव शरणम् ।।

## गुरू. श्रीगुर्वाष्टकम्

नमामि नित्यनिर्मलं । कृपालुशीलकोमलं ।
प्रणतजनवत्सलं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।१।।

अरुणचरणाम्बुजं । वराभयकराम्बुजम् ।
भक्तकल्पपादपं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।२।।

कर्वेकुलोद्धारकं । गंगानारायण सुतम् ।
मातृपितृसौख्यदं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।३।।

गंगादासप्रियशिष्यं । सद्गुरुसेवारतं ।
तुलसी – मानसरतं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।४।।

चतुर्थाश्रमे स्थितं । वासुदेव कृपांकितम् ।
काषायवस्त्रधारिणं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।५।।

मायाविमोहपारगं । रामचिन्तने रतं ।
सर्वभूतहिते रतं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।६।।

सत्यनिष्ठं दृढव्रतं । ब्रह्मनिष्ठं यतिवरम् ।
रामैक शरणं गतं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।७।।

अनेकग्रंथलेखकं । सुखेन देहत्यागिनं ।
परंडा – नगरभूषणं । नमामि पूज्य सद्गुरुम् ।।८।।

इदं श्रीगुर्वाष्टकम् । पठति ये जना मुदा ।
गुरुभक्तीश्वरकृपां । विन्देत् सुखेन सर्वदा ।।९।।

हरिः ॐ तत् सत्

* * *

## बुध. श्री. नंदनंदनाष्टकम्

नमामि देवकीसुतम् । अजशिवादिसेवितं ।
ब्रह्ममनुजरूपिणं । नमामि नन्दनन्दनम् ।।१।।

वृष्णिवंशभूषणं । वसुदेवप्रियं सुतं ।
हलधरप्रियानुजं । नमामि नन्दनन्दनम् ।।२।।

सुखद बाललीलया । मातृहर्षवर्धकं ।
व्रजगोकुलवासिनं । नमामि नन्दनन्दनम् ।।३।।

पूतनासुशोषकं । असुरमोक्षदायकं ।
गोपबालकप्रियं । नमामि नन्दनन्दनम् ।।४।।

पीतवस्त्रधारिणं । अतीव श्यामसुन्दरम् ।
मयूरपिच्छधारकं । नमामि नन्दनन्दनम् ।।५।।

कुशलवेणुवादकं । समस्तचित्तहारकं ।
गोपीजनवल्लभं । नमामि नन्दनन्दनम् ।।६।।

गोपीचीरहारकं । रासलीलानायकं ।
भक्तहृदयवासिनं । नमामि नन्दनन्दनम् ।।७।।

कुवलयापीडसूदनं । कंसचाणूरमर्दनं ।
पितृमुक्तिदायकं ।नमामि नन्दनन्दनम् ।।८।।

नन्दनन्दनाष्टकं । इदं हि भक्तिदायकं ।
प्रज्ञानानन्दशिष्यया । विरचितं तनोतु शम् ।।९।।

* * *

## शुक्र. रामवल्लभास्तुतिः

आदिशक्तिमिन्दिरां । शोभनां मनोहरां ।
जनककन्यकां रमां । नमामि रामवल्लभाम् ।।१।।

सुनयनाप्रियसुतां । सेवकभगिनीनुतां ।
उमादिभिः संस्तुतां । नमामि रामवल्लभाम् ।।२।।

गौरीपूजने रतां । प्राप्त पार्वतीवरां ।
करधृतजयमालां । नमामि रामवल्लभाम् ।।३।।

स्वश्रूसेवारतां । तथाच श्वशुरप्रियां ।
अतीव स्नेहपालितां । नमामि रामवल्लभाम् ।।४।।
पतिव्रता शिरोमणिं । पतिपदानुगामिनीं ।
स्त्रीहृदयहारिणीं । नमामि रामवल्लभाम् ।।५।।
स्वर्णकान्तिधारिणीं । स्मितानना सुभाषिणीं ।
चित्रकूटवासिनीं । नमामि रामवल्लभाम् ।।६।।
मृदुमंजुपदाम्बुजां । वराभयकराम्बुजां ।
अनसूयाप्रपूजितां । नमामि रामवल्लभाम् ।।७।।
पावके निवासिनीं । मायारूपधारिणीं ।
दशास्यचित्तमोहिनीं । नमामि रामवल्लभाम् ।।८।।
विश्वोद्भवकारिणीं । विश्वसंहारिणीं ।
हनूमते वरदायिनीं । नमामि रामवल्लभाम् ।।९।।
अग्निदिव्यकारिणीं । सुयशोविस्तारिणीं ।
पुष्पके विराजिनीं । नमामि रामवल्लभाम् ।।१०।।
रामवामासीनां । सिंहासनसंस्थितां ।
लोकवेदसंस्तुतां । नमामि रामवल्लभाम् ।।११।।
पंचक्लेशहारिणीं । सर्वश्रेयस्काकारिणीं ।
भक्तलोकतारिणीं । नमामि रामवल्लभाम् ।।१२।।
रामवल्लभास्तुतिः । गुरुकृपया विरचिता ।
रामभक्तिदायिका । भवतु पापनाशिका ।।१३ ।।
–हरिः ॐ तत् सत् –

* * *

## दृष्ट श्री सद्गुरू रायाची

दृष्ट तुझी काढते मी श्रीसद्गुरूराया ।।
हृदय सिंहासन भूषवा मम तुम्ही सदया ।।ध्रु।।

रजोगुणी वृत्ती या जणूं मोहऱ्या ।।
तमोगुणी वृत्तीच्या उतरू मिरच्या ।।
सत्वगुणी वृत्तीचे मीठ उतरू या ।।
ज्ञानाग्नीत अहंकार भस्म होऊ द्या ।।१।।
सर्वत्र एक तूचीं स्मरण राहू द्या ।।
सर्वांची सेवा स्वामी मजसी घडू द्या ।।
चरण कमली सदा तव मम मन जडू द्या ।।
अति स्नेहे कातर म्हणुनि दृष्ट काढू द्या ।।२।।

* * *

## दृष्ट श्रीरामाची

दृष्ट काढते मी मम राजाराम ।
सीतेसह सिंहासन भूषवा अभिराम ।।धृ।।
तुम्ही जरी त्रिभुवन लावण्य ललाम ।
नजर कुणाची लागो ना तुम्हां घनश्याम (भगवान)।
जरी सृष्ट दुष्ट रूपे तुम्हींच नटला राम ।
अखिल जगाचे तुम्ही प्रभु परमविश्राम ।।१।।
अतिस्नेहे मन पापशंकी जाणा सुखधाम ।
धृष्टता क्षमावी बंधो कृपासिंधु मेघश्याम ।
बंधुसह परांडे ग्रामीं विराजता राजाराम ।
अशी शोभा अन्य कुठे नाढळे सीताराम ।
म्हणून दृष्ट वारंवार काढू जानकी राम ।।२।।

* * *

# आरत्या

## श्रीगुरुरायाची आरती

आरती श्री गुरूरायाची । श्री प्रज्ञानानंदाची ।।धृ.।।
जेथें सहज होइ वास । तेथें दीनोद्धार खास ।
कितीहि पातकाची रास । करीना विन्मुखहि त्यास ।
निष्कपट होऊनिया । भरवसा दुजा सोडुनियां । (चाल)
येइ जो शरण । धरी जो चरण । नित्य करी स्मरण । (चाल)
तया दे छाया कृपेची । आरती श्रीगुरुरायाची ।।१।।

ज्यावरि कृपा राघवाची । तयासीच भेटी हो तुमची ।
लेकरे सर्वहि भाग्याची । तया द्या सेवा पायाची ।
सर्वदा चुकत असोनियां । करितसा तुम्ही किती माया । (चाल)
शक्य उतराई । नसे प्रज्ञाई । नमी जो पायीं । (चाल)
तयासी लूट आनंदाची । आरती श्रीगुरुरायाची ।।२।।

परांडे ग्राम धन्य खास । श्रींचा जेथें नित्य वास ।
पाहुनि समाधिस्थानास । अश्रु येती लोचनास ।
पुण्यतिथी पर्वणीला । भाविक येती दर्शनाला । (चाल)
निरसुनि पाप । शमवुनि ताप । शांतिचे माप । (चाल)
घालितो पदरी जो त्याची ।।३।। आरती श्रीगुरुरायाची ।।

* * *

# आरत्या प्रज्ञानानंदाच्या

(१)

जय जय गुरु प्रज्ञाना शुद्ध निर्मळा
गुरूपौर्णिमे निमित्ते नमित मी तुला ।।धृ।।
राम विश्रामधाम नाम ठेविले ।
वास्तुस तुम्ही सुविचारें सहज निवडिले ।
म्हणून तेथे राजाराम येऊन राहिले ।
शब्दशक्ति तव अचिंत्य उमजले मला ।।१।।
मानस टीका मराठी हिंदी प्रथम लिहिली ।
हिंदी अनुवाद करूनी शीग गाठली ।
दोंहोची प्रति मुद्रण करुनि ठेविली ।
प्रथम प्रकाशन हिंदी वाणी बोलली ।
सत्य सत्य वाचा तव झाली प्रेमळा । प्रांजळा ।।२।।

पू. कमाताई – (डॉ. कमल वैद्य)

* * *

(५)

जय जय गुरू प्रज्ञाना शुद्ध निर्मळा ।
गुरूपौर्णिमा निमित्त नमिंत मी तुला ।।धृ।।
रामचरितमानस तव बहिश्चर प्राण ।
अध्यात्मिक रत्नांची अनुपम खाण ।
पारायण सतत घडो, विनति ही जाण ।
आशीस अमोघ तुझा लाभो आम्हाला ।।१।।
विषय विरति प्रभुपदरति द्यावी आंम्हाला ।
गुरुभक्ती नाम प्रेम लाभो आम्हांला ।
परस्परीं निर्हेतुक प्रेम द्या मला ।
ईर्षा, द्वेष, मत्सर, कधी छळो न आम्हांला ।।२।।

आदर्श वस्तुपाठ गुरो जीवन तूझे ।
सत्यभाषण दृढ निश्चय दिसून येतसे ।
सर्वांभूती भगवद्भाव अंतरी वसे ।
सर्व तुझे सद्गुण हे द्यावे आम्हांला ।
पंचप्राण ओवाळूं जवळ घ्या मला ।।३।।

पू. कमाताई, ७-७-२००९

* * *

## आरती (चाल - मनमोहना श्रीरंगा हरि)

ओवाळू आरती या चला, श्रीसद्गुरुराया ।।ध्रु.।।
भवडोही बुडतां, कासाविस होता
संसारी या श्रमतां, जो करि एक दया, श्रीसद्गुरु राया ।।१।।
दुस्तर ही माया, जाई ना विलया ।
विविधा ही, दावि भया, तारी रे सदया ... ।।२।।
न करु कधी सेवा, अपराधी, देवा,
क्षमा करी, गुरुरावा; अपार तुझी माया ।। ३।।
जरि लोटिसि रागे, येऊं अम्हिं मागे ।
कनवाळू, माय तु गे, प्रार्थूं तव पाया ।। ४।।
प्रभु पदि दृढ भक्ति, हीच देइ मुक्ति ।
नामी सदा आसक्ती, तव पदि दृढ माया ।। ५।।

* * *

## गुरुपौर्णिमा

जय जय गुरु प्रज्ञाना शुद्ध निर्मळा ।
कृपामेघ होउनि तूं सतत वर्षसी । अद्वैतामृतपाना मजसि करविसी
मानस पर्यंकि तूंच झुलविसी मला ।।१।।

नित्य नवी खेळणि मज तूंच पुरविसी । लाडाने प्रेमाने फार पाळसी
मम हृदयी बसुनि तूंच स्तविसि बा तुला ।।२।।
रामाविण विश्विं दुजी वस्तु ना असे । सुष्ट दुष्ट रूपे तो एक नटतसे
जाणुनि करि प्रेमा दृढ । शिकविसी मला ।।३।।

* * *

## गुरुपौर्णिमा

जय जय गुरु प्रज्ञाना, शुद्ध निर्मळा ।
गुरु पौर्णिमे निमित्त नमित मी तुला ।।ध्रु।।
अज्ञ आणि अवगुणि मी शरण तुज आले ।
स्वाभाविक कारुण्ये अभय तूं दिले ।
रामभक्ति द्यावी मला विनविले तुला ।।१।।
सत्यवचनि करुणाकर असरि प्रेमळा ।
त्यास्तव आशीश तुझाअमोघ आगळा ।
शब्दशक्तिची प्रचिती आलिसे मला ।।२।।
अति दुर्लभ प्रेमभक्ति सहज लाभली ।
मुद आणि मंगल तुमची कृपा वर्षली ।
उतराई शक्य न गुरुराज दयाळा ।।३ ।।

* * *

जय जय गुरु प्रज्ञाना, शुद्ध निर्मळा,
गुरुपौर्णिमेनिमित्त नमीत मी तुला ।।ध्रु.।।
आषाढी पौर्णिमा ही मजसी सुखविते,
स्मरण व्यासपूजेचे हृदयी जागते,
अष्टसात्विक भाव तुझे स्मरती ते तसे,
गुरुभक्ती कशी असावी दाविती मज ते,
प्रज्ञा–वासुदेवा मी आळविते तुला ।।१।।

काव्यमय चरित तुझे तूंच करविशी,
लाडक्या लेकीचा लळा पुरविशी,
त्यानिमित्त प्रेरुनि मज तूंच लिहविसी,
तुझेच अर्पुनि तुजला, आनंद हो मला ।।२।।

कृपा सतत वर्षो तव लेकरांवरी,
वैराग्य, ज्ञान भक्ती द्यावी त्या खरी,
मत्सर, द्वेष, ईर्षा ही सारावी दूरी,
तव पदपद्मीं प्रेमभक्ति लाभो आम्हांला ।।३।।

* * *

## ।। श्री सद्‌गुरु प्रसन्न ।। ।। राम ।।

जय जय गुरू प्रज्ञाना, शुद्ध निर्मळा
प्रेमभरें आरती तुज गाऊं दयाळा ।। ध्रु ।।

दाशरथीस बंधू कर, शिकविले मला
जरि अपात्र वच मानुनी अनुसरे तुला ।
कारण विण स्नेह करूनी रक्षिसी मला ।।१।।

रघुवर मम बंधु असे घोकते सदा ।
प्रेमाने गुण गाते अळविते मुदा ।
नाते हे दृढ धरूनी स्मरत मी पदा ।।२।।

अवगुण आणि अपराधा गणित ना असे
प्रभुमाया बलवत्तर नाचवीतसे ।
आयु सरे धीर नुरे धाव प्रेमळा ।। ३।।

दे दर्शन शांतावी मज माय - माउली
तापाने तप्त मला द्यावी साउली
रामनामीं प्रेम देई विनविते तुला ।।४।।

* * *

(२)

जय जय गुरु प्रज्ञाना शुद्ध निर्मळा ।
गुरुपौर्णिमेनिमित्त नमित मी तुला ।।ध्रु।।

ग्रीष्मी जशी धरणी ही तप्त होतसे ।
आषाढी शीत जले शांत होतसे
तशी निववी पौर्णिमा ही मूळ मंगला ।।१।।

सालभरी संसारी कष्टता आम्हीं
त्रयतापें त्रासविता निववीलें तुम्हीं
उतराई शक्य नसे नमितसो तुला ।।२।।

आईची सेवा कशी बालका घडे ।
मलमूत्रीं लोळुनियां ठायीं जें रडें ।
क्षाळुंनि त्यां घेई कडे शुद्ध प्रेमळा ।।३।।

आळशावरि गंगा ही धांव घेतसे ।
सामर्थ्ये निज त्यासी उद्धरीतसे ।
पादोदकें तेविं सर्व पावूं मुक्तिला ।।४।।

शारदीय पौर्णिमाच आज गमतसे ।
सद्‌गुरू मुखचंद्र विमल पूर्ण हा दिसे ।
शिष्य हृदिं मोदसिंधू येई भरतीला ।।५।।

गुरूबंधु भगिनी ही आज भेटलो ।
करूनि कृपामृत पाना तृप्त जाहलो ।
प्रतिवर्षी पर्वणी ही लाभू दे मला ।।६।।

* * *

(३)

जय जय गुरू प्रज्ञाना शुद्ध निर्मळा
जननीहुनी अधिक आम्ही मानितो तुला ।।ध्रु ।।

मी गजेंद्र नक्र मला मृत्यु ग्रासतो ।
निकट मृत्यु बघुनि त्यजति इष्ट मित्र तो ।
बनुनि विष्णु चक्रधारी धाव प्रेमळा ।।१।।

प्रल्हाद मी नरहरि तुज नित्य स्मरतसे ।
मारुनि तव शत्रुस सोडवी मज सोडवी तसे ।
व्यापकत्व सिद्ध करी भक्तवत्सला ।।२।।

बंधु आणि भगिनी आम्ही लेकरे तुझी ।
जणूं वाटे सान – थोर एका मातेची ।
अवगुणी गुणी सम गणुनि रक्षी कृपाळा ।।३।।

व्यास पौर्णिमेस मुदे तुजसी प्रार्थितो ।
अपराध क्षमी ऐसे तुजसी विनवितो ।
तुजविण कोणा विनवूं दीनदयाळा ।।४।।

* * *

## आरती रामाची

जय देवा जय देवा जय सीता रामा ।
भरत शत्रुघ्न बंधु लक्ष्मणा ।। जय देवा ।।धृ।।

जय कौसल्यात्मज दशरथ नंदना ।
जय भरताग्रज जानकी जीवना ।।१।।

जय हनुमात्प्रभु सत्चित सुख धामा
ओवाळू आरती तुज राजा रामा ।।

विश्व व्यापका प्रभु तुम्ही अंतर्यामी ।
येउनि राहिला परांडे ग्रामी ।।

उद्धरा सर्वा तुम्ही प्रज्ञा स्वामी ।।
विनविते कमला न्यावे निजधामी ।।

* * *

## आरती रामाची

(चाल – मनमोहन वाजवुनी सारगी)

सखि आरति करू घनश्यामाची, श्री जानकीरामाची ।।ध्रु.।।

विश्वंभर जो सृष्टिकर्ता ।
दीन अनाथासी उद्धर्ता ।
गाती यश सुरवर अद्‌भुत ज्याचे, त्या श्रीरामाची ।।१।।

निज पित्याचा प्राण गे हा ।
कौसल्येसी पुत्र प्रिय हा ।
सुखि राहति पुरजन लीला बघुनी, बाल रामाची ।।२।।

प्रिय शिष्य हा कौशिकाचा
'पण' जिंकी तो धनुभंगाचा ।
त्या योगे सीता झाली भार्या रघुवीराची ।।३।।

माय पित्याचे वचना मानी ।
बसतो चौदा वर्षे वनी ।
भरता मनि वसते अद्‌भुत प्रीती त्या प्रिय भ्रात्याची ।।४ ।।

वनी देतसे भक्तां भेटी ।
भक्त वत्सल जगजेठी ।
भक्तांस्तव कष्टे, विविध रीति त्या सानुज रामाची ।।५।।

सीता विरहें दुःखी राम ।
वृक्षां आलिंगी अभिराम ।
नर नाट्या करूनी, भक्तां कवळी, प्रेमे हृदि त्याची ।।६।।

देई मुक्ती गृध्र शबरिसी ।
मैत्री करितो सुग्रीवासी ।
सुखि केला सखये, दास मारुती, ब्रीदपालकाची ।।७ ।।

नामधारें शिळा तारी ।
बळी दशास्या लीले मारी ।
स्थापियला लंके, सखा बिभीषण, सीतारमणाची ।।८ ।।

सह पत्नी बंधू सुखराशी ।
आले फिरुनी अयोध्येसी ।
ज्या प्रेमे सत्वर गुरु अभिषेकिति, त्या सुखधामाची ।। ९ ।।

* * *

ओवाळू आरती, रघुकुल नाथा
चरणी तुझ्या प्रेमे, ठेविते मी माथा ।।
चरण कमल तुझे, अति सुकुमार
कैसे बा स्पर्शावे राकट या हाता ।।
किती विनवूं तुज अनाथांच्या नाथा
वरद हस्त तुझा ठेवि माझ्या माथा ।।
राखी मी बांधते, श्यामसुंदर हाता
कमा विनविते, क्षमावी धृष्टता ।।
(कमा म्हणे भाऊ, क्षमावी धृष्टता)
अंतकाळ यावा, नाम तुझे गाता
धावोनी बा येई नेई सवे मजसि आता ।।

* * *

## आरती हनुमंताची

ओवाळूं आरती अंजनीतनया । रामकथेच्या रसिक श्रोतया ।।ध्रु ।।
सीता शोधुनि राम ऋणी केला । चिरंजीव पद लाभले तुजला ।
असुर मारिले कालनेमी अखया ।।१।।
जेथे रामकथा तेथे हनुमंत । साक्ष देती हो सर्व साधुसंत ।
प्रचीती द्यावी विनवूं या पाया ।।२।।

* * *

## आरती राघवेंद्र स्वामींची

जय जय जय जय आरती करू या राघवेंद्र स्वामी ।
मंत्रालयी जो वास करी त्या प्रेमे नमू आम्ही ।।धृ.।।
बलभीमाचा अवतारचि जो रामभक्त नामी ।
भक्तिमार्ग शिकवून जनांना नेतो निजधामीं ।।१।।
शंखोदकाची महती दाविली पतित उद्धरूनी ।
शंका घेता मलिन वस्त्रा दावी उजळोनी ।।२।।
हरि ॐ तत् सत्

* * *

## श्रीकृष्णाची आरती

आरती ओवाळूं श्रीकृष्णनाथा । देव सिद्ध मुनी गाती यशोगाथा ।।धृ.।।
देवकी तनया, वसुदेव सुता । प्रार्थिती देव गर्भसंभूता ।
प्राकट्य कारागृहामाजी होतां । कंसभयाने व्याकुळली माता ।।१।।
वसुदेवें गमन केले गोकुळी । तुज ठेवियेलें यशोदे जवळी ।
कोणी न मर्मा जाणे तत्वतां । गोकुळीं आनंद न ये वर्णिता ।।२।।
करी बाळलीला सुखवी मातेसी । मारोनि गति दिली असुरांसी ।
कंस वधिला पाहतां पाहतां । मायपित्यांची केली मुक्तता ।।३।।

* * *

## जबलपूरच्या दत्तप्रतिष्ठापनेच्या वेळची आरती

आरती दत्तराजा । कृपाळू वो महाराजा ।।धृ।।
मायबाप कृपावंत प्रगटला भगवंत ।
सेविताती सदा संत । कृपा करा हो अनंत ।।१।।
जबल – पुरी माझी आस ।आज दिले दर्शनास ।।२।।

कामधेनू मागे शोभे । पुढे दत्तराज उभे ।
सेवे खास कृपा लाभे । श्वान वेद पायिंउभे ।।३।।
तीन शिरे सहा हात । गौर कोमलही गात ।
रक्षावया दिन रात । खडे उभे राहा तात ।।४।।
परम हो शोभिवंत । परब्रह्म मूर्तिमंत ।
प्रज्ञास्वामी थोर संत । प्रेमे वश हो अनंत ।।५।।
स्मितहास्य करूनिया । प्रसाद ही देवोनीया ।
भाग्यवंत केले राया । दीनांवरि किति माया ।।६।।
कमा नमितसे पायां

* * *

## श्री शंकराची आरती

सखि आरती करूं श्री गौरी हराची, त्या शिवशंकराची ।।धृ.।।
काशीमध्ये विश्वनाथ, अवंतिकेमध्ये महाकाल ।।
केदार हिमगिरी, नेपाळी त्या पशुपतिनाथाची ।।१।।
सौराष्ट्रीं जो सोमनाथ, शैल्यीं शोभे मल्लिकार्जुन ।।
ओंकार वैजनाथ, भीमाशंकर नी त्र्यंबकेश्वराची ।।२।।
नागनाथ नी घृष्णेश्वर, बारा ज्योतिर्लिंगे ख्यात ।।
पूजितां त्यांसी भक्ती लाभते । श्री रघुवीराची ।।३।।
नीठकंठ जो गंगाधर, अंगी खेळति विषधर ।।
रामेश्वर नामें परांडा ग्रामीं, अवतरला त्याची ।।४।।

* * *

## आरती (मंगळागौरीची)

आरती मंगल गौरीची । सख्यांनो प्रेमे करूं साची ।।धृ।।
काशी पुरी नित्य वास । भक्तांसाठी घेइ त्रास ।।
पूजिता दे सौभाग्यास । सख्यांनो पूजु प्रेमलेस ।।

चाल – आमंत्रण देउनिया । जमविल्या सुवासिनी अवघ्या
चाल – मांडु चौरंग, मैत्रिणीसंग, होउया दंग
तयारी करू पूजनाची ।।१।। आरती मंगल गौरीची

केळिचे खुंट आणुनिया । बाजूसी चारी बांधू या
षोडस पत्री आणू या । सुगंधी पुष्पे जमवू या ।।
गुरूजना प्रेमे वंदू या । कौतुके आशिष पावूं या ।
पूजु या आज । प्रथम गणराज। करी जो काज
पळापळ होइल विघ्नांची ।।२।। आरती मंगलगौरीची

परिमल द्रव्यें पूजू यां । मानससुमने वाहू या
बहुविध पक्वान्ने करूं या । कहाणी प्रेमें सांगू या
प्रेमे धूपदीप दाऊं । आरती आनंदे गाऊ ।
आदिमायेसि ।। पुजू गौरीसि । नमूं या तिजसी
मागणी करू पतिसेवेची ।।३।। आरती मंगलगौरीची

हळदी – कुंकू वाहू या, सख्यांनो जागरणा करूं या
किर्ती मंगल गाऊ या प्रेमें तिजसी अळवूं या
चाल– माते अज्ञ बालिका मी, मजवरि कृपा करी नामी
प्रार्थुया तिसी, मनोभावेसि, क्षमा बालेसि
विनंती मानिल प्रेमाची ।।४।। आरती मंगलगौरीची

* * *

**शेजारती सद्‌गुरूची** (रात्रीं ९ वा. २५ मि.)

आतां प्रज्ञानानंदा निद्रा करा गुरूराया । निद्रा करा गुरुराया ।
कृपा करावी दीनावरती कष्टविले वाया ।।धृ।।
अरूप असुनि स्वरूप झाला लोकोद्धारासी । झाला लोकोद्धारासी ।
स्वरूपि निद्रा सुखें करावी आतां हृदयवासी ।।१।।

हृदय–मंदिरीं शांति–पलंगी सुमन –शेजेसी । पहुडा सुमन –शेजेसी ।
मैत्री, क्षमा, दया दासी सेविति चरणासी ।।२।।
करुणावरुणालया नेउनि भेदाते विलया । नेउनि भेदाते विलया ।
प्रेमभक्तिच्या नवविध जळती तेजस्वी समया ।।३।।
प्रज्ञानानंद स्वामी बसले मानस–मंचकीं । माझ्या हृदय–मंचकीं ।
प्रज्ञा शिष्या, अतां विनवितों विडा घ्यावा की ।।४।।

* * *

## शेजारती श्रीरामाची

रामराया शेजे जाती, त्यासी ओवाळूं आरती ।
सवे शोभे सीतासती, रति मदन लाजती ।। धृ.।।
शेजघर रम्य फार, शोभा तेथील अपार ।
हेवा वाटे इंद्रा फार, ऐसे नाना उपचार ।।१।।
हेममंच रत्नजडित, गाद्या गिर्द्या क्षीरफेनांकित, (लुसलुशीत)
चादरी ही मन मोहीत, भासे मृदु नवनीत ।।२।।
रत्नदीप ठायी ठायी, मृदु पायघड्या पायी,
वदली ना शोभा जायी, सिद्धी सेविताती पायी ।।३।।
सुवर्णाच्या परडीत, पुष्पहार सुगंधित,
फुलें फळें रसरशीत, वायू मंद सुगंधित ।।४।।
दरवळे गोड धूप, नाना, सुगंध अमूप,
दर्पणी ही रामरूप, दिसे सीते अनुरूप ।।५।।
दासदासी प्रेमे नमिती, आज्ञा आदरे मागती,
श्रम झाले सीतापती, आता पहुडा एकांती ।।६।।
सीता करी पद सेवा, निजा सुखे राम देवा,
कमा मागे नाम सेवा, द्या हो तिला देव देवा ।।७।।

* * *

# सामुदायिक गीत

॥ श्रीराम ॥

चला भगिनीनो, साऱ्या मिळुनी ॥
गाणगापुरी जाऊ या ग, ॥ गाणगापुरी जाऊ या ॥ध्रु॥
श्रीगुरुराया पाहू या ग, प्रेमे पायां वंदू या ॥ १॥
संगमावरी न्हाऊं या ग, झारी भरुनी आणू या ॥२॥
ग झारी भरुनी आणू या ॥
पंचामृत त्या अर्पूं या ग, सुंदर पूजा बांधवू या ॥३॥
पांची पक्वान्ने करूं या ग, माधुकरीला घालूं या ॥४॥
यतिराजाला निरखूंया ग, भावसमाधी रंगू या ॥५॥
विविध आरत्या गाऊं या ग, श्रीपादराया आळवुं या ॥६॥
पालखीपुढे लोळूं या ग, अंकी देवा घेऊं या ॥७॥
सुफळ जीवना लेखूं या ग, नित आनंदी रंगू या ॥ ८॥
दत्त नामिं रत राहू या ग, दत्तनामिं रत राहू या गं ॥९ ॥

* * *

## स्फुट कविता

कोमळ कृपाळु तूं भगवंता । का दीनेच्या पाहसि अंता ॥
कैशी तुला स्तवूं मी अनंता । मंदबुद्धि नि फार अहंता ॥

* * *

## ओव्या

चल जाऊं मना अयोध्यानगरी
जेथे राम हरी वसतसे ।।
विषय चिंतनी हिंडहिंडुनिया
शिणलासी वाया आजवरी ।।
घ्यावया विसावा तेथे थांब जरा
जानकीच्या वरा पहा तरी ।।
सौंदर्याचे वेड जरी तुज मना ।।
जानकीरमणा देख जरा ।।

* * *

कुणां हाक मारू तुजविण आतां
अनाथांच्या नाथा सांग बरे?
जरी मी मलीन असे हीन दीन
हाक तुम्हां वीण कोणां घालूं?
मज सम पापी जगीं नाही कोणी
तुजसम कोणी कृपाळू हो?
सुखामधे तुझी नये आठवण, दुःखात कवण स्मरूं दुजा?

* * *

## विनंती सद्‌गुरु

ये गुरुराया धावोनी -धावोनी
मनोभावना जाणोनी, येई झणी ।।
माय माउली येवोनी, येवोनी ।
कृपासाउली देवोनी, देवोनी ।
कृपामृतासी पाजोनी पाजोनी ।
कृपाकटाक्षा टाकोनी वो जननी ।

जाइ लेकरां शांतवुनी शांतवुनी ।
सुहास्यवदना येवोनी, येवोनी ।
कृपामृतासी वर्षोनी, वर्षोनी ।
जातां आम्ही हर्षोनी, हर्षोनी ।
वंदू प्रेमे मनोमनी, मनोमनी ।

* * *

## अभंग

रामा रघुवीरा दयेच्या सागरा ।
कृपेच्या आगरादीनबंधो ।।१।।
पतित पावनम्हणताती तुज ।
दयादृष्टी मजपहा तरी ।।२ ।।
अनाथांचा नाथ माझा रघुनाथ ।
संकटात हात (साथ), देत असे ।।३।।
अहिल्योद्धारणा, कां रे पावसी ना?
आम्हां पतितांना उपेक्षिसी? ।।४।।
केली नाही सेवा तुझी देवदेवा ।
म्हणुनिया बालका विसरशी ना?
करु परनिंदा, आवडता धंदा
तुझ्या नामछंदा, धरुं ना की ।। ५।।

* * *

## विनंती राम

ऐकावी विनंती माझी सीतापती
आले काकुळती म्हणोनिया ।।१।।
उदारांचा राजा म्हणताती तुज
अव्हेरिता मज दोष लागे ।।२।।

ब्रीदासाठी तरी पतित पावना
विनंती ही माना माझी देवा ।।३।।
अपराध माझे अगणित साचे
किती वदू वाचे ठावे तुम्हां।।४।।
जरी अपराधी महा पापराशी
आले पायांपाशी कमा म्हणे ।।५।।
कीर्ती ऐकोनिया मन वेडावले
वेगे झेपावले पायीं तुझे ।।६।।
सौभाग्य अखंड असो देव देवा
घडो पतिसेवा निरंतर ।।७।।
माझे प्राणनाथा/मज पासोनिया लाभो सर्व सुख
दु:खें कष्टी मुख न दावावे ।।८।।
स्मरण असावे तुझे दीनानाथा
तू आम्हां अनाथा एक त्राता ।।९।।
गुरु माउलीचे असो कृपाछत्र
न जावो अन्यत्र चित्त माझे।।१०।।
गृही अधिष्ठान आपुले असावे
अंतरी वसावे दीनबंधो ।।११।।
अयोध्यापती हो अहो रघुनाथा
शंका माझी आता ऐका ऐका ।।
भव्य दरबार किर्ति झाली फार
मजलाचि दार कां लाविले?
याचक हावरा अव्हेरी कीं दाता?
दात्यांचा ही दाता तूंचि देवा ।।
जरी ऐकसीना जरी पाहसी ना
तरी मज दीना पाहे कोण?

* * *

## (श्लोक) (उपजाति)

श्री जानकी राम म्हणूं मुखाने, सहजी तरूं या भव हा सुखाने ।
लाधे मना सौख्य अपूर्व साचे, श्रीजानकी राम वदतां हि वाचे ।।

* * *

## ।। श्रीराम ।।

हे प्रज्ञाना, आर्तिनाशना, भक्तिवितरणा धांव गडे ।
मी प्रेमाकुल झाले व्याकुळ तुझिया चरणी चित्त जडे ।
ठेव शिरी कर कृपा छाय कर सद्गुरू माउलि पुरवि हटा ।
गेले कितिदिन तवदर्शनावीण चरणरज:कण दावि अता ।।
(पृथ्वी) गुरो पतित पावना पदरजा नमी मी तुझ्या
दयाळु तुजसारखा मजसि नाढळे कीं दुजा ।
तुझ्या चरणचिंतनी सतत सौख्य ही लाभते
तुलाच हृदिं प्रार्थितां सहज भक्ति ही साधते ।

* * *

## आस – मला वाटते.....

मला वाटते चातक व्हावे
आर्त स्वराने तुज आळवावे ।।
हे घनश्यामा मत्प्रिय रामा
स्वर ना ते कधिं खंडित व्हावे ।।१।।
तुला पहावे तुला स्मरावे
भरभरुनी आणि प्रेम करावे ।
तवदर्शन जलबिंदूसाठी
सांग सख्या मी काय करावे? ।।२।।

* * *

**।।श्री सद्‌गुरु प्रसन्न ।।**

आठव येतो घडि घडि पाही
तुजविण करमत नाही – रामा ।।ध्रु ।।

अरुणोदयिंचा नभीं लालिमा
चरणतल तुझे आठवती रामा –
पक्षी सुमधुर किलबिलतांना
किलकारी तुझी आठवते मना
तुजविण करमत नाही – रामा ।।१।।

कोमल सुगंधि फुले खुडतांना
तनुगंध तुझा आठवे मना
कोमलता रे अनुपम रामा
तव स्पर्शाची मिळो अभिरामा ।।२।।

ऐसे मनोरथ करिते मी पाही
तुजविण करमत नाही – रामा ।।३।।

चातकशब्द व्याकुळवी रामा
तूं घननीळ सुपूर्ण कामा
कधी भेटशील मज अभिरामा
चिंतन चित्त करितसे पाही
तुजविण करमत नाही – रामा ।।४।।

याचक तुझे ऐकती ना 'नाही'
वेद पुराणे देतात ग्वाही –
दारीं उभी मी, दिसले की नाही
हे सूर्य चक्षू, त्राहि त्राहि त्राहि
तुजविण करमत नाही, रामा ।।५।।

* * *

## अभंग

रामचंद्र माझ्या जीवींचा जिव्हाळा
लावण्यपुतळा, रघुराज ।।१।।
रूपे ते साजिरें सावळे सुंदर
पाहू पोट भर भाऊराया ।।२।।
कशी तुझी दृष्टी प्रेमाचीच वृष्टी
वेडी होय सृष्टी क्षणमात्रें ।।३।।
नको उभा राहू बैस घडीभर
अति सुकुमार चरण तुझे ।।४।।
वाटे मनीं माझे चरण तुझे चुरूं
परी मी पामरू असमर्थ ।।५।।
भक्तांसाठी रामा कष्टसी अपार
दाता तूं उदार रघुनाथ ।।६।।
आठवितां गुण मन गलबले
नेत्र प्रेमजले पाझरती ।।७।।
लावूं गालबोट दृष्ट नच व्हावी
तनुही वहावी चरणांवरी ।।८।।
हसूं नको भाऊ वेड्या बहिणीला
ठेवी सदा तिला पायांपाशी ।।९।।

* * *

## अभंग

१. नको रामराया दुजे काही मज
स्मरावे मी तुज, प्रेमभावे ।।१।।
मानसाची सेवा घडो निरंतर
गुरुकृपे अंतर शुद्ध व्हावे ।।२।।

सदा आत बाहेरी तुलाच पहावे
तुलाच सेवावे निर्हेतुक ।।३।।
गूढार्थचंद्रिका, सांगावी ती लोकां
तेणे भय शोका, निवारावे ।।४।।
सद्गुरुंची आज्ञा आज झाली मज
तुजवीण गुज कोणां सांगू ।।४।।

* * *

२. नाही इथे दुसरे कोणी ।।ध्रु।।
रामच भरला तन मन वचनीं
रामचि नांदे जनीं वनीं ।।१।।
मित्रहि रामाच शत्रुहि राम
सर्वत्रचि तो प्रभु घनश्याम ।।
चिंतित जावे एकचि नाम
जय श्रीराम जय रघुराम
तेणे सार्थक होइल वाणी ।।२।।
गुरुकृपे हे ज्ञान जाहले
सतत पाहिजे मनन केले
ज्ञानसार हे हदयीं धरले
भक्तिसुधेने अंतर भरले,
बंधु माझा प्रभु धनुष्पाणी ।।३।।

* * *

३. संध्या छाया दाटू लागल्या, दिसतो परतीर
गुरुकृपेने मला लाभला, सखा रघुवीर ।।१।।
नरदेहाचे सार्थक झाले गुरुकृपे साच
मूढ मना तूं नित श्रद्धेने रामायण वाच ।।२।।

रामनाम मणि दीप ठेव तूं सदा जिभेवर
आळव प्रेमें नित नेमाने, प्रभू कृपाकर ।।३।।
साकेतीं तुज नेण्या येती धावुन रघुवीर
शंका कधी न करी मना तूं सदा धरी धीर ।।४।।

* * *

४. पहिली माझी ओवी नमन सद्गुरु
आनंदा आवारु गुरुराज ।।१।।
दुसरी माझी ओवी रघुराज स्वामी
भगिनी नमिते मी पदरजा ।।२।।
तिसरी माझी ओवी स्वामी तेजोमयानंदा
वर्षती परमानंदा मजवरी ।।३।।
तुम्ही सर्व एकरूप जाणोनि स्वस्वरूप
आनंद अमूप होत असे ।।४।।
न फिटे तुमचे ऋण केवळ गाइन गुण
गोड ते घ्या मानून विनविते ।।५।।

* * *

१. हे राघवा तुझी मी, गाईन गोड गाणी
होईन लुब्ध नामीं । कंजूष जेवि दामी
मज बुद्धि द्यावि नामी । जेणे स्फुरेल वाणी ।।१।।

* * *

## अभंग

१. केकी कंठ नील, गंगेसा विमल
सर्वांगी कोमल राम माझा ।
राजीव लोचन सुहास्य वदन
सौख्याचे सदन राम माझा ।।

करी शरचाप जाळितसे पाप ।
निवारितो ताप राम माझा ।
देइ संतसंग भक्ति ही अभंग
करी नामीं दंग राम माझा ।।

२. कैसे गुण गाऊं माझ्या राघवाचे, नावरती वाचे शेषादिका ।।
कृपा हेतुवीण, रामा नये शीण । माते कैसे ऋण, लेकुरांचे ।।
पतितपावन, अनाथपालन, प्रेमभक्तिदान, देई स्वयें ।।
दासांमोठेपण, रामा हे भूषण सहजचि जाण, प्रेमरीतीं ।।
बाळगुणगण, करिता श्रवण, ठेंगणे गगन, माते जेवीं ।।
तारिले सज्जन, पद पद्मी लीन, जळावीण मीन नवल नोहे ।।
परी कनवाळू रामावीण कोण, तारिले पाषाण कृपाबळें ।।
सदा हो सर्वत्र चराचरी व्याप्त, रामासम आप्त नाही दुजा ।।

* * *

।। श्रीसद्गुरू प्रसन्न ।।
।।श्रीराम समर्थ ।।

## श्रीरघुवीर विवाह

(चाल – राहे उगा तूं । रडूं नको आतां । येई खेळाया । श्रीकृष्णनाथा )
कौसल्यामाते । ऐक बोलातें । सावध चित्तें । विनवितें तूते ।।ध्रु ।।
पड घडीभर । चुरते मी पाय । गेले विसाव्या । प्रमुदित राय ।।
भावजया चारी । कोमल कुमरी । विसावल्या कुशी । श्रमीत भारी ।।
बहुदिन झाले । घडली न सेवा । गमन मिथिले । केले जेधवां ।।१।।
पित्यासवें आम्ही । भरतानुगामी । मुखीं गात गीता । मन राजारामीं
पुजिलें पित्यानें । गौरी गणराजां । शंभु प्रसादें । हर्ष समाजां ।।
नमिंले कुलगुरू । माय अरून्धती । ज्यांचिया कृपें । कामना तृप्ती ।।२।।

जाहले शकुन । वऱ्हाड निघतां । वाद्यांचा गजर । न ये वर्णतां ।।
तोरण पताकीं । अवध सुशोभित । राम रघुवीर । जयकार श्रवत ।।
विवाह वार्ता । श्री रघुवीर । श्रवणिं प्रमुदित । लहान थोर ।।३।।
चला सवेगे । राम वरातीं । बंधु सख्यांचा । कोलाहल अति ।।
पथिं जात असतां । जनकरायें । सर्व व्यवस्था । केली ठायें ठायें ।।
मिथिले समीप । वऱ्हाड जातां । सचिव शतानंद । सामोरें तातां ।।४।।
आदर सत्कार । भेट उपहार । वर्णिता शेषां । शारदे हार ।।
जानोशा ठायीं । सर्वां सुखसोयी । नाहीं सुरपुरी । अशी भोगमयी ।।
मनीं आतुरता । क्षणोक्षणीं वाढे । भेटण्या भ्रात्या ।पूलक गाढे ।।५।।
कौशिक मुनी । सह दोन्ही भ्राते । दिसतां लोचनीं । शिथिल गात्रें ।।
मुनीसी वंदुनि । भेटूं जव भ्रात्या । आनंद वोसंडे । आम्हांसह पित्यां ।।
चारु छबि देखून ।स्मरूनि प्रतापा । जन विसरले । विरहाग्नितापा ।।६।।
त्रिभुवनपती । स्मरूनी नात्यातें । आनंदे भेटती । कृपाळू माते ।।
काय सांगू बाई । दशा समयीची । आजही स्मरतां । आनंद वीची ।।
त्या स्नेहा ममतेची । उतराई कैसी । होवूं ना कळे । मूढ जीवासी ।।७।।
उतरली पंचारती । पंच प्राणांची । वसनें ओवाळली । विविध देहांची ।
तृण गर्वांकुर । तोडुनि कौतुकें । मीपण लिंबलोण । उतरिलें माते ।।
नित नव मंगल । मिथिला नगरीं । मोदे चौबंधु । विहरति नगरीं ।।८।।
सुदिन सुअवसरिं । पित्राज्ञें घेऊन । जनकनंदिनीसी । आले मी पाहुनी ।।
निरखुन ही शोभा । जाणुनि सुशील । रामानुरूप । नयन सलील ।।९।।
दिन जात कैसे । मोदे ना कळे । वेडे मन मात्र । तुजकडे पळे ।।९।।
एकच उणीव । मज भासलीस । बघण्या सोहाळे । माता ना दिसे ।।
शुभ दिन आला । मूळ वराला । मोदे सर्व येती । जानोश्याला ।।
समय जाहला । सत्वर चला । ऐकोनि निशाणी । घाव पडला ।।१०।।

* * *

# लोकगीते

## नाचू मी कशी?

अयोध्येहून जासूद आला, भाऊ येतो गावाला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून हनुमान आला, पुसले नाही त्याला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून रामराया आला, अंबारी स्वारीला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून लक्ष्मण आला, लिंबलोण त्याला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून भरतभाऊ आला भेटले नाही त्याला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून शत्रुघ्न आला मूळ माहेराला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून वहिनी साऱ्या आल्या भेटाया नणदेला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून आहेर आला, कडी तोडे (ह्यांना)
नि पाटल्या – बांगड्या मला नाचू मी कशी?
अयोध्येहून अत्तर गुलाब ह्यांना नि शेंदूर काजळ मला,
नाचूं मी कशी?

अयोध्येहून शिरपेच ह्यांना नि सरी वाकी मला
नाचूं मी कशी?
अयोध्येहून उपरणे ह्यांना जोडवी गळेसरी मला
नाचूं मी कशी?

* * *

## सीता हरणानंतर रामाची मनोवस्था

जी रिझवी मम नयनाला । माझी नाढळे प्रिय कांता ।।धृ।।
कधीहि येता किति ही शिणतां
सदा सर्वदा उभी स्वागता
अर्घ्य देउनी, करितसे स्मिता
आज ती कशी दारि न सीता ।।१।।
नाना अपशकुन मजहि होति ते
वसुंधरा ही उदास दिसते
पर्णकुटी ही शून्य भासते
गेलि कुठे एकटि भयभीता ।।२।।
खास लक्ष्मणा घात जाहला
हाय हाय मी मुकलो सखिला
दैवे निष्ठुर डाव साधिला
मोडलीस का आज्ञा ताता ।।३।।
ये ये सीते, सद्गुण सरिते
दाखवि मजला प्रसन्न मुख ते
ऐकु न येती कंकण ध्वनि ते
बोल मृदु वचा अधिर मी अतां ।।४।।
माधवी लते कुठे तव सखी
मैने कोठे वद ग स्मितमुखी

जगी कोणि की मजसम दु:खी
त्यजुनी मजला जानकि जाता ५।।
कोणि देखिली कोणि की नेली
बोला सत्वर कुठे किं गेली
मृगाक्षि कोमल हृदय पाहिली?
वचन पियूषा पाजा तृषिता ।।६।।
हरि ॐ तत् सत्

* * *

## खरी माउली - सद्गुरू

प्रात:काली माय माउली म्हणे झडकरी उठ सये
निर्मल अंगण झाडून काढुनि केर दुरवरी टाकुनि ये ।।१।।
करूनि सडा संमार्जन दारी सुंदर रांगोळी काढ
शिकवी नाना रीती प्रेमें प्रीती कन्येवरि गाढ ।।२।।
स्मरूं किती उपकार तियेचे स्वयें कष्टते परोपरी
पवित्रता शुचिता ही शिकवी दृश्य दिसे हे घरोघरी ।।३।।
हृदय अंगणी, जिकडे तिकडे केर जळमटे ही गर्दी
रोज झाडणे दूर फेकणे याची ना दे कुणि वर्दी ।।४।।
आपण अपुले दोष शोधुं या यत्न करूं या घालविण्या
मळ परदोषे अंगण भरले सुलभ विमलता ना करण्या ।।५।।
सद्गुरू माउलि शिकवि सर्वदा स्वयें कष्टुनि विविधपरी ।
नका मुलांनो घाण कुणाची आणुं अपुल्या मनांतरी ।।६।।
मुले खेळती मातीमध्ये वस्त्रे मळती किती बरे ।
प्रेमळ माता क्षाळि सुखाने प्रेम कोण ते वर्णि खरे ।।७।।
मनोवस्त्र हे मलीन झाले पूटावरती चढति पुटें ।
बघुनी केवळ एकच जगिं या तीळ तीळ हो हृदय तुटे ।।८।।

बाळ निघे सफरीला जेव्हा गडबड माते ची उडते
करी तयारी नाना रीती सोबत ओळखिची बघते ।।९।।
खरोखरी परि जाणे जेव्हां लोक लोकिच्या सफरीला
सद्गुरू माउली एक पुरविते सोबत आणि शिदोरीला ।।१०।।
सद्गुरु हिच हो खरी माउली प्रेम ऋण कीं कधी फिटे
महान् थोरवी किति वर्णावी तेथे शब्द हि पडति थिटे ।।११।।

हरि ॐ तत् सत्

* * *

## (केशव करणी) रावण – अंगद संवाद

अंगद – अरे रावणा, तुला सांगतो बजावुनी पुनः पुन्हा
जानकी सोपवि रामा पुन्हा ।।धृ।।
नसे तुला रे खळा ठाउकी मम प्रभुची थोरवी
तुझी रे गती खास रौरवी ।।
प्रिय बंधूचा सल्ला तुजला कसा न रूचे दशमुखा
मुकसि बा राजैश्वर्या सुखा ।।
पढत मूर्ख नि धुंद मदाने जाणसि ना निज हिता
कळे कशि बंधूची योग्यता ।।
तूं श्वानासम रे भुरटा असासी चोर
सांगतो खास मी चोरावरती मोर
तव फुशारकीचा कळे अम्हांही जोर
कायर भित्र्या तुला सांगतो बजावुनी पुनःपुन्हा
जानकी सोपवि रामा पुन्हा ।।१।।

रावण – रे कपिपोरा वद संभाळुन ना तर परस्तावशी
जिवावर पाणी का सोडशी?
कुलद्रोहि तूं लाज लावसी वालीच्या रे कुळा

कशी रे तापसिं प्रीती तुला?
भ्याड बंधुची कीर्ती गासी मम सन्मुख मर्कटा
खाति रे राक्षस तुज कटकटा ।।
उचलीशी जिव्हा लावसि की टाळ्याला
बघु कसा मत्स्यही काळ पकडि जाळ्याला
मी सहीन सुखेंची तव मर्कट चाळ्याला
धर्म जाणतो म्हणुनि सोडतो तुला एक वेळ ना
मर्कटा पुरे तुझी वल्गना ।।२।।

(अंगद) - धर्मज्ञचि तूं थोर रावणा प्रजा म्हणुनी सारी
गातसे स्तुति स्तोत्रहि भारी ।
विद्यमान तूं शूरा लंका कपिने तव जाळली
म्हणुनि रे प्रजा तुझी भाळली
सीते हरूनी विपत्तिचे रे बीज तुवा रोविले
आता तरि ऐक सांगतो भले ।
(चाल) - अभिमाने करिसी सर्व कुळाचा घात
ही राजलक्ष्मिही जाईल हातोहात
शिकवणहि रुचेना ही काळाची मात
सावध होई शरण जाइ श्री रामचरणिं वेळ ना
जानकी सोपवि रामा पुन्हां ।।३।।

* * *

नको रामराया दुजे काही मज ।
स्मरावे सतत तुज । प्रेमभरे ।।१।।
मानसाची सेवा घडो निरंतर ।
गुरुकृपें अंतर । शुद्ध व्हावें ।।२।।

सदा आंत बाहेरी तुलाच पहावे ।
तुलाच सेवावे । निर्हेतुक ।।३।।
गूढार्थ चंद्रिका सांगावी मी लोका ।
तेणे भय शोका । निवारावे ।।४।।
सद्‌गुरूंची आज्ञा । आज झाली मज ।
तुज विण गुज कोणा सांगू ।।५।।
हरि ॐ तत् सत्

* * *

## उर्मिला - गीत

आज चित्त हे बावरे कसे
ना सरे निशा, नाथ या कसे,
मी आता किती आवरू मना
प्राण नाथ हो, भेट द्या जना ।।१।।
वृत्त ना कळे येत कीं कसे
दुष्ट तर्क ही जाळिती जसे ।
नाथ लाविला जन्म सार्थकी
राम सेवुनी, धन्य माय कीं ।।२।।
मी अभागिनी, दैव वाम ही
ना मिळे मला पाद स्पर्श ही ।
देखिले तिघां वेष तापसी
दुःखदाह हो फार मानसीं ।।३।।
ज्या क्षणीं वना जात पाउले
त्या क्षणी कसे प्राण राहिले
माय व्याकुळे पाहुनी मुलां
थोर ती सती भूषवी कुला ।।४।।

रानि वास ही काळजी नसे
थोर भाउजी रक्षिती तसे ।
माय माउली ही सवें असे
सेवकां मुला राखि प्राणसे ।।५।।

भाग्य थोर हे स्वामि. लाभले
सौख्य आपणां ते मला भले ।
प्रार्थि मी सदा धैर्य द्या मला
सेवुं द्या सदा पूज्य सासुला ।।६।।

सर्व हो खरे या आता त्वरें
भेटि लागि हो प्राण घाबरे
माय माउली वाट पाहते
मी तिघांस हो पाहुं इच्छिते ।।७।।

रामराज हो या अता त्वरें
जानकीसवें भेट द्या बरे
प्रीय भाउजी होति घाबरे
त्याजसाठिं या या तिघे त्वरें ।।८।।

* * *

## श्रीराम जयराम जय जय राम, स्वामी तेजोमयानंदजी

श्री सद्गुरुस्वरूप परम प्रिय

रा म भक्ताग्रणी,

म म प्रिय भ्राता,

ज गत्मान्य वेदान्त प्रवचनकार,

य शस्वी भागवत -व्याख्याता,

रा जहंसाप्रमाणे मानसात विहार करणारे,

म धु मधुर भाषी,

ज गदीश्वराचे परम प्रिय उपासक,

य शोगान करणारे गन्धर्व,

ज गास भगवत्स्वरूप मानणारे,

य शाने हुरळून न जाता, सर्व श्रेय

रा म प्रभु चरणी अर्पण करणारे,

म म माता, पिता, पुत्र आदि सर्व काही,

स्वा मीजी, नमन तुम्हां,

मी करते वारंवार, कारण,

ते णे समाधान, मज वाटे_।।

जो जो येई आठवण,

म न होतसे व्याकुळ,

याला उपाय करू काय, ते मला सुचेना ।।

नं दन दशरथांचा, तो असे स्वामी तुमचा

द यासागर, बंधु माझा,

जी व प्राण ।।

राखी त्याला बांधते मी नेमाने, प्रेमाने,

अत्यंत विश्वासाने, कारण तो सांभाळतो नाते.

* * *

## अभंग

**स्वा**न्त: सुखदाता । प्रज्ञानानंद स्वामी
**मी**नले, त्यांच्या चरणीं । मन माझें ।।

**ते**च माता – पिता । तेच सखा – बंधू
**जो**डोनि संबंधू । धन्य झाले ।।
**म**न माझे धाले । कृपामृतपानें ।
**या**चना केल्याविणें । वृष्टी करी ।।
**नं**दन कौसल्येचा । लाभला बंधू साचा
**द**येच्या सागराचा । अंत नाही ।
**जी**व ओवाळला । नमिले वारंवार ।
**ना**ही अंतपार । कृपेसी या ।।

कोटी कोटी प्रणाम

* * *

## स्वामी तेजोमयानंद

प्रभु तुम बहुत अनुग्रह कीन्हो
साधन हीन दीन जानत मोहि
सद्‌गुरु को पठ दीन्हो ।। १।।

ध्यान धराकर, बोध कराकर
रामरतन गुरु दीन्हो
प्रभुसे नाता जोड सिखाकर प्रेम भगति बर दीन्हो
दशरथसुत चारो मेरे भैय्या राखीसे बाँधी दीन्हो

नाता अवसि निभायेंगे प्रभु,
कहकर आश्वासित मोहि कीन्हो ।

सद्‌गुरुरूप तेजोमय स्वामीने कृपामेघ बरसायो ।
तुलसी मानसमें नहलाकर परमामृत पिलायो ।।

* * *

जीवन मेरो कर तेजोमय ।
सुन प्रभु मेरो परम कृपामय ।।
नामनिशान अग्यान का मिटे ।
ज्ञानसूर्यका प्रकाश फैले ।
भावभक्तिसे हृदय भरे तो,
देखूँ विश्व को, श्रीसद्गुरुमय ।। १।।
छंद नामका मुझको लागे
चित्त नित्य हरिरसमें रंगे ।
प्राप्तसंत-संगति जब होवे ।
सेवूँ जानकर सितासममय ।। २।।
मुझे जनम भक्तकुलमें लाभे
नाता यह प्रति जन्ममे निभे
बंधु और भगिनीका चिन्मय ।। ३।।

* * *

## बिनति

सुनो, सुनो विनति स्वामी तेजोमयानंद ।
आप तो साक्षात् है आनंद ।।
ज्ञानसार है आपके करतल।
भक्तिसुधासे भीगा अंतस्तल ।
जरा चखाओ अद्वैत-मकरंद।।

* * *

मेरे तो रघुवीर राम । दूसरो न कोई ।।
राखी बाँधी रामजीको । चाहे सो करौ सोई ।।१।।
रामनामके आधार । कमला जीअत खोई ।। २।।

* * *

## तुलसी-वंदन

बंदन तुलसिदास पद – पद्मा । जिन्ह कृत मानस जनसुखसद्मा ।।
होइ न जाइ जिन्हकी उतराई । बंदन बार बार करूँ पाई ।।
भगिरथ तुलसि रामरति गंगा । मही आनि कृत कलिमल भंगा ।।
शिव साखी करि सादर आपु । स्नान केवल हरे जन तापु ।।
कैसे विनय करौ तोहि पाई । मंद मति मैं सूझन काई ।।
गोस्वामी तुम राम पियारे । दीन दयाल अति कोमल बा रे ।।
अपने प्रभुसन कीजिए बिनति । एक दीन अति बाट जोहती ।।
है बडी कपटी कुचाल कुजाति । लेकिन मानस जियसे भाती ।।
प्रभु करि कृपा उसे अपनाओ । जगमें मानस इज्जत राखो ।।

* * *

### नवरत्नहार

**।।श्री सद्गुरु प्रसन्न ।।**

**।। राम ।।**

१. जय रघुनंदन जय सीयाराम ।।
निसिदिन रटत रहूँ तेरो नाम ।।ध्रु.।।
जो रस इसमें नहीं नहीं किसीमें
पी पी कर भी प्यासी मैं राम।।१।।
कभी देखूँ मैं तुझे सुखधाम
तरसाओ ना हे अभिराम ।।२।।
चातक मैं तू मेरो घनश्याम
भगिनी मनावत राजाराम ।।३।।

२. गुन गाऊँ मैं राम खरारी
तरसाओ ना हे धनुधारी ।
नाम तुम्हारो है अघहारी
रूप तेरो है मनोहारी

चातक मैं तू जलधारी
भगिनी हूँ मैं जाऊँ बलिहारी ।।
३. चारो मेरे भैया है बडे नटखट
खेल रहे हैं शरयूके तट ।।
श्याम – गौर दो जोरी मनोहर
पीतवसन कटि सोहत सुंदर
कर धनु बाण सान तरकस वर
देखनेवाले ठाढे वहीं पर ।।
संग सखाओंकी सोहत टोली
खेलत सब है आँख मिचौली
देखो भरतने बाजी मार ली
राम भैय्याने हार मान ली
किलकारीसे गूँज उठा तट ।।
४. (जाग मेरे)उठि उठि भैया, भयो है भोर
भगिनी मनावत अवध किशोर ।।१।।
बंदी द्वार पर करत हैं शोर
जाग जाग प्यारे चित चोर ।।२।।
अनुज पुकारत नाम है तोर
गुन गाँऊ मैं भाव विभोर ।।३।।
५. गुरूजी ऽऽ मेरे मन आनंद भयो
सुनकर आपके गीत भक्तिमय
नयनन्ही नीर भऱ्यो ।।१।।
कैसे कहूँ मैं भाव मनके
कंठ ही रूद्ध भयो ।।२।।
तेजोमयकी असीम कृपासे
नितप्रभु प्रेम नयो ।।३।।

६. राजत राम जानकी जोरी
कैसे बखानूँ बुधि है थोरी
आप है मेरे भाभी भैया
पार लगा दो (प्रभु) मेरी नैया
सुना आप है कुशल खेवैया
कैसे मनाऊँ सीता मैया
खडी द्वांर पर मैं कर जोरी ।।

७. आनंदकंद सीतापति दशरथनंद
गुन गाऊँ मै स्वच्छंद
अग्यान मैं भोली, उसपर हूँ मतिमंद
लेकिन लूट मैं लेती नामानंद
और रामकथामें मिलता परमानंद
गुन गाऊँ मैं स्वच्छंद ।।

८. सुनो सुनो बिनति दीनदयाल
खडी तेरे द्वार पर कभीसे कृपाल ।।
चाह है तुझको देखूँ नयनभर
और हो जाऊं प्रभु मैं निहाल
तुझपर प्रेम करूं जी भरभर
और समाऊँ तुझमें गोपाल ।।
रघुकुल मणि मैं बहेन तुम्हारी
राखो अपना ब्रीद मेरे लाल ।।

९. मुधर मधुर राम नाम
मुद्मंगलके निधान ।।
भगतन्ह के सर्बस और संभु उमाके है प्रान
कमला के जीवनधन प्रज्ञाके सुखनिधान
नाम जपत आवे राम संतन के वच प्रमान ।।

* * *

स्वामी रामसुखदासके चेरे ।
डुंगरजी महाराज हमारे ।।१।।
राम प्रभुके परम दुलारे ।
गोस्वामी के भगत है प्यारे ।।२।।
मानस राजहंस है न्यारे ।
भगत स्वामी प्रज्ञाके बा रे ।।३।।
मानस प्रेमियों के सहारे ।
भगिनी कमला तन मन वारे ।।४।।

* * *

## **अंगाई गीत** (हिंदी पाळणा)

सो जा सो जा, मेरे राम भैया प्यारे
भगिनी मनावत, राज दुलारे ।।
चारों मेरे भैया नटखट प्यारे
दिनभर शोर, मचाते है सारे
पुरजन परिजन, आँखो के तारे
देख देख माता तृन तोरे ।।१।।
भरत लखन शत्रुघ्न प्यारे
सेवा चाहत बंधु है न्यारे
पाय पलौटत प्रेमके मारे
देखकर कमला तन मन वारे ।।२।।

* * *

रोम रोम में राजत राम
फिर भी क्यो मैं व्याकुल राम? ।।धृ।।
कैसी तेरी माया हे घनश्याम
नाच नचावत, दिन अरु शाम ।।१।।

रूप तेरो अद्‌भुत नाम सुखधाम
सबको नचावत रात दिन श्याम ।।२।।
नाच नाच कर थक गयी राम
शीघ्र छुडावो हे कृपाधाम ।।३।।
कैसे मनाऊँ तुझे सीताराम
कैसे मनाऊँ तुझे सुखधाम ।।४।।

* * *

## स्फुट हिंदी कविता

रामु भरतु लखनु शत्रुहनु
और हनुमानु पंचप्रान जनु ।
नहिं कोइ जगमें इन्ह समानु
गुन गावत कमला रात दिनु
कृपा करो उन्हपर अनुदिनु ।।

* * *

स्वा मी तुम्ही आहात रामभैय्या ।
मी तुम्हाला त्रास देते ना? सदया!
ते हनुमत्प्रभु करोत मजवर माया ।
जो कृपासिंधु तो बंधु माझा सखया ।।
म म मुखात राहो रामनाम अमृत मधुर
या नेत्रातही ते रामरूप श्यामसुंदर ।।
नं दन रघुकुलांतील ब्रह्मण्यदेव सुरवर
द यासागर भक्त उरचंदन जानकीचा प्रियकर ।।
जी वीचा जिवलग प्राणांचाही प्राण
नाही तो मजला अंतर कधी देणार ।।
सादर सप्रेम कोटी कोटी प्रणाम ।

* * *

पहिली माझी ओवी । तेजोमयानंदा ।।
सत्‌चित्‌ सुख कंदा । नमिते मी ।।१।।
आदेश तुझा झाला । आळवी रघुनाथाला ।।
अनन्य करि भावाला । त्यांचे पदी ।।२।।
आठवू नको कोणा । दुजे त्या खपेना ।।
एकाग्र करी मना । त्यांचे ठायी ।।३।।
त्याचेच करी ध्यान । त्यास सर्व समर्पण ।।
फक्त त्याचेच चरण । दृढ धरी ।। ४।।
तेजोमय गुरुवर्या । हित माझे साधावया ।।
किति कष्टसी सदया । निरंतर ।।५।।
आता पाळीन आदेश । स्मरीन मी अवधेश ।।
जोवरी तो विश्वेश । प्रकटेना ।।६।।
धरील ना तो हृदयी । कृपासिंधु रघुराई ।।
व्याकुळ मी त्याचे पायी । लोळतसे ।। ७ ।।

* * *

कोणी वंदा अथवा निंदा । करीन मी स्वहिताचा धंदा ।।
धरीन मी रामपदारविंदा । घेईन मी रामनाम छंदा ।।
सद्‌गुरु माऊलि वोळली । तेजोमयानंदे कृपा केली ।।
दिधला आशिश अमोघ । हरले पापाचे ओघ ।।
कैशी होऊ उतराई । मजला न कळे रघुराई ।।
आनंद हृदयी मावेना । प्रेमे धरीन मी चरणा ।।

* * *

चला भगिनीनों साऱ्या मिळुनी पवईला जाऊ या
श्रीगुरुदेवा पाहू या ग, गुरुजींना वंदु या ।।

मराठी मानस वाचू या ग, प्रेमानंदे डोलू या ॥
संपुट लावून वाचू या ग, नाम संकीर्तनी रंगू या ॥
प्रवचन स्वामींचे ऐकू या, भरत–प्रेमा चाखू या ॥
गूढार्थाला जाणू या ग, रामप्रेमी न्हाऊ या ॥
पर्वणी ऐशी साधू या ग, जीवन सार्थकी लावू या ॥

* * *

**३० जून ला प.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्या वाढदिवशी–**

दिव्य तुझे दर्शन कधी होईल मज स्वामी
अमृतमधुर वाणी तुझी कधी पडेल कानी
कृपाहस्त मस्तकी मम कधी तू रे ठेवशील?
शांतिः शांतिः म्हणून मला सांग कधी शांतवशील?
चरणी तव चित्त जडे, विरह साहवे न मला
कोटी कोटी कोटी वार वंदन माझे तुजला
आज जन्मदिन तुझा प्रभुला मी प्रार्थितसे
उत्तम आरोग्य आणि दीर्घायु देई तू ते.

* * *

**अभंग**

स्वा नंद सम्राट तेजोमयानंद
मी नले हे मन, त्यांचे चरणी ॥१॥
तेच माझी माता, तेच माझे पिता
जोडुनिया हाता, नमिते मी ॥२॥
मम भ्राता तेचि सखा मम तेची ।
यालागी करिताती कृपा अती ॥३॥

* * *

## प्रार्थना

जीवन माझे करि तेजोमय
प्रभु. विनवीते परमकृपामय ।।धृ।।
अज्ञानाची रात्र सरू दे
ज्ञानसूर्य उदयास येउं दे
भावभक्तीने हदय भरू दे
पाहिन विश्वा श्रीसद्गुरुमय ।।१ ।।
नामाचा मज छंद लागू दे
हरिभजनी मम चित्त रंगू दे
संत संगती सतत लाभु दे
सेविन सर्वा सितारामय ।।२ ।।
अंती ओठी नाम येउ दे
भक्तकुळीं मज जन्म लाभुं दे
नाते जन्मोजन्मी निभूं दे
बंधु आणि भगिनीचे चिन्मय ।।३।।

* * *

## भावांजलि

जय जय गुरु चिन्मय, आनंद तू खरा ।
दिव्य तुझ्या पदस्पर्शे धन्य ही धरा ।।धृ.।।
उपनिषदे आणि गीता वसति आननी ।
जणु शंकर आचार्यचि प्रगटले जनी ।
तीव्र तपे स्वामी तुम्हि मुक्तिला वरा ।।१।।
करुनि गीता-ज्ञानयज्ञ शिकविले जनां ।
धाकाने, प्रेमाने वळविले मना ।
स्वयें उद्धरुनि तुम्ही जनां उद्धरा ।। २।।

बाल युवा वृद्ध जना सेविले तुम्ही ।
चिन्मय -मिशन रुपे अमर हो तुम्ही ।।
जाति-पाति लिंग वर्ण भेद ना करा ।।३।।
जादूगार शिल्पकार मिशनचे तुम्ही ।
पाच दशक लोटले कार्य अरंभुनी ।।
नमित तुम्हां प्रेमाने जुळुनि मी करा ।। ४।।
लोक देश-देशींचे आज पातले ।
अर्ध-शतक मेळावा म्हणुनिया आले ।।
अशिच व्हावी शतक पूर्ति प्रार्थु प्रभुवरा ।। ५।।

* * *

धन्य धन्य तेजोमय । रामभक्त तू खरा ।
सुप्रसन्न हास्य तुझे । भुलविते चराचरा ।।
प्रेमानंद नाम तुला । द्यावे का यतिवरा ।
मंगलमय हास्य तुझे । सुखविते सुधाकरा ।।
ते सदैव विलसो मुखी । प्रार्थिते मी रघुवरा ।
प्रेम तुझे लाभो मज । विनविते कृपाकरा ।।

* * *

स्वामी तिन्ही जगाचा ।
मी मानते बंधु माझा ।।१।।
तेजोमयानंद रुपे
जो करि वर्षाव कृपेचा ।।२।।
मन जडले त्याच्या चरणी ।
याहून काय हवे या जन्मी ।।३।।
नंदन दशरथ तातांचा ।
दयासागर राजा अयोध्येचा ।।४।।

जीवेभावे आळविते मी त्याला ॥५॥

आपल्या चरण कमली सादर सप्रेम ॥

कोटी कोटी कोटी प्रणाम ॥

* * *

## गुरुपौर्णिमा २००३

जय जय गुरु तेजोमय शुद्ध प्रेमळा
गुरुपौर्णिमेनिमित्त नमित मी तुला ॥ध्रु॥

रामायण गान तुझे मजसि सुखविते
त्या योगे स्मरण तुझे नित्य साधते
जीवनि आनंद सहज लाभतो मला ॥१॥

दर्शन कधि होइ तुझे, चित्त चिंतिते
आश्वासक स्पर्श तुझा होउ इच्छिते
ठेवी शिरी करकमला, विनविते तुला ॥२॥

* * *

## आरती – चिन्मय गणाधीशाची

आरती गणराजा । देवा चिन्मय गणाधीशा ।
आरती ओवाळितो । करा साह्य गुरुकाजा ।ध्रु.॥

करवीर, दक्षिण काशी । जवळी टोप–संभापूर ।
निसर्ग रम्य स्थळी । चिन्मय आश्रम सुंदर ॥१॥

स्फटिक शिवलिंग । गुरुदेव आत्मलिंग ।
स्थापितां त्या स्थानी । माहात्म्य नसे पारावार ॥२॥

मराठी सांदीपनी । करण्या वेदांत प्रचार ।
चिन्मय कार्यकर्ते । स्वयें कष्टती अपार ॥३॥

उपासिती तुम्हां प्रेमे । गुरुसेवेत तत्पर ।
विद्यार्थी याचे खूप । यश लाभो त्यांना थोर ॥ ४॥

* * *

## आरती - स्वामी चिन्मयानंदाची

आरती गुरुदेवा । स्वामी चिन्मयानंदा ।
आरती ओवाळितो । प्रिय तपोवन शिष्या ।।ध्रु.।।
शंकराचार्य अवतार । केला वेदांत प्रचार ।।
सनातन धर्म महती । वाढविलीसे अपार ।।१।।
देवसेवा देशसेवा । हेचि जीविताचे सार ।
असंख्य कार्यकर्ते । निर्मिले गुरुसेवा तत्पर ।।२।।
चिन्मय मिशन तुमचा । विश्वव्यापी परिवार ।
अगाध तुमची थोरवी । काय वर्णू मी पामर ।। ३।।

* * *

## आरती - स्वामी तपोवनांची

आरती तपोवना । स्वामी सच्चित्सुखधामा ।
आरती ओवाळितो । तुमची कृपा लाभो आम्हां ।।ध्रु.।।
मलबार प्रांती जन्म । मनीं ओढ हिमालयाची ।
गंगोत्री उत्तरकाशी । वस्ती केली ऋषिकेशी ।। १।।
संस्कृतचे प्रकाण्ड पण्डित । आणि सुप्रसिद्ध वेदांती ।
आदर्श संन्यासी म्हणून । ख्याती झालीसे जगती ।।२।।
ब्रह्मनिष्ठ सर्वाभूती । भगवत्‌भाव प्रेम अती ।
पण्डित, अज्ञानाशी । समभावे वर्तती ।।३ ।।
अध्यापन शैली त्यांची । असे जगावेगळी ।
वैराग्य तितीक्षा ही । आचरुनी शिकविती ।।४।।
निस्पृहस्य तृणं जगत् । याची येतसे प्रचिती ।
परीक्षा कठोर घेती । गंगा-काशीशी प्रीती ।।५।।
हिमालयातून मैदानात । कधी उतरुनि ना येती ।
ब्रह्मलीन झाल्यावरी । शिष्य देती जलसमाधि ।।६।।

तपोवन कुटिरी हो । कृपेची येते अनुभूति ।
चोरिले चित्त ज्यांनी । त्यांना करू प्रेमे प्रणति ।।७।।

* * *

## आरती स्वामी चिन्मयानंदजीकी

आरती स्वामी चिन्मयानंदजीकी ।
कीरति कलित ललित गुरुदेवकी ।।ध्रु.।।
गावत भारतीय और विश्वजन ।
ज्ञानसे होत विशुद्ध भगत मन ।।
ग्यानोदयसे सुफल हो नर तन ।
वैराग्य मूरती तपोवन शिष्य की ।।१।।
ब्राह्मी स्थितिमें रहते थे आप ।
दर्शनसे हरते सब पाप ताप ।।
देखते सर्वत्र नारायण स्वरूप ।
वेदांत-विशारद मलबारके सुपुत्र की ।।२।।
भगत जनों को सदा जगाते ।
'देह नही तू ब्रह्म है' सीखाते ।।
नारायणकी आराधना कराते ।
उपनिषद् गीता के भाष्यकारकी ।।३।।
आंग्ल भाषामें प्रवचन देते ।
आधुनिक जगतमेंसे दृष्टान्त लेते ।
प्रेमभावमें सबको नहलाते ।
कृष्णभक्त श्रीजगद्गुरुकी ।। ४।।

* * *

## आरती स्वामी तपोवन महाराज की

मंगल आरती तपोवन महाराजकी ।
स्वामी चिन्मयानंदके पूज्य गुरुदेव की ।।ध्रु।।
ह्रषिकेश, उत्तरकाशी, गंगोत्री निवासीकी ।
हिमालयके एकाकी यात्रीकी ।। १।।
वेदान्त विशारद, आदर्श यतिवरकी ।
अनुशासनप्रिय, वैराग्य मूरतिकी ।।२।।
गंगाकाशीश के प्रिय भक्त की ।
आदिवासी जनों के प्रिय महात्मा की ।।३।।
उत्साह मूर्ती नारायण रूप की ।
कमला के वंद्य प्रिय प्रेममूर्तीकी ।।४।।

* * *

## शिवस्तुती

कैलास शृंगी वट रम्य छाया ।
दे दिव्य सिंहासन, शैलराया ।
तेथे विराजे शिव चंद्रमौळी ।
वामांकि शोभे गिरिराजबाळी ।।१।।
शोभे शिरी रत्न किरीट फार ।
कंठी निळ्या उज्ज्वल रत्नहार ।
स्कंधी उमेचा मृदु गौर हात ।
गृही विरागीहि गणेश तात ।।२ ।।
गंगाशिरी नित्य वसे सुखात ।
श्रीरामनामावलिही मुखांत ।
गौरांग वेष्टित सुगंधि नाग ।
नेत्री दिसे पूर्ण जनानुराग ।।३।।

* * *

## शिवस्तुति (स्वप्नदृष्टांत)

### श्लोक

हातात शोभे डमरू त्रिशूल
रूद्राक्षमाळा प्रिय सर्वकाळ
अंगी चिताभस्म कटीसि शृंगी
सेवे उभे नंदि नि भृंगि शृंगी ।। ४।।

चंद्रानना जी मृदु गौरकाय ।
शोभे अलौकीक गणेश माय ।
पाहे पतीसी अति आदरे ती ।
प्रत्यक्ष आदर्श पतिव्रता ती ।।५।।

मांडीवरी क्रीडतसे गणेश ।
वात्सल्य नेत्री निरखी महेश ।
गौरी सहर्षे बघते कुमारा ।
जो रूप-तेजे पळवीत मारा ।।६।।

* * *

### साक्षात्कार

माझ्या मनात आहे मूर्ती सुरेख एक
जी चित्रकूटी दिसली ठसली शिवस्वरूप
काषायवस्त्र होते, हातात ग्रंथ एक
चष्म्यांतुनी पहाती दृष्टि सतेज चोख
कठड्यावरी बसोनी स्मितहास्य ते करोनी
माझे क्षणात घेती ते चित्त की हरोनी
पुसताच मी तयांना उतरू की आत येथ
हाती करून खूण दिली अनुमति हसून

शिळेवरी मी लोळे, झरतात सतत डोळे
काही मला दिसेना मन रामरंगिं रंगे
भानावरी मी आले, आले उठून वरती
स्वामी अदृश्य झाले, परी हृदयी केली वसती
चष्म्यातूनी पहाती जव तेजोमयानंद स्वामी
तेव्हा मला गमे की शिवमूर्ती तीच नामी
शिवस्वरूप तेची । मम रामभैय्या तेची
सद्गुरु स्वामी तेची । विश्वात सर्व तेची
कशी विसरू मी तयांना । गुण वर्णिता पुरे ना
कुणि नाढळे की मजला । कनवाळू त्या समाना ।।

* * *

## (चौपाई)

कलियुगिंसाधन साध्यहि नाम । संतत नामें नुरतो काम ।।१।।
पूर्ण सच्चिदानंदचि नाम । नित्य अभिन्नहि नाम नि राम ।।२।।
करि गोष्पद भवसिंधुस नाम । नाम राम निर्मल सुखधाम ।।३।।

* * *

कोटी काम कमनीय रूप ते ।
एकदा तरी मज पाहू दे ।।१।।
शोभासिंधु खरारी तुमच्या
चरणी मिठी मज घालू दे ।।२।।
परम कारुणिक ब्रीद तुमचे
मजसाठीही सार्थ ठरू दे ।।३।।
कारण रहित दयाळ असा तुमचा ।
नाममहिमा सत्य ठरू दे ।।४।।

* * *

## (वसंत तिलका) श्लोक

हे राघवा ब्रीद तुझे प्रणतार्ति हारी ।
ऐकूनि, दीन वचनें तुजला पुकारी ।।
कीर्ति कुळाचि विमला पसरे त्रिलोकी ।
होताति याचक अयाचक शीघ्र लोकीं ।।
ऐसा तुझा मधुर कीर्तिसुगंध नामी ।
दाही दिशांस पसरे भुललेच ना मी ।
वाटे मना कि विनवूं तुज याच रीती ।
आहे विदीत, तुज याचकिं फार प्रीती ।।

* * *

## राम पद

जानकीनाथ, तुझ्याच कृपेने कधि तव भक्ति मिळेल, मिळेल? ।।ध्रु।।
माया जनित विपत्ती जाउनी, निज सुख शुद्ध लाभेल, लाभेल?
प्रयत्न माझे अपुरे असती प्रिय मम भ्राता भाऊ, भाऊ ।।१।।
समर्थ आणि करुणाकर तूं तुजविण कोणां ध्याऊं ।
सदा सर्वदा तुझेच गुण बा, वाचे प्रेमे गाऊं गाऊं ।।२।।
जानकीनाथ, तुझ्याच कृपेने कधिं तव भक्ती मिळेल मिळेल?।।ध्रु.।।

* * *

श्रावणाने केली किमया, पसरले हिरवेगार गालिचे
चाफा दरवळला, पारिजात बहरला,
गाभण राहिली केळ, ऊन पावसाने मांडला खेळ
केतकीच्या बनांत, सळसळली नागीण
कान्हा मात्र मथुरेत अन् राधा बनली जोगीण

* * *

## सूर्य स्तुति (श्लोक)

हे भास्करा, सुखकरा, रथवाहना रे
दाता उदार तुजसा, जगि कोण बा रे
नाही तुझ्यासम कुणी समतेसि वाली
हाती दिवाकर, तुझ्या सुख सर्व काली ।।१।।

* * *

**श्री सूर्यास प्रार्थना** (चाल –आनंदी आनंद गडे)

भानुराज हो या हो या । दीनेवरि करण्यास दया ।।
कृपासागरा झडकरि या, विश्वचक्षु हो तुम्हिं सदया ।।
ह्रदी वसतसां, तुम्हि जाणतसां, जगिं कोण कसा?
कपट कसे तुजपुढती या ।।१।।

पूर्वज रामाचे तुम्ही, म्हणुनी काही विनवित मी ।
राम दयाळू, परम कृपाळू अति कनवाळू ।
द्या दीनेचे स्मरण तया ।।२।।

आज्ञाधारक राम असे, पितृवचना मोडील कसे?
शब्द आपुला, पूज्य तयाला, झेलिल त्याला ।
सहजचि माझी येई दया ।।३।।

भगिनी त्याची म्हणवितसे, जरी योग्यता अल्प नसे ।
भेटिस येण्या । मज उद्धरण्या । भक्ति लाभण्या ।
विनवा त्यासी करूनि दया ।।४।।

* * *

### अभंग

महालक्ष्मी माझी प्रेमाची माउली
सुखाची साउली अनाथांसी ।।१।।

भक्तांच्या कारणें येथे प्रगटली
म्हणून लाभली जगतासी ।।२।।
काय वर्णू तिचा महिमा अपार
वाचे अनावर वर्णवेना ।।३।।
बसली सिंहासनी शोभतसे माता
तिचे गुण गाता प्रेम दाटे ।।४।।

* * *

देह राहो अथवा जावो
रामनामी माझा भावो ।
रुचे रामा ते तूं करी
नाम तुझे धरिले उरी ।
जरी प्रकट न होसी
नाम धरीले जिव्हेसी ।

* * *

भगवान् राम मजला चरणी द्या ठाव आता
नाचनाचुनी मी दमले शीघ्र हृदयि धरी ताता
तुजविण ना कोणी त्राता, अंत नको पाहू भ्राता ।।

* * *

विनवीत मी तुज दशरथनंदन
व्हावे प्रकट नी द्यावे दर्शन
राखी बांधली तुज रघुनंदन
नित्य तुला मी करिते वंदन
बाहते तुला भगत उर चंदन
अंत नको पाहू तू दयाघन

* * *

## अंजनीगीत (विनंती)

ये रे येरे भाऊराया । ये रघुवीरा रामराया ।
नको लावु रे वेळ वांया । शीणे ही काया ।।१।।
भेट कधी होईसे झाले ।तुझ्या कृपेने जरि मी धाले ।
दर्शनासि रे लाचावले । अति लोभी मन हे ।।२ ।।
पात्र जरी ना मी मुळी नाही । शरण तुझ्या पदि आले पाही ।
राखिली तू रुचि ना काही । करूणावीरा रे ।।३।।
जे जे माझ्या मनासि भावे । ते ते तूही बा पुरवावे ।
अशी कृपा मी नित्य अनुभवे । का भेटसि ना रे ।।४।।

* * *

पतित तू पावना । म्हणविसी राघवारामा
म्हणुनि मी आळवी घनश्यामा । दर्शन द्यावे अभिरामा ।।
जरी ना येसी सीतारामा । कमीपणा येईल तुज रामा ।।
याचेच दु:ख राजारामा । वाटते मज मेघश्यामा ।।
नामासाठी येई सुखधामा । भगिनी मी विनवी तुज कमा ।।
ब्रीदासाठी येई सुखधामा । बहीण मी विनवी तुज कमा ।।

* * *

पहिली माझी ओवी । नमन सद्गुरु ।
कृपेचा आगारु । सौख्यसिंधु ।।१।।
आली दिपावली । माहेराची आठवण ।
येते हृदयी दाटून । रामभैय्या ।। २।।
भाऊबीजे दिनी । येशील कां धनुपाणी ।
संगे घेऊन वहिनी । भेटावयां ।। ३।।
लोटली वर्षे किती । भेटसी ना मजलागी ।
नावडते तुजलागी । म्हणुनी कां? ।।४।।

नाही मी तुझ्या योग्य । कळते मलाही ते ।
कोठे जाऊ सांग माते । तुझ्याविना ।।५।।
सर्वत्र असरसी । जरि न दिससी ।
प्रेमे प्रकटसी । सांगे शम्भु ।।६।।
कधी दिव्य प्रेम । मला ते लाभेल ।
जेणे तू कृपाल । भेट देसी ।।७।।
तेजोमयानंद । तुझेच स्वरूप ।
कृपा प्रेम खूप । करिताती ।।८।।
त्यांच्या योगे येतो धीर । ना तरी मी अधीर ।
भेटी द्यावी रघुवीर । आळवू किती?।।९।।
कधी मज वाटे । उपेक्षिसी माते।
चित्त उदास ते । होत असे ।।१०।।
हरि कृपा करी । येवोनी झडकरी ।
धरोनिया करी । आलिंगावे ।। ११।।

* * *

## कृतज्ञता

राम मला, फुलासारखी जपतो ।
राम मला फुलासारखी जपतो ।।ध्रु.।।
मी करीत नाही सेवा
तरि आवडते मम देवा (भावा)
माझी सेवा, तोच करितो
प्रभु नाना रूपे नटतो ।। १।।
ज्ञान देतो, वैराग्य देतो,
भक्ति रसामधी न्हाऊ घालतो
आनंद उरि भरतो ।।२।।

सांगा कशि मी विसरूं त्याला
त्या करुणाघन मम बंधूला
मजला क्षणोक्षणी आठवतो ।। ३ ।।

* * *

## भुजंग प्रयात (श्लोक)

मना सज्जना सद्गुरु आठवावे
अलौकीक गूणां तयांच्या स्मरावे ।
जोडोनि नाते रामा आळवावे
तू रे सदा सत्य भाषण करावे ।।१।।

**चाल –उपजाति :** परदोष चर्चा कधी ना करावी
सदा संगती सज्जनांची धरावी ।
निष्ठा सदा रामनामी धरावी
कथा 'मानस' नित्य प्रेमे तूं गावी ।।

* * *

## सद्गुरू

आठव येतो घडी घडी पाही
तुम्हाविण करमत नाही, स्वामी ।। १।।
रामायण गाने आनंद उरी
गीता प्रवचन तम मम हरी
भागवत वाचन भाव भक्ती भरी
आपुल्या कृपेसी नाही नाही सरी
तुम्हाविण करमत नाही, स्वामी ।।२।।
रामभैय्या कृपा करी तव रूपे
आदेशे तुमच्या मी राम नाम जपे

अन्य उपाऽय न चले येथे
प्रणाम करिते स्वामी पाहि पाहि
तुम्हाविण करमत नाही, स्वामी ।।३।।
आशिषे अपुल्या राम कृपा करी
हनुमान लल्ला धरितसे उरी
जन्म सार्थक झाला खरोखरी
वर्णाया महती सामर्थ्य नाही ।।
तुम्हाविण करमत नाही, स्वामी ।। ४।।

* * *

मजला, आठवितो गुरुराणा ।।
जगि ज्याची सरी नये कोणा ।। ध्रु.।।
काषायवस्त्र परिधाना
मूर्तिमंत वैराग्यचि जाणा
वाहिले करकमल लेखना.....
आळस ठाउक नाही त्याना ।।१।।
सीताराम जाणुनी जना
सेवतो तनमन वचना ।।२।।
रामरंगि जाती रंगून
देहाचे होइ विस्मरण ।।३।।
लौकिकाची चाड ना मना..
शिकविती सूकर विष्ठा गणा ।।४।।
शिस्तीची आवड स्वामींना
परोपरी शिकवित शिष्यांना ।।५।।
परदोष चर्चा आवडेना
वाखाणिती सत्य वचना ।।६।।

रुचतसे संध्योपासना ।।
नाते प्रभुशी जोडा ना ।।७।।
प्रेमे आळवा रघुराणा
शिकविती ऐशा युक्ती नाना ।।८।।
मजला आठवतो गुरुराणा ।
जगि ज्याची सरी न ये कोणा ।।ध्रु.।।

* * *

## चाल कटाव किंवा चौपाई समान

ब्रह्मनिष्ठ स्वामी ते जाणा
देह भाव ही नसेचि त्यांना
संस्कृतात भाषण करिताना
कळ नसे तेथिल लोकांना
प्रज्ञानानंदी प्रेम अति त्यांना
गुरुशिष्य शोभती परस्परांना ।।
काव्यस्फूर्ति झाली अनिवार कंठी दाटला गहिंवर
मराठी मानस अवतरले । गुरुंनी अभिनंदन केले
श्रवणी काव्य ते पडले । लोचनी अश्रु पाझरले
वदले, धन्य तव जननी । झालास कृतार्थ तू रे जनी ।
पत्नीची अनुमती घेऊन । पाहिले आपुले मरण ।
त्यागुनी शिखासूत्र बंधन । केले संन्यास ग्रहण
आळे ग्रामी शीघ्र जाई । सद्गुरुकडून दंड घेई
आदेश झाला अवचित पाही । नमुनी पायी कृतार्थ होई ।।

* * *

।। श्री ।।

।।श्री सद्गुरू प्रसन्न ।।

।। राम ।।

भगिनी तव मी मम तूं भ्राता
अंत किती बघसी तरि आता ।।
रडते मी तुजविण तळमळते
का प्राणा तव येइ न कळते ।।
हाक तुला की ऐकु न येई । शीघ्र धाउनी उचलुनि घेई ।।
दीनबंधु मज विसरलास कीं । लपुनी कोठे बैसलासि कीं ।।
कशी तान्हुली रडते म्हणुनी । बघसी कीं तू लपुनी छपुनी ।।
भेटसि ना तर तुझीच लाज । जाइ जगातुनि सांगूं आज ।।
पाव पाव बा बंधु कृपाळा । कृपा पाखरी मजवरि घाला ।
दुस्तर तव माया विश्वेशा । विलया नेई तूंच रमेशा ।।

* * *

चला भगिनीनो साऱ्या मिळुनी । अयोध्येला जाऊ या ग,
अयोध्येला जाऊ या ।।
सीतारामा पूजू या ग, रघुनाथाला आळवू या ।।
भक्तिरसाने न्हाउ या ग, प्रेमानंदे डोलुं या ।।
रामचरणी मन ठेवू या ग, देहभान हे विसरू या ।।

* * *

## **एक आर्त विनवणी** (जाति : भूपति वैभव)

हे प्राण जेधवा जातिल कुडि सोडून ।
वा सांग राघवा, येशिल ना धावून?।।ध्रु.।।
अति तीव्र लालसा अजामीळसम व्हावे ।
या वाणिस नामी अनन्य तव अर्पावे ।।

ही माया तुमची मजसी मोहित करते ।
यास्तव ना पूर्ती मनोरथाची होते ।।
तुम्हि दीनदयाळू, रामबंधु कनवाळू ।
किति प्रार्थावे मी तुम्हांस परमकृपाळू ।।
तुम्हि परमात्मा मी जीव अंश अविनाशी ।
जरि वियोग नाही कदाकाळिही तुजशी ।।
परि दर्शन व्हावे अशि तळमळ का मजसी? ।
ती शमवावी प्रभु, नम्र विनंती तुजशी।।

**हिंदी चाल बदलून चौपाया (चौपदी)**

श्रीगोस्वामींच्या विनयपत्रिकेवरी सही तुम्हि केली ।
भगिनी तव दारी उभी असे कां तिची उपेक्षा केली ।।
तव चरण धरावे, मुखा पहावे, करां तुझ्या चुंबावे ।।
बांधुनिया राखी, आलिंगुनि तुज, चरणी मी लोळावे ।।
हे बंधू, माझ्या स्कंधि थोपटुनि आंसु तुम्ही पुसावे ।।
आश्वासुनि मजला मस्तकिं माझ्या, वरद हस्त ठेवावे ।।।

* * *

**(चाल : बालानंद)**

रामा कधि येशील गडे । सान आपुल्या भगिनीकडे ।।ध्रु.।।
कीर्ति ऐकुनी मनवेडे । धाव घेतसे तुझ्याकडे ।
कधितरि येशिल, मला भेटशिल, जवळी घेशिल
ब्रीद राखण्या सत्य गडे ।। १ ।।
पतीतपावन नाम तुझे, म्हणुनी आशे मन माझे ।
मज सांगतसे, तुज आस असे, भेट देतसे
क्षमा करूनि अपराध गडे ।। २।।
विषयी मन हे गुंततसे । या भवनदि तुन काढा कसे?।

हात देसि ना । तरि बुडले ना । होडि नाव ना ।
तुजविण तारी कोण गडे ।।३।।
जरी योग्यता अंगि नसे । साधन प्रेमहि अल्प नसे ।।
तुला बघावे, चरण धरावे, प्रेमि बुडावे
मनोरथा करि मन वेडे ।।४ ।।

* * *

## (ओव्या) विनवणी

ये रे भाऊराया । ये ये रामभैय्या ।
मजसी खेळाया । येई त्वरे ।।१।।
वाट मी पहाते । खेळ आवडते ।
येई खेळायातें । लगबगी ।।२ ।।
भाऊ, लपंडाव । तुज आवडतो ।
हृदयी लपतो । सापडेना ।।३।।
येई बारे येई । हार मला देई ।
थकले मी बाई । शोधूनिया ।।४।।
सर्वत्र असरसी । परि न दिससी ।
अंत का पहासी । अनंता रे ।। ५।।
ये रे ये राजसा । अवचित कसा ।
वायुसवे जसा । पुष्पगंध ।।६।।
खेळू दोघेजण । सागरगोटे रे ।
सारीपाट की रे मांडू गड्या ।। ७ ।।
आण चेंडूफळी । किंवा धनुकली ।
रामा भातुकली । खेळावी कां?।।८।।
गप्प राहसी कां । मुख कोमेजे का?
गट्टी फू केली कां । मजसवे ।।९।।

दादा, रूसू नको । बोल ना मजसी ।
दूर का लोटिसी । प्रेमळा रे ।।१०।।
रामा, तुझ्यासाठी । आणिली मी फुले ।
तुझी कळी खुले । ऐसे वाटे ।।११।।
दोघे मिळूनीया । गुंफू हार तुरे ।
जुईचे गजरे ।भाऊराया ।।१२।।
पुष्प अलंकार । शोभतील छान ।
भगिनी मीसान । विनविते ।। १३।।
का रे बोलसी ना । का रे खेळसी ना ।
तुजवीण कोणा । बोलावूं मी?।। १४।।
तू ही लक्षुमणा । मौन राहसी ना? ।
शोभते तुज ना । दीनबंधो ।।१५।।
कर धरूनीया । हालवूं का तूं ते ।
अव्हेरिसी मातें । काय करूं? ।।१६।।
सावळ्या मृदुल कोमल करां ते ।
राकट या हाते स्पर्शवेना ।। १७ ।।
खेळण्या मजसी वाटे ना का गोडी ।
हीन दीन वेडी म्हणुनीया ।।१८।।
जरी दिससी ना जरी बोलसी ना ।
तरी मी सोडी ना पाठ तुझी ।। १९ ।।

* * *

विश्वामित्राने मुलांना मागून घेतले त्यानंतर झालेली कौसल्येची मनोवस्था

**सखि, कुठे राम घननीळ?** (जाति उद्धव)

सखि, कुठे राम घननीळ । जो पाडि ग मजसि भुरळ ।।ध्रु.।।
सांगाती लक्ष्मण नेला । मुनिराज कौशिके दूर ।

सुकुमार ग बालक दोन्ही । लागे मनि अति हुरहुर।
त्या दिवसापासुनि बाई । राजांचा बदले नूर ।
मनि तर्क कुतर्का जागा । चिंतेत जीवही चूर ।
सखि काहि सुचेना माते
कधि बघेन गऽ, रामाते
कधि म्हणेल ग, तो 'माते'
अंतरि ग पडतो पीळ । सखि, कुठे राम घननीळ ।। १ ।।
सखि, दृष्टि जाईल जेथे । बाळाची वस्तुच दिसते।
त्याक्षणींच माझ्या हृदयी । दु:खाची लाट उसळते ।
ऐकण्यासि मंजुळ साद । मी चित्ती अति तळमळते ।
खेळणी पसरली नाना । बघुनी ग बुद्धी भ्रमते ।
सखि, राम परम संकोची
लक्ष्मणही नमुना तोचि
शुद्ध ना भूक - तहाने ची
यास्तव मम हृदि तळमळ । सखि कुठे राम घननीळ ।।२।।
सखि, कुशल कसे ना कळले? कोठे न आजवरि गेले ।
मुनि कौशिक परम कृपाळू । जाणुनि जरि धैर्या धरिले ।
मम बाळ परम सुकुमार । त्यायोगे मन हे चळले ।
वार्ता जरि अद्‌भुत पसरे । परि सत्य-असत्य न कळले ।
मम भरतासी बोलावा,
प्रेमाचा हृदि ओलावा,
एकरूप भावाभावा
निरखीत जाई तळमळ । सखि, कुठे राम घननीळ ।।३।।

* * *

## श्रीसीता विरह – सुनयना माता म्हणते,

सखि, सांग कुठे सीता मम सुकुमारी
मन व्याकुळ झाले भारी ।।
मम उर्मीला पोर भारि ग गोड
मम मना लाविले वेड ।।
हाताचा पालख करूनी
जीवन हे जल घालोनि
प्राणांसम जपले ना मी
त्या पतीसवे जाति सुखे सासरी । मन व्याकुळ झाले भारी ।।१।।
हा प्रासाद दिसतो आज उदास
प्रिय विरह जाणवे त्यास
वाटे हा सोडि उसासे
सेवक ही दिसति कसेसे
धनवित्त सर्व हरलेसे
सखि मिथिलेची शोभा सरली सारी, मन व्याकुळ झाले भारी ।।२।।
ह्या वृक्षलता बघता बघता सुकती
स्पर्शा प्रिय कोमल मुकती ।
वाराहि वाहि ना मंद
सीतेस शोधतो धुंद
गुंजति ना मधुर मिलिंद
कधि ऐकेन नुपूररव सुखकारी, मन व्याकुळ झाले भारी ।।३।।
सखि, व्याकुळती पंजरि राघू मैना
ये बघत दशा जल नयना
सोन्याचा घास न खाती
ढाळती अश्रु दिनराती

इच्छिती अयोध्ये का ती
निज पतीसवे जेथे कन्या चारी मन व्याकुळ झाले भारी ।।४।।
चिर जीवोत चारु जोडपी चारी, वाढो सुख भाग्य हि भारी,
श्यामल नि गोऱ्या जोडया
वर्णीतां उपमा थोड्या
आठविता होतो वेड्या
सखि पाठवू त्या मूळ ग सणावारी, मन व्याकुळ झाले भारी ।।५।।

* * *

## शबरी गीत

संपली निशा । उजळली दिशा ।
मजसि वाटते । रम्य ही उषा ।।१।।
विकसली फुले । विटपि खगकुले ।
गाति सुस्वरें । रामगुण भले ।।२।।
वायु मंद हा । गंध गोड हा
स्पर्शुनी मला । सुखवि तो पहा ।।३।।
कानि सांगतो । मधुर वृत्त तो
राम येति ग आस फुलवि तो ।।४।।
येति का कधी । झोपडी मधी
वाट पाहते झोप ना सुधी ।।५।।
मृदुल पाउलें । चालती कसे
कठिण मार्गही । चटकती जसे ।।६।।
झाडले जरी । शिंपिले तरी
चैन ना मना । दाह अंतरी ।।७।।
आणिली फुले । मधुर ही फळे
येति का कधी । राम सावळे ।।८।।

शीत मधुर हे । पाणि आणले
फिरूनी आणु का । तप्त जाहले ।।९।।
हीन दीन मी । येति ते कसे?
मार्गिदूरच्या । जाति का तसें।।
गुरुजी बोलले । खरच येति ते
शकुन सुचविती । वचन सत्य ते ।।
पतित पावना । आवरु किति मना
येई सत्वरी । पुरवि कामना ।।
कोण येतसे । दुरूनि ना कळे
या पथी कधी । रामपद वळे।।
खास तेच ते । वदुनि धावते ।
थबकुनी पुन्हा । नीट पाहते ।।
स्वप्न-जागृती । काहिं ना कळे
देहभाव ही । प्रेमिं त्या पळे ।।
ओठ कापती । शब्द नुमटती
पडत उठत ती । बंधु पाहती ।।
प्रेम देखुनी । राम लोचनी
अश्रु दाटले । धन्य भिल्लिणी ।।
पाय दृढ धरी । नमि परोपरी
सुफळ जन्म हा । हो खरोखरी ।।
अनुज राम ही । तोषले मनीं
शबरि देतसे । बोर विनवुनी ।।
वानुनी तया । रामराजया
उष्टि भक्षिली । केवढी दया ।।
शिकवुनी तिला । भक्ति वाढवी ।
मुक्ति देउनी । सुयश पसरवी ।।

* * *

चाल- **रघुनाथ साथे प्रीत बाँधी, होय तैसे होय रे- आद्याक्षरे पाहा**

**र** घुपति राघव राजाराम
**घु** मते कानी सुमधुर नाम
**ना** ना योनी विषय भोगून
**थ** कले रामा भ्रमून भ्रमून

**सा** र्थक केलेस नर देह देऊन
**थे** ट सद्गुरु भेटवून

**प्री** त तुझ्या पदी दिलीस जडून
**त** शीच रक्षिली सत्संग देऊन

**बाँ** धियली मी राखी तुला
**धी** र आला जगण्यास मला

**हो** शी मला तू साह्य सदा
**य** श मी गाईन, स्मरेन मुदा

**तै** से स्वामी तेजोमयानंद
**से** वत ना जरी मी मतिमंद

**हो** ऊ कशी मी उतराई
**य** त्ने मजला सावरती
**रे**शमी ग्रंथी बांधिली मी
(नमन नमन त्यांच्या पायी)

* * *

राम भैय्या ये रे जगजेठी
प्रेमे तुझ्या चरणी घालीन मिठी
स्वागत करीन मी तुझे
जीव प्राण अंथरिले माझे

चरणी तुझ्या स्थान मला देई ।
रामभैय्या ये रे जगजेठी ।।१।।

तिलक मी लावीन तुज छान
पाहता विसरो देहभान
औक्षण करीन प्रेमाने, आसनी बसवीन आदराने
छत्र तुझ्या मस्तकी मी धरीन, चामर तुजवरी ढाळीन
व्यजनाने घालीन वारा हरी, श्रम तुझे करीन मी दूरी
दर्पणी दावीन तुज रूप, तुझे रे दावीन तुज रूप
चार घास भरवीन तुजला रे, तांबूल देईन प्रेमभरे
हृदयाच्या बसवीन सिंहासनी, अंतर द्यावे न करुणाघनी ।।

* * *

राखी बांधिली तुजला । रामा सांभाळी मजला ।।
चुंबून हात धनुपाणी । जातसे भगिनी लोटांगणी ।।
कृपाहस्त मस्तकी ठेवा । करुणानिधान मम देवा ।।

* * *

**अभंग**

माझ्या रामासारखा दानी । जगी नाही दुसरा कोणी ।।
भक्तांचिया आर्तासाठी । धाव घेई जगजेठी ।
प्रेमभक्ती देई दान । करी सर्वस्व अर्पण ।
परी नाही त्याची जाण । विसरतो अवगुण ।।

* * *

अयोध्येचा रामराजा । झाला झाला बंधु माझा ।
मी तो पामर अति अज्ञ । गुरु लाभले अति तज्ञ ।
भक्ति मार्ग शिकविला । राम-सखा जोडियेला ।

'राखी बांधी तूं रामाला । नित्य स्मरावे ग त्याला ।
राम कदा उपेक्षिना । म्हणुनी दिले आश्वासना ।'
काव्य करूनी दिले हाती । म्हणुन प्रार्थी रामा आर्ती ।
सद्गुरु झाला पाठीराखा । राम माझा झाला सखा ।
धन्य धन्य हो जीवन । मनुष्य जन्म हा लाभून ।
नाही मजला कसली चिंता । गुरु राम असता त्राता ।
कोटि नमने त्यांचे चरणी । कमा जाई लोटांगणी ।।

* * *

**चाल- आरतीसारखी :** आईने दिली, मला शिदोरी
प्रेमऽभक्तीने बांधून गाठी ।
जन्मोजन्मीची झाली बेगमी
चिंता सरली आनंदितऽ मी ।।

**ओवी/अंजनगीत :** याचकासी अयाचित करता
वेद थकती, यशा वर्णिता ।
तेजोमयानंद स्वामी । सद्गुरुंचे रूप नामी ।
जपती पावलो पावली । करिती कृपेची साउली ।
रामा करिते मी प्रार्थना । आरोग्य द्यावे स्वामींना ।

* * *

## गजल- चाल- हा हिंद देश माझा

रामा तुला कशी मी आळवू मला कळेना ।
कशि रामनामी गोडी मज लागली कळेना ।।
गुरुंनी कृपा करोनी जे रामनाम दिधले
गोडी अवीट त्याची मजला किं वर्णवेना

स्वामी तेजोमयानंद कसे बोळले कळेना
आशिश, अमोघ दिधला ते ऋण ऊतरेना
वृत्तपत्र, दूरदर्शन, आवडे अता मनाना
प्रतिक्षण वर्धमान प्रभु प्रेम आवरेना ।।
आनंद वाढतसे हृदिं काहिही स्मरेना
मी कोण आहे कोठे हे मजसि आकळे ना ।।
सामर्थ्य नामि नसते तर आश्रय दुजा ना
ते उद्धरी दीना ते प्रभुचीच ही कृपा ना?

* * *

## चौपाई

प्रभूकृपे गुरु राम भेटले । मानव जीवन सार्थ जाहले ।।
शक्तिपात करुनी सुख दिधले । रामनाम अति मधुर लाभले ।।
प्रेमभक्तिचे वरदान दिले । चरण आपुले गहाण ठेविले ।
मानसि मजला न्हाउ घातले । अनवरतकृपा करत राहिले ।
नमन चि करता न-मन जाहले । त्यांच्या चरणी जीवन वाहिले ।।

* * *

## तोटक छंद

हे राम मला दे प्रेम तुझे
निरपेक्ष आणि अति शुद्ध असे
निर्मल करी तू रे मन माझे
जणु गंगेचे शुचि जल जैसे ।।
विश्वास मला की दृढ ऐसा
तूं असिस सदा मम समिप हरी
ठेवोनी मम शिरिं करकमला
मम जीवन रामा सार्थ करी ।।

सर्वत्र तुला रे पाहोनी
सेवावे सर्वा मनि वाटे
कनवाळु स्वभाव तुझा रामा
आठविता प्रेम किं हृदि दाटे ।।
त्रिभुवननायक तूं असरि जरी
तरि बंधु तुला मी मानतसे
मम धृष्टताहि तूं क्षमा करी
अन् आलिंगी मज हृदयिं, कसे?

* * *

## सवाल

(गजल- चाल - भगवान मेरी नैया ..)

रामा मला अजूनी हृदयी का धरिसी ना तूं?
मज दूर ठेवण्यात सांग तुझा काय हेतू?
जे रूचते तुला प्रभो रे, करी मोकळेपणाने
पण मी न तुला सोडी गुण गाईन आवडीने ।
जाशील सांग कोठे सोडून तू मला रे
हे विश्वव्यापका ते कैसे जमे तुला रे?

* * *

## आर्त विनवणी (भावगीत)

रामा, अंत नको पाहूं ।।ध्रु.।।
फार काळ मी जगले तुजविण
आड येतसे माझे मीपण
अनुतापे जळते रे मम मन ।
उशिर नको लावूं ।। १।।

आठविते रे तुजसी क्षणक्षण
विरहें जळते हृदयहि कणकण
विषयासक्ती सुटे न तरि पण
तुझे गुणा गाऊं ।।२।।
देही आले अता वृद्धपण
दमले मी रे फिरूनी वणवण ।
नामाचा आधारचि घेउन
सदा तुला आळवू – आता सत्वर ये भाऊ ।।३।।

* * *

अनंत कोटी ब्रह्मांडनायक, तोच माझा सखा
बांधिली राखी त्या जिवलगा ।।
राम चरणी जीवन हे वाहिले
त्याला बंधु म्हणुन बाहिले ।
वदा मग काय उणिव हो सुखा
जाहला माझा पाठीराखा ।।१।।
कसा तो अंतर देईल मला?
कमिपणा येईल ना त्याला
ब्रीद तो पाळिल अपुले नीका
कृपा तो करिल सुग्रिवसखा ।। २।।
बंधन हेच प्रेमाचे, दांभिक असेल जरि साचे
वदते वारंवार वाचे भगिनीची लाज तुम्हि राखा
भरंवसा मम हृदयी चोखा ।।३।।

* * *

## अभंग

रामा प्रार्थिते मी तुजला । आरोग्य द्यावे स्वामीला ।
दुःख त्यांचे मज द्यावे । त्यांना सदैव सांभाळावे ।
त्यांचेकडुनी घ्यावी सेवा । मागणे हे देव देवा ।
सेवकांचा कल्पतरू तूं । असशी तशाच कामधेनु तूं ।।
प्रार्थना माझी ऐकावी । आळी माझी पुरवावी ।।

## भैरवी

स्वामी होऊं कशी उतराई? (दोनदा) ।।ध्रु.।।
रामे पूर्ण कृपा केली । तेव्हा भेट (आपुली) मला झाली ।
सद्गुरु रूपे कृपा केली । कृपेला त्या सीमा नाही ।।
अवगुण माझे मनी न आणा ।
वाखाणीता अल्प गुणांना ।
विषयासक्ती दूर सारली । प्रभुप्रेमाची देणगी दिधली ।।
होऊ कशी उतराई ।। स्वामी होऊ .....
नानापरिने मज शिकविता
चुकले मी जरि, रोष न करता
प्रेमे हृदयाशी तुम्ही धरितां
कृतज्ञता मी वर्णू कायी?
होऊ कशी उतराई? स्वामी होऊ ....
तुमच्या कृपे उणें न मोदा
नाम प्रेमे भरती प्रमोदा ।
दर्शन आतुर मीहि सर्वदा ।
कधिं मजला भेटशील आई? स्वामी होऊ ...।।

* * *

पहिली माझी ओवी । नमन सद्गुरु ।
सारे चराचरु । ज्याचे रूप ।।१।।

दुसरी माझी ओवी । नमन गुरूजींना ।
स्वामी तेजोमयानंदजींना । नमिते मी ।।२।।

तिसरी माझी ओवी । नमन माझे तुला ।
ठाव द्यावा पदी मला । रामभैय्या ।।३।।

जानकी वहिनी माझी । कोमल चंपकगौर ।
मज आवडते फार । कृपामूर्ती ।।४।।

लक्ष्मण भैय्या माझा । पुतळा वैराग्याचा ।
वर्णनी त्याच्या वाचा । पांगुळते ।।५।।

चंचरीक चंपक बागे । तसे ज्याचे मन मागे ।
वळून विषयांकडे । पाहीच ना ।।६।।

असा रामप्रेम मूर्ती । भरत भैय्या प्रिय अती ।
त्याच्यासम माझी मती । रामपदी लुब्ध व्हावी ।।७।।

अहंकार शत्रू घोर । ज्याने जिंकिला तो थोर ।
शत्रुघ्न भैय्या वीर । नमिते मी ।।८।।

रामदूता हनुमंता । तुझ्या चरणी ठेवून माथा ।
नमिते मी, देई हाता । संकटात साह्य करी ।।९।।

* * *

# स्फुट भाव कविता (विराण्या)

॥ श्री ॥

॥ श्री सद्‌गुरू प्रसन्न ॥

॥ राम ॥

**हे रामराया,**

मज जाणवते सतत संगती असशी
परि रामा का नाही दिसशी? ॥ ध्रु.॥
श्री गुरुकृपे नाद ऐकु तव येतो
बघण्यासि जीव आसुसतो ॥
या निळ्या नभी जलद धावतो जेव्हां
तुझि मधुर स्मृती, वेड लावते तेव्हां ॥ १॥
मन व्याकुळते नेत्री आंसू झरती
समजावत मी दिनराती ॥ २॥
मनि खळबळ जी सांगू शकेना मी ती
वदण्या ना शब्दहि पुरती ॥३॥
प्रिय रामा रे, तुझी आठवण येते
तत्क्षणि मम मन व्याकुळते ॥ ४॥
त्याक्षणी सख्या काही न मजसी रुचते
सैरभैर मन हे होते ॥ ५॥
ना घरची ना दारचि रे मी रहाते
कळते परि मज ना वळते ॥ ६॥

प्रिय राम सख्या, तुजविण करमत नाही
कधि भेट देसि कीं नाही? ।। ७।।

* * *

**हे रामराया,**

भाऊ रामराया । विनविते पायां
त्रिभुवन राया । दया करी ।।१।।

सखा जिवलग । बंधू तूंचि माझा
उदार तू राजा । रघुवंशी ।।२।।

आज वाटे मज । गूज सांगू तुज
बहिणीची बूज । राखी देवा ।।३।।

मज अनाथासी । तू एक आधार
ना तो निराधार । जगी मी रे ।।४।।

कीर्ती ऐकोनीया । धरियेला भाव
तुझे पायी ठाव । द्यावा देवा ।। ५।।

पतित पावन । परिसोनी कानी
रामा मी रे मनी । नातें जोडी ।।६।।

असोनी जवळी । ठेवियेले दूरी
क्षमा माझे करी । अपराध ।। ७।।

तुझे अमृताचे ऐकावया बोल
आशा मी रे फोल । धरियेली ।।८।।

कधी रे पाहीन । रूप ते साजिरे
कधी शुभ गिरे (वाणी) । ऐकविसी ।।९।।

जरी दिससी ना, जरी बोलसी ना
तुझेचि चरणां । स्मरेन मी ।। १०।।

हांक मारोनिया । तुलाच रे रामा
माझे मन:कामा । वंदेन की ।।११।।

पसरी पदर विनविते फार
मजसी आधार । द्यावा रामा ।। १२।।
आवडी नामाची । द्यावी मज देवा
घडो जनसेवा । प्रेमभरे ।।१३।।
गुरुकृपा पूर्ण । लाभो निरंतर
मजसी अंतर । देऊ नको ।। १४।।

* * *

(चाल – भूपतिवैभव)

**हे रामराया,**

तुझी वाट पाहुनी थकले मी रे रामा
कां भेटसि ना मज सांग सांग घनश्यामा ।।ध्रु.।।
जरि आहे मी रे अवगुणांची राशी
भगिनी जरि म्हणवी, तव चरणांची दासी ।।
परि दास्य न जमते काय करूं वद मजसी
अति अपात्र जाणुन प्रभु का तूं मज त्यजसी ।।
मज मुळिंच नाकळे वश तू कैसा होसी?
आपली मज म्हणुनी जवळ कधी रे करसी?
रघुवंशभूषणा, जशि मी आहे तैसी
चरणी तव शरण, ऽ नको उपेक्षू मजसी ।।
प्रभु मज ना कळते, तुला कसे प्रार्थावे?
ज्यायोगे त्वरितचि चित्त तुझे द्रवावे ।।
मनमोहन रामा फक्त एकदा ये ना
तुझि दिव्य तनू मज एकदाच दाखव ना ।।

* * *

## मुक्तक – रचना

राम सीता राम सीता गाऊ आनंदभरे
हृदयी त्या पूजोनी, डोलू या प्रेमभरे ।
सुंदर गुण गाताना रंगू या भावबळे
शरण जाऊं, चरण धरू आळविता राम बळें ।।

सावळ्या, श्री सीतारमणा
दीनाची कशि येई न करूणा ।
ब्रीद राखि रे दीनोद्धरणा
सत्वर दावी, अपुल्या चरणा ।।

राजाराम करा निष्काम
प्रेमे सेवू सदा तव नाम ।
प्रेमे गाऊ पावन नाम
लाभे खास परम विश्राम ।।

**(पद) सखे, साजणी, बंधू माझा कोसलपति भगवान्**

आवडे रघुनायक गुणगान ।।ध्रु।।
कीर्ति ऐकली उदंड त्याची
मला नावरे धाव मनाची, धांव घेऊनि तत्पदकमली
घाली रूंजी भृंगसमान ।।

* * *

## (पद) विनवणी

माझ्या रामाला कुणी तरी बोलवा हो
माझ्या रामाला कुणी तरी भेटवा हो ।।ध्रु।।

वेड्या बहिणीचा निरोप तरी कळवा हो
नाग–चौथीला मूळ तरी धाडा हो ।।१।।

ना तर पुनवेला पायधूळ झाडा हो
भेटीसाठी जाहला जीव माझा वेडा हो ।।२।।
माझ्या रामाला कुणीतरी भेटवा हो
हनुमंता, नमन तुमच्या चरणा हो
स्कंधि वाहून प्रभुला तुम्ही आणा हो ।
पतित पावन प्रभूचा माझ्या बाणा हो
मनि ठसला हे नीट तुम्ही जाणा हो ।।३।।
माझ्या रामाला कुणीतरी भेटवा हो
तुम्हांविना न प्रभु येती केव्हा हो
यावी यावी तुम्हांसी माझी करुणा हो ।
लागेल बट्टा ब्रीदासी जगि जाणा हो
उणेपणा न येवो माझ्या रामा हो ।।४।।
माझ्या रामाला कुणीतरी भेटवा हो

* * *

पहिली माझी ओवी, नमन सद्‌गुरु
सारे चरा चरु । ज्याचे रूप ।।
दुसरी माझी ओवी । लक्षुमण रामा ।
प्रेमे सीता रामा । नमीतसे ।।
तिसरी माझी ओवी । गोस्वामी तुलसी ।
ज्यांनी मानसासी । रचियेले ।।
निर्मिली पाणपोई । राम भक्तिरस ।
अत्यंत सुरस । प्या हो सारे ।।
काय सांगू गोडी । सेवूनिया वेडी ।
तुटोनिया बेडी । झाले ना मी ।।
नसे ही अत्युक्ती । सांगते स्वानुभव ।
तरीन खास भव । जाणवते ।।

हनुमंत माझा सखा । सदा असतो पाठीराखा ।
उपकारी त्यासारखा । नसे कोणी ।।

पूज्य तेजोमयानंद । स्वामींनी करुनी गान ।
संपूर्ण रामायण । दिले मज ।।

श्रवणी परमानंद । ध्यात रघुनंद ।
सेविते प्रेमानंद । अखंडित ।।

उपकार त्यांचे । नाही फिटायचे ।।
वर्णू कसे वाचे । नमन त्यांना ।।

* * *

**बालरूपाची शोभा** (गीतावलीत पदांचा अनुवाद)

(चाल – भूपाळी सारखी)

अवधेशाच्या द्वारी सकाळी सहज मी डोकावले ।
प्रिय पुत्राला घेउनि राजे बाहेरी आले ।।
बघुनी शोकविमोचन बालक स्तंभित मी झाले ।
ज्याचे मन सखि हरण न होई त्यां मी धिक्कारिले ।।
खंजन पक्षि पिला सम डोळे काजळि ग माखले ।
तुलसीचे मन रंजन करिती मीही वेडावले ।।
सखे वाटले, शुभ शशिमध्ये नील कमल उगवले ।
ताजे हसरे कमल द्वय ते मला बघुन विकसले ।।

* * *

पायी नुपूर करकमलांवर सुंदर पोची हार रत्नांचा छान गळ्यात
नव नील कमल सम तनु शोभते त्यावरी झबले पीत ।
सखि पुलकित दशरथ तात ।
पाहुनि साजिरे रूपकमल मम नयन भृंग भुलतात ।
आनंदी बुडी घेतात ।।

मनि अशा बालके वस्ति न केली जन्मुनि काय जगात।
सखि तुलसिदास पुसतात ।।

* * *

श्याम सरोज समान सावळ्या तनुची शोभा भासे
नयन हरती कमलाच्या शोभे सखि सौंदर्य प्रभेने
अति सुंदर सुकुमार तनु ही धूलि धूसर असली
तरी मदन महतीला ठाव उरेना, सखि, विलक्षण कसली
छोटे छोटे दांत चिमुकले चमके वीज नभांत
आणि गोड लकेरी हास्याच्या त्या बालविनोद भरात
अवधेशाचे चारी पुत्र हे दशरथ प्राणाधार
तुलसी मन मंदिरी सदा विहरिती, वर्णू किती अपार?

* * *

## बाललीला

कधि हट्ट घेतसे चंद्रासाठी
कधि बावरतो बिंबा बघुनी ।
कधि करटाळी वाजवुनीया,
नृत्य करुनि मातांना रिझवी ।
ज्यासाठी हट तेच घेउनी राही उगि तो बालहरी
अवधेशाचे चारी पुत्र प्रिय विहरति गृहि लीला न्यारी
तुलसी मनमंदिरी विहरति, सदानित्य नवभाव परी ।

* * *

## बाल – राम – वर्णन

सुरेख किती सावळा, सखे ग राम हा सुरेख किति सांवळा
तनुवरी पीत हा झगा

बोलावि चिमुकल्या खगा ।
किती लावितसे ग लळा ॥१॥ राम हा सुरेख...
हे बालक चार ही कसे,
धन लोभ्या प्रिय धन तसे,
प्रियपित्यासि परि आगळा॥२॥ राम हा सुरेख...
धावतो दुड्डदुड्ड कसा
हा चपळ निळा ग ससा
बघ कसा ओढि जावळा ॥३॥ राम हा सुरेख..
प्रतिबिंब अंगणी पडे
त्या बघुनि भरवि तो गडे
जवं खाइ न काढी गळा ॥४॥ राम हा सुरेख..
लक्ष्मण नि राम खेळती
रिपुघ्न भरत शोभती
लिंबलोण उतर वेळोवेळां ॥५॥ राम हा सुरेख..
पायि पैंजण मृदु बोलती
कानांत डूल डोलती
शोभते वाघनख गळां ॥ ६॥ राम हा सुरेख..
मित्रांत दंग होतसे
बोलावुं परि न येतसे
येइ ना सोडुनि खेळा ॥७॥ राम हा सुरेख..
खुदखुदू कसा हासतो
कानात गोष्ट सांगतो
मिठि धावत घाली गळा ॥८॥ सखे ग..
बोबडे बोल ऐकुनी
हर्ष ना मावतो मनीं
ये नेत्री भरूं काजळा ॥ ९॥ सखे ग...

हा तिलक शोभतो किती
बघ पळतो अवखळ अती
जमवीला बालक मेळा ।।१०।। सखे ग..

* * *

## **का वेळ लाविसी वाया?** (जाति फुलवेल)

भाऊराया का वेळ लाविसी वांया ।।धृ।।
कृपामेघ बा असिसि सावळा
तूं अवतरसी कृष्ण गोकुळा
भक्तांसव कृत नाना लीला
भुलवि न वांया । मजसाठी ये रघुराया ।।१।।
हीन दीन मी असे म्हणुनि कां
कंटाळसि मज जगद्व्यापका ।
रामा, लोटसि दूर दूर का
शिणली काया । मजसाठी ये रघुराया ।।२।।
पतित अहिल्या तुम्हि उद्धरिली
कृपा सागरा, कृपा आटली
भगिनी म्हणवुनी धिटाइ केली
रूचलि न राया । मजसाठी ये रघुराया ।।३।।
दीनानाथ तूं अंतर्यामी
तुजजवळी कशि करूं कपटा मी,
प्रेम सतत दे तुझ्याच नामीं
विनवूं पाया । मजसाठी ये रघुराया ।।४।।
सदा सर्वदा असिसि मजसवे
तुझी कृपा मी सतत अनुभवे
लळे पुरविले नित्य नवनवे

किती ही माया । मजसाठी ये रघुराया ।।५।।
का न पुरविसी हाहि मम लळा ।
बघूं इच्छिते बंधु सावळा ।
भेट भेट रे, घाल कर गळा ।
धांव घे राया, मजसाठी ये रघुराया ।।६।।

* * *

## बाल सीतेस पाहून

चिमुकली छकुली कशि धावते
नट्टुनिया चिमणी कशि शोभते
परकरा हिरव्या धरि हातिं ते
झडकरी कशि त्या वरि खोविते ।।१।।
शिवधनू करि ते सहजी धरे
उचलिती जरि वीर न जे सरे
करूनि त्या निज अश्व कशी पळे
चपल की चमके चपला बळे ।।२ ।।
कुमरि ही सखये स्थळि ज्या पडे
विभव भाग्य खरोखरि ऊघडे
सखि कसा हिजला वर सापडे
सरस जो समरी वरी तो गडे ।।३ ।।
सहज जो उचली शिवचाप हे
निजबळें मिळवी, सखि रत्न हे
बघुनिया मनि गे मुद दाटतो
झडकरी पुरवो प्रभु आस तो ।।४ ।।

* * *

## तीच घटना/मनोराज्य कविता

(जरा वेगळ्या रीतीने)

प्रेमे लगबग । भेटण्या मेहुण्याला । नुरला अवसर औक्षणाला ।।
काय सांगू बाई । अवचित आला । सामोरी रामाला । गेलो नाही ।।
या रे सारे घ्यारे । बैसोनी आसनी । श्रम हरावया गूळपाणी ।।
रामा लक्षुमणा, बसा रे जोडीने । बघू रे गोडीने । बंधू द्वय ।।
भरत शत्रुघ्ना । गूळ पाणी घ्याना । बघूनी जोड्यांना, हारखले ।।
लोटांगण चरणी । घालू दे शारंग पाणी । कृपामृत वाणी । श्रवणी पडो ।।
चिठी माहेराची, ऐकता हुरहुर । आज वाहे प्रेमपूर । भाऊराया ।
टिपा श्रमबिंदू । कोमल कृपासिंधू । पाहोनी मुखचंदू । मग्न मन ।।
घालुनिया वारा । माझी या प्रियकरा । भवश्रम हरा । लागबेगी ।
चालू दे बातचीत । मेहुण्यामेहुण्यांची । कामाची लगबग । मज साची ।।
पाकाचे चिरोटे । आवडती रामराया । अनरसे करावया । वेळ नसे ।।
करुनी लगबग । घेऊ या पाटपाणी । क्षुधेने शारंगपाणी । व्याकुळला ।।
अयोध्येत तुम्हां । सुवर्णाचे ताट । रत्नजडित पाट । माता ठेवी ।।
मान बरे गोड । दीनेचे साधेसुधे । जैशी गणली बोरे । शबरीची ।।
स्वस्थ चित्ते जेवा । संकोच सोडुनी । अधिक वदवेना । रुद्ध झाली वाणी ।।
म्हणा भाचरांनो । सुश्लोक पंगतीत । भाग्ये लाभे मामा । रघुनाथ ।।
आचवुनि विडे घेई । तृप्तीची ढेकर देई । प्रज्ञाईची कृपा काई । बोलवेना।।

* * *

## ओव्या (मनोराज्य)

अयोध्येत तुम्हा सुवर्णाचे ताट ।
रत्नजडित, पाट माता ठेवी ।।
स्वस्थ चित्ते जेवा, संकोच सोडुनी ।
अधिक वदवेना, प्रेमे रुद्ध झाली वाणी ।।

म्हणा रे भाचरांनो, सुश्लोक पंगतीत ।
भाग्ये लाधे तुम्हां मामा हा अतीत ।।
आंचवुनी विडे घेई । तृप्तीची ढेकर देई ।
प्रज्ञाईची कृपा काई, बोलवेना ।।
अत्तर गुलाब । लेवविले शेले हार ।
हाती देती गुच्छ चार । मेहुण्यांच्या ।।
कमा बांधी राखी । म्हणे बंधु पाठ राखी ।
चार दिन राहुनि जा कीं । अयोध्येसी ।
बंधु चवघे हसती । कृपामृत वर्षती ।
स्नेहे भिजविती उभयांसी ।।
उभय वंदिती । आशीर्वच घेती ।
मोदे विसरती । देहभान ।।

* * *

## मनोराज्य (राखी पौर्णिमा)

### ओव्या

भाऊराया माझा, माझ्या दारी आला ।
शब्द प्रज्ञाईचा, राखायाला ।।
भाऊराया माझा माझ्या दारी आला ।
विषय कौतुकाला प्रज्ञाई ला ।।
भाऊराया माझा, माझ्या दारी आला
प्रज्ञाई रोख त्याला, औक्षणाला ।।
भाऊराया माझा अयोध्येचा स्वामी
कृपे प्रज्ञाईचा अनुगामी ।।
काय सांगू बाई, अवचीत आला
सामोरी गेलो नाही, कौसल्या तनयाला ।।

* * *

या रे या रे सारे । बैसा रे आसनी ।
श्रम हरावया । आणते गूळ पाणी ।
    रामा लर्क्षमणा, बसा रे जोडीने ।
    भरत शत्रुघ्ना बघू एकदा गोडीने ।
वंदन करते पाया । पुसते कुशलासी ।
शांतावाया भगिनीसी । बोल बोला।
    चिठ्ठी माहेराची ऐकतां हुरहुर वाटे ।
    आज तो भाऊराया । पाहता प्रेम दाटे।।
प्यारे घोटभर । सुगंधी थंडपाणी ।
टिपा श्रमबिंदू आराम वाटे झणी ।
    पंख्याने घालू वारा । हरिश्रमहरा ।
    कष्ट आजी झाले फार । जानकीच्या प्रियकरा ।
चालू दे बातचीत । मेहुण्या मेहुण्यांची ।
कामाची लगबग, गर्दी झाली पाहुण्यांची ।।
    पाकाचे चिरोटे । आवडती भाऊराया ।
    आज नये अवसर, अनरसे करावया ।।
करूं या लगबग । घेऊ या पाटपाणी ।
क्षुधेने व्याकूळ । झाला वाटे धनूपाणी ।।

* * *

**।। श्री सद्गुरु प्रसन्न ।।**

हरिचिंतन, प्रभुचिंतन अविरत करि हेच ध्येय
हरिचिंतन, गुरुचिंतन अविरत करि हेच ध्येय ।।
    तूंचि राम तूंचि कृष्ण, वृक्षवेलि तूंचि पूर्ण
    प्राणिमात्र जगत सर्व तूंचि एक गुरु सुवर्ण ।।
अलंकार विविध जरी मूल तत्त्व हरि सुपूर्ण

नाहिं अन्य वस्तु जगी, ध्यान देई होशी पूर्ण ।।
हरिचिंतन, प्रभुचिंतन अविरत करि हेंच ध्येय ।।

* * *

## साकेत नावाच्या वास्तूचे उद्‌घाटन करिताना - आवाहन

श्रीगणराया श्रीगुरुराया साकेतीं या वसतिस या
सुंदर धामचि हे रामाचे भूषविण्या त्या सत्वर या ।।
आध्यात्मिक आणि ऐहिक लाभा, कुटुंबियांना देण्या या
साक्षात् शिव तुम्हि सुमति देउनी कृतार्थ करण्या सत्वर या ।।
कमा विनविते प्रज्ञानासी चरणीं प्रेमा देण्या या
प्रज्ञानाविण वस्तु नसे जगिं बिंबविण्या हे सत्वर या ।।
बिंबविण्या हे झडकारि या ।।

* * *

## आळवणी

हे राम सख्या रे -
हे राम सख्या रे तुझी आठवण येते
कानांत माझिया कोण सतत गुणगुणते ।।१।।
तुझि अनंत नामें मधुर स्वरें कुणिं गाते
ती श्रवणीं पडतां मन माझे मोहरते ।।२।।
निर्हेतूक गुरुची कृपाच ही हे कळते
अन् कृतज्ञतेने मन माझें गहिवरते ।।३।।
त्या प्रेमानंदे देहभान हारपते
नयनांतून झरती अश्रू ते हि न कळते ।।४।।
हे राम सख्यारे - तुझी आठवण येते ।।

* * *

## निर्धार

जरी कर्मवश नरकी जाऊं । रामा कीर्ती तुझीच गाऊं ।।ध्रु।।
सदा चुकतसे, करू जे कर्म
न कळे मजला माझा धर्म
मुळिंच ना कळे भक्ती वर्म, फक्त पुकारूं भाऊ भाऊ ।।१।।रामा
विषयीं ममता जरी सुटेना
नेम धर्म लव काहि घडेना
तव पदिं शुद्ध हि भाव असेना
सदा गोडवे तुझेच गाऊं ।।२।।रामा
हृदयीं भीती मांडी ठाणा
षड्रिपु नेती नरकी नाना ।
परदुःखाने हृदय हलेना, असे असूं तरि तुलाच अळवूं ।।३।।रामा
ना तत्पर पति – गुरुसेवेसी
ना दृढ श्रद्धा ना विश्वासी
प्रीति देहिं अति वश मोहासी
भगिनी म्हणविता मुळी न लाजूं ।।४।।रामा
अंगी दुर्गुण अनेक भरले
'वा रे भगिनी' सगळे वदले
रामा मजला लोकहि हसले
राखी तरि रे तुलाच बांधू ।।५।।रामा
तुला बांधिली राखी आज
राखीची बा, तुलाच लाज
नाही उरले मजला काज
मज न कमीपणा तुलाच भाऊ ।।६।।रामा
जरि लक्ष्मण हो क्रुद्ध मजवरी

सोडूं इच्छी तीव्र शर तरी,
मी नात्या तें उरी दृढ धरी
सुचेन मजला आन उपावू ।।७।।रामा

* * *

## सारेच चोर

मला भासती हे जगीं चोर सारे, गुणां चोरिती हे तुझ्या राघवां रे ।
तुझी पृथ्विला लाभते बा क्षमा रे, जला लाधते आर्द्रता ही कृपा रे ।।१।।
जगा भानु तेजें तुझ्या हर्षवीतो, शशी शांतता घेउनी सौख्य देतो ।
समीरा तुझी बा रुचे क्रीडशैली, तुझे स्थैर्य धैर्या विलोकूं कि शैलीं ।।२।।
नभासि ही व्यापकता अनंता, मिळे दया साधुसि भाग्यवंता ।
गंगा प्रवाही शुचितेसि थारा, गंभीरता सागर घे उदारा ।।३।।
पिकासि लाभे मृदुभाषिता ही, तत्वज्ञाना वेद सुखें स्विकारी ।
निष्पाप बालां मृदु मंजु हास्य, भक्तांसि लाभे तव गोड दास्य ।।४।।
संकोच शोभे सतीच्या ठिकाणी, वसुंधरा ही गुण रत्न खाणी
प्रभो मिळे कोमलता हि पुष्पां, म्हणोनी त्याचे ह्रदिं गर्दि बाप्पा ।।५।।
वसंत घे मोहकता तुझी बा, संतांसि देसी उपकारिताबा
विरक्ति योगी तव वांछिताती, धर्मज्ञ सत्यव्रत आचरीती ।।६।
कित्येक रामा, गुण राहिले रे, तुझे गुणां कोण वर्णी पुरे रे ।
जसे तुझे हे गुण, दोष एकू, तुलाहि आम्ही चित चोर लेखूं ।।७।।
– हरि ॐ तत्सत् । ।

* * *

## (ओव्या) खंडाळ्याचा घाट

खंडाळ्याचा घाट । रामाच्या घरची वाट ।
डोंगराच्या ओळी दाट । भीती वाटे ।।१।।

खंडाळ्याचा घाट । अवघड किती वाट
ठायि ठायि धुकें दाट । अज्ञानाचे ।।२।।
खंडाळ्याचा घाट । रामकृपेची मोटार
कनवाळू गुरु फार । चालविती ।।३।।
खंडाळ्याचा घाट ।घरचाची चालविता
उरली ना भय - चिंता । प्रवाशांना ।।४।।
खंडाळ्याचा घाट । ज्ञान - विराग दीप हे ।
धुक्यामाजीं दिसताहे । मार्ग स्पष्ट ।।५।।
खंडाळ्याचा घाट । अडथळे मार्गी येती ।
गाडी सांभाळुनी नेती । गुरूराव ।।६।।
खंडाळ्याचा घाट । शोभा तेथील अपार ।
बघुनीया मनीं फार मोद दाटे ।।७।।
खंडाळ्याचा घाट । किती उंचउंच कडे ।
जणुं षड्रिपु हे खडे । भिवविती ।।८।।
खंडाळ्याचा घाट । त्याची बिकट वळणे ।
गुरुकृपे सुलभपणे । पार जाऊं ।।९।।
खंडाळ्याचा घाट । झाडी ही हिरवी गर्द ।
तेथे हवा भासे सर्द । प्रभुप्रेमें ।।१०।।
खंडाळ्याचा घाट । सान धबधबे जेथे ।
संतकृपा वर्षे तेथे । खरोखरी ।।११।।
खंडाळ्याचा घाट । स्वयें कष्टुनी अनंत
सुख लोकां देती संत । ऐसे वाटे ।।१२।।
खंडाळ्याचा घाट । उसळती जलधारा ।
त्यांची किर्ती की अपारा । शोभतसे ।।१३।।
खंडाळ्याचा घाट । गंभीर वाहन नाद ।।
भजनी हों घालूं साद । राम राया ।।१४।।

खंडाळ्याचा घाट । पृथ्वी दे हिरवा चारा ।
देति दु:खितासी थारा । संत जैसे ।।१५।।

खंडाळ्याचा घाट । वृक्षवेली बहरल्या
प्रभुकृपे डवरल्या । संत शारवा ।।१६।।

खंडाळ्याचा घाट । बरी छप्परे हिरवी ।
माया वैभव मिरवी ।। नश्वर जे ।।१७।।

खंडाळ्याचा घाट ।सुखें गोधने चरती ।
भक्तिलाभे सुखशांती । इंद्रियांना ।।१८।।

खंडाळ्याचा घाट । गुराखी गुरे वळी ।
गोपाळ भक्तां पाळी । प्रेमभरें ।।१९।।

खंडाळ्याचा घाट । सुखें जाऊं झणीं पार ।
ऐकूं प्रभुगुणसार । गुरुमुखें ।।२०।।

खंडाळ्याचा घाट । सुखें जाऊं पार झणीं ।
प्रभुगुण कोण गणीं । पूर्णरूपें ।।२१।।

* * *

## भजन धुन

१) श्री गणेश जय गणेश स्मरणिं नाश पातकां
हरूनि विघ्न करित मग्न नामिं सदा साधकां ।।

२) राम सीता राम सीता गाऊ आनंद भरे
हृदयीं त्या पूजोनी डोलूं या प्रेमभरे ।।
सुंदर गुण गातांना रंगू या भावबळें
शरण जाऊं चरण धरूं प्रार्थिताहि राम वळे ।

* * *

## (कीर्तनोपयोगी गीत)

रामा, (राजा) युवराज तूं होणार, आज रे राजा तूं होणार ।
पारणें नेत्रांचे फिटणार, रामा राजा तूं होणार
राज गादीवर तुल स्थापूनी तिलक अम्ही करणार ।। रामा
राजगादि नच मृदुल परांची, शरांचीच असणार
रत्नजडित मुकुट ना सोनेरी काटेरी असणार ।। रामा, राजा तू होणार
प्रजानुरंजन कर्तव्य तुझे इथून पुढे असणार
स्वार्थ आणि परिवार आदिना स्थान नाहिं उरणार ।।
श्रेष्ठ अशा रघुराज कुलाची
परंपरा रे ही त्यागाची, भोग तुच्छ ठरणार ।।रामा, राजा तू होणार
प्रजा तुला रे प्राणप्रिय अन् संतति सम होणार ।
पिता होउनी प्रजाजनांना प्राणपणें जपणार तूं रे ।।
वाण सतीचे तडीस नेण्या ईश शक्ति देणार, तुला रे ...
म्हणे कमा, गुरुवसिष्ठ सांगती रामराज्य होणार, रामा

* * *

( आपल्या कवितेसोबत आत्मनिवेदन)

१. कल्पनेची ना भरारी नाही शब्दांचा फुलोरा
काव्यरीती मज कळेना, मिरवूं मी का उगिच तोरा
बोलके हे मौन माझे, तुजविणा कोणा कळेना
मजसि ठावें मी तुझी हे, परि मना शांती मिळेना ।।

२. झरती आंसू याचसाठी, तू मला अपुली म्हणावे ।
हे दयाळा, तुजविना मी, शरण कोणां सांग जावे?

३. नाथ तुमच्या दारी आले याचना करण्या कृपेची
नाहिं कोणासी मनाई पाणपोई अमृताची ।।१।।
मज करावे आपुल्यासम, शक्य तुम्हां सहज हे हो ।
भाव सर्वांभूती माझा, हरि असा दृढ तो करा हो ।।

(प्रार्थना)

४. ये राघव, ये लक्ष्मण राम ।
ये शत्रुघ्ना, भरता श्याम ।
दुडदुड धावत ये घनश्याम ।
पुनित करण्या माझे धाम ।
ब्रीद राखण्या ये रे राम
राखि बांधिते ये रे राम ।।

* * *

।। श्रीसद्‌गुरू प्रसन्न।।

।। राम ।।

जानकीनाथ मनोरथ माझे तुजविण कोणा ठावे?
माय पिता तूं सखा बंधु मम तव अंकी पहुडावे ।।
कर कमला तव धरूनी हातीं, प्रेमें तुज न्यहाळावे
रूपामृत - पानासी करोनी, घे जवळीं आळवावे ।।१।।
वहिनीचा ही हात धरोनी, तिजसी ही प्रार्थावे
नको उपेक्षूं भाऊ मजला (साकेती)माहेरी मज न्यावे ।।२।।
स्वामिजी द्यावे आशीर्वादा मनोरथा प्रभुनी पुरवावे
देहांत समयीं धाव घेऊन ब्रीद त्यांनी राखावे ।।३।।

* * *

## भाकरी

समजा दाणे शाळूचे या वृत्ति बुद्धिच्या विविध जणूं
सुमति चाळणी घेउनि काढू दाणे किडके जीव कणू ।।१।।
कचरा टरफल नीट पाखडूं सूप विवेकाचे करूनी
नजर सुबुद्धी नीट योजुनी खडे वेचुं या तमोगुणी ।।२।।
जातें अभ्यासाचे वृत्ती वैरण घालू, सत्वर या

ध्वनी अनाहत जात्याची ती गोड ग घरघर ऐकूं या ।।३।।
ओवी गाऊं सगुण - गुणाची दळपाचे श्रम होती ना ।
बघता बघता वृत्तीलय हे सुखमय पीठंहि पावूं ना ।
मुमुक्षुता ही भूक लागली तीव्र मनीं तरि झडकरि या ।
(नियमिं प्रेम हे)
सद्गुरुनिष्ठा जल घालोनी पीठ सत्वरीं मळण्या घ्या ।।५।।
पीठ मळावे जितुके तितुकी सुबक होइ ग भाकरि ही
प्रेमें, सतताभ्यासें होइल ज्ञान अंतरी सुदृढ ही ।।६।।
सोहं सोहं मारा करुनी छान भाकरी थापूं या ।
कच्चि भाकरी पक्की होण्या विवेक वन्ही पेटवु या ।।७।।
तवा तापु द्या वैराग्याचा ना तरि होती श्रम फोल
वैराग्याविण ज्ञान लंगडे स्मरूं संताचे मनि बोल ।।८।।
फिरवु भाकरी निखाऱ्यावरी खरपुस लागे अतिगोड
संत सागती अन्वय बोधा, व्यतिरेकाची द्या जोड ।।९।।

* * *

## पुण्यतिथि उत्सव
## मानकरी जणू ठरलेले!

श्री गुरुंच्या दरबारी गर्दी झाली दाट
काय सांगू तुम्हाला उत्सवाचा थाट ।।ध्रु.।।
मधु घाली मांडव विस्तीर्ण छान
सडा आणि रांगोळीचा मालूला मान ।।१।।
भूपाळी, काकड्याची कमलला हौस
पाठांतर अफाट त्यात भावनांचे घोस ।।२।।
शामलला पूजनाची आवड असे फार
प्रेमभरें आनंदाने गुंफीतसे हार ।। ३।।

गंगा करी चहापाणी हौस तिला फार
कुणीहि यावे सर्वांना असे मुक्तद्वार ॥४॥
आदिनाथ आखणी करी कार्यक्रम फार
त्यांच्यावर पडतसे मुख्य कार्यभार ॥५॥
नाईक आणि पुरमवार आले मदतीस
बळीराम पाटील याना केले फडणीस ॥६॥

* * *

श्लोक १ (व.ति) : हे मारुते, पवननंदन रूद्रमूर्ते
द्या राघवा मम स्मृती पडले मी गर्ते ।
सीतेसि भेट घडण्या तुम्हि साह्य कर्ते
साधे न कार्य नसता तुम्हि कार्यकर्ते ॥

पृथ्वी २ : गुरो तुझि कशी अम्हां गवसली कृपा साउली
कशी म्हणुं किं आमुची बहुत पूर्व पुण्ये भली ।
खरोखरि अम्हांवरि हरिचिही कृपा साउली ।
म्हणोनि तुम्हि लाभला गुरुरूपें स्तवूं कशी गुरु माउली ॥

गुरूवरा, तुज जोडुनि या करां
नमितसे चरणी मज उद्धरा ।
जरि धनी त्यजितो निज चाकरां ।
परि तुम्ही न त्यजा कधि किंकरा ॥

* * *

## लौकिक कविता

सूर्य नाही पण प्रभा आहे
चंद्र नाही पण चांदणे आहे
पिता नाही पण पुत्र आहे
असं कधी घडूं शकते?

## मी कोण?

सागरातील लाट, का मृगजळाचा थाट
सिंधूतील बिंदू, कां मृत्तिकेचा गेंदू?

* * *

## (मुक्त चिंतन) गद्य काव्य

अफाट अशा पृथ्वीवरील मी एक वाट आहे
अथांग अशा सागरा ची मी एक लाट आहे.
दुर्दम्य अशा तेजाची मी एक सूक्ष्म शलाका आहे.
चंचल अशा वायूची मी एक छोटीशी झुळुक आहे.
अनंत अशा आभाळाचा मी इवला तुकडा आहे.
पृथ्वी माझी आहे का सागर माझा आहे?
तेज माझे आहे का वायू माझा आहे?
निदान आभाळ तरी माझे आहे का?
कुणास ठाऊक? हा सर्व आभासही असेल!

* * *

## (नव कविता प्रभाव ) - (स्फुट) मुक्त रचना

बाबांची मी डॉली आहे
आईची मी छकुली आहे
आजी - आजोबा म्हणतात छबी
रामा गड्याची मी आहे बेबी.
मैत्रिणी म्हणतात 'मोना'
माझे नाव कळले ना?

* * *

## **गेले ते दिवस** (पतिनिधनानंतरचे काव्य)

गेले ते दिवस, रंगलेल्या रात्री
आनंदाने पुलकत मोहरत गात्री
उत्कंठित नेत्र हवेहवेसे बाहू
सांग सख्या आता कोठे मी पाहू?
खंत केली मनात, गाळले जरी आंसू
येणार आहेत का सख्या परतून तुझे आंसू?
वाचले सद्ग्रंथ, केले श्रवण – मनन
कळते पण वळत नाही – देहासच जनन
देहासच मरण ।।

* * *

## **ओवी / अभंग (पतिनिधनानंतरचे मनोगत)**

बांधिली मी राखी । रामा चुडे राखी
गुरुकृपा राखी । मनीं होते ।।
परी माझ्या झाली । पातकांची सरी
कां हो ब्रीद हरी । सोडियले ।।

ओवाळणी तुम्हां । याचिली जी होती
अदेय कां हो ती? । रघुनाथा ।।
स्वर्गी म्हणतील । दावी प्रेम खोटे
मजही न सुटे । कोडे तुझें ।।
काय करूं कोणां, सांगू मनोगत
सखा माझा भ्रात ।। तूं चि देवा ।।

असो, आता देवा । वाट तरी दावा
नाम प्रेम भावा ।। देऊनीया ।।

अज्ञ मी अडाणी ।। उपेक्षिली त्यात
तुमचे दारांत ।। पडेन कीं ।।
अनाथा आधार तूंचि जगीं एक
रागेजूनी सांग । जावे कोठे? ।।

पेरिलेचि आलें । हातां हे ही कळे
परि मन जळे । एके गोष्टी ।।
सांग का राघवा । खेळ तूं हा केला
मजविण तुला । कोणी सांपडे ना? ।।
रामा, सांग तुज । कोणी न सांपडे
मजसम वेडे । नाचविण्या?
आजवरी मज । सुखसौख्य दिले
कां बा उपेक्षिले ।। संकटात (ऐनवेळी)

वेडी वा वाकुडी । जैशी तैशी झाली
मनो भावें केली । पतिसेवा ।।
नित्य प्रात:काळी । मुखावलोकना ।
पति वाचुंनी ना । अन्य केले ।।
काया वाचा मनें । पतीसी सेवणे ।
ध्येय दुजे नेणे । आजवरी ।।

शरण रिघाले । तुम्हां समर्थासी ।
नाम – महात्म्यासी । गाइयेले ।।
गुरू संत यांची । केली आळवणी
नित्य डोळां पाणी । भरूनिया ।।
पतीत पावना । संकट नाशना
खास येशी, मना । शिकवीले ।।
काष्ठ पल्लवीले । प्रेत उठवीले
ब्रीद आठवीले । वेळो वेळी ।।

ऐसे नाचविले । तूंचि सूत्रधार
आतां निराधार । कां बा केले?
कधी कधी देवा । येतो तुझा राग
क्षणीं अनुराग । पाझरतो ।।
सांग काय आता । वसे तुझ्या मनीं
हसें माझे जनीं । करावे की ।।
चित्त हे कठीण । जणूं दगडाचे
बनविले साचे । तूंचि देवा ।।
जरा ना द्रवते । लाज आणी माते
बघुनी स्नेहाते । इतरांच्या ।।
म्हणे सर्व जग दांभीक मी खोटी
होतां ताटातुटी । गेले प्रेम ।।
पतीसवे माझ्या ।। प्राणां उत्क्रमण
झाले नाही जाण । शल्य हें ची ।
खरेखरे सांग । तुला किती वेळां
प्रार्थिले गोपाळां । याच साठी
पातकी मी खरी । दांभीक ही जरी ।
तरी कां श्रीहरी । उपेक्षीले ।।
आस होती फार । तुम्ही तो ताराल
मज न माराल । कृपासिंधू ।।
रुचलें तुम्हाला । तेंचि तुम्ही केले
मला मोकलिले । भाऊराया ।।
माझी पूर्वकर्मे । होती खडतर
त्यात रमावर । उपेक्षी नां? ।।
हे ही भाग्य मोठे । या काष्ठपुतळीचे
मनरंजनाचे । तव साधन हो ।।

* * *

## जप सद्‌गुरु चरित्र – श्रवण कथन व नामसंकीर्तन

प्रस्थानत्रयी असून सद्‌गुरूकृपा ज्याला लाभली असेल त्याला

श्लोक १. सदानंद सिंधूमधी वास नित्य
शिवेना त्रितापाब्धि बिंदूहि सत्य ।।
परी नाम गोडी खरी तैचि लागे
यदा वासना द्वैत ना चित्ति जागे ।।

२. असे साध्य हें या त्रयीनेच येथें
असे सद्‌गुरूवाक्यिं विश्वास जेथें ।
असे तो तुझ्या ठायिं हे स्वामि जाणे
तूसा टाकुनी घेति धान्या शहाणे ।

* * *

## अभंग

बरे झाले देवा झाले मी फत्तर । समयीं देवरूप पावेन मी ।
सोशीन मी सुखे टाकीच्या घावा । सामर्थ्य तूं मज द्यावे देवा ।
छिन्नी नी हातोडा चाले अहोरात्र । हातां त्या उसंत जरा नाही ।
श्रमे शिल्पकार काय मी त्या देऊ । होऊ उतराई त्याची कैसी ।
राहीन ऋणांत परी घडो मूर्ती । व्हावे त्यास चित्ती समाधान ।

* * *

## लौकिक रचना

तुझ्या आठवणीचे पीस
हळुवारपणे न्यहाळता न्यहाळता
नकळत घुसते डोळ्यांत, मनाच्या
आणि दुखऱ्या डोळ्यांतून ओघळूं लागतात
आंसवांचे मोती....

किती टिपलं, किती पुसलं
सल काही जात नाही
खर तर डोळ्यांत काही गेलंच नाही
डोळे मात्र होतात लाल
चोळून चोळून अन्
अधिकच सलतात, अधिकच झरतात.

* * *

वादळ वारं सुटल कडाडती वीजा
यमुनेला महापूर मार्ग नाही दूजा
टोपलीतून चिमुकल पाऊल आले बाहेर
यमुनेला भेटले सुखाचे माहेर
चिंतेचा महापूर क्षणांतच आटला
वत्सल पित्याचा गहिंवर कंठातच दाटला

* * *

## बुद्धीची निद्रा

दमुनिया दिवसां थकली खरी
निशि सुखे, पहुडे, निज मंदिरी ।
तरिहि झोप कशी तिजला न ये
वरि किं शांति तिला कधि ही सये ।।१।।
छळति फार सदा तिज डांस हे
निजुं न देति सहा रिपु खास हे ।
वळकटी भरली बहु ढेकुणी
डसति पीडति फार तिला झणी ।। २ ।।
रुधिरपान तिचे करिती ग जे
भ्रम अनेक, कधी दिसती न ते

मूषक लोभ कसा करि दंश तो
झडकरी मुद पिंजरी गोवतो ।।३।।
बहु पिसूं छळती, पळती, मना
विविध रीति तशी छळि कामना
निरगुडी अणिता पिसु ही पळे
तशि विराग बघे उलटी वळे ।।४ ।।
जळिं जसे मरती झणि ढेकुण
भ्रम तसे प्रभुच्या पद भक्तिनें
अनलिं ज्या जळतील विवेक तो
गुणगुणें श्रवणी बहु डास तों ।।४ ।।
गुरुकृपावरणी निजुं या सुखे
जवळि ये निज राम वदूं मुखे ।।

* * *

ओवी छंद – (वात्सल्य भाव)

## दुधावरल्या ग सायी

आज येणार सानुली, घुमे मनाचा पारवा
रखरखीत उन्हात अवचित ये गारवा
निळ्या गहिऱ्या डोळ्यात माझ्या आनंदाचा झरा
कधी पडे गोड मिठी, कधी चुंबीन अधरा
केले नवस सायास तेव्हां निधान लाभले
दुधावरल्या ग सायी मन माझे लोभावले

* * *

## श्रीमद्भागवतात वर्णन केलेले अवधूतांचे २४ गुरू

१) पृथ्वी - शांति, परोपकारिता, वृक्ष पराधीनता अतिथिपूजन
२) वायू - अलिप्तता, देहस्थिती नाकळे समभाव, ऐक्यता
३) आकाश - समत्व, निर्मलत्व, असंगत्व, अभेदत्व
४) उदक - निर्मलत्व, कोमलत्व, अध:पाततहि परोपकार
५) अग्नि - दैदीप्यमान, आपल्यासारखे करतो.
६) चंद्रमा - चंद्रकलांची वाढीमोडी, बिज चंद्री नाही
७) सूर्य - घेतो ते कळत नाही, देतो ते अनंत अलिप्तता (देहकर्मी)
८) कपोत - दारागृहपुत्रप्राप्ती, तेथ न करावी अतिप्रीती
९) अजगर - यदृच्छा लाभ संतोष
१०) समुद्र - गंभीरता, मर्यादापालन, संपत्ती विपत्तीत समान
११) पतंग - लोलुपता नसावी
१२) मधुकर - सार सेवावे, संग्रह करू नये
१३) गज - लोलुप्य
१४) मधुप
१५) हरिण
१६) मीन
१७) पिंगला (वेश्या)
१८) कुररी
१९) अर्भक
२०) कुमारी
२१) शरकृत्
२२) सर्प
२३) ऊर्णनाभि (कातणी)
२४) सुपेशकृत - पेशकार

## (चाल –मला हे दत्तगुरू दिसले)

यदुला दत्तगुरू दिसले । यदुला अवधूतचि दिसले ।।
खिन्न होऊनी वनी भटकता (विचरता) । दत्तगुरू दिसले ।
ब्रह्मानंदी लागली टाळी । शांति ब्रह्म गमले ।।
या भवदावी भटकत असतां । शांत कसे राहिले ।
चरणी वंदन प्रेमे करूनी । प्रश्न काही पुसले ।
गुरूकृपेने ज्ञान लाभले । दृढ नाही ठसले, यदु रे
मनन आणि निदिध्यासन करण्यां । चोवीस गुरू केले ।।
यदु म्यां चोवीस गुरू केले ।।

## (चाल ) गुरूबिन कोण दया करणार?

यदु रे ज्ञान लाभले असे ।।ध्रु.।।
दारा गृह, पुत्र प्राप्ति वैभव । तिथे नसावे मन आसक्त ।
होऊ नये कधि आरूढच्युत । कपोत दंपति जसे
कपोत शिकवी असे ।
यदृच्छा लाभे संतोष । अजगर सम व्हावे समचित्त ।
लाभो अथवा न लाभो वित्त । सागर–सम व्हावे ।।
यदु रे मर्यादेत रहावे ।।
दीपशीखा पाहुनी गोमटी । पतंग तीवर घालतो उडी ।
जळोनि जाई उपभोग बुद्धी ।लोलुप ना व्हावे।
यदु रे सावध तूं रहावे ।।
भ्रमराऐसे चोरवट व्हावे । कणकण मधुतें सेवित जावे ।
ना पुष्पातें कधि दुखवावे । आसक्त न व्हावे, तिथे कधि।
आसक्त न व्हावे ।
यदु रे सारचि सेवावे ।
कनक आणि कामिनी यांची । नको नको रे कधी संगती ।
मत्तगजसम विनाशाप्रती । नेतिल रे तूं ते ।

किंवा संग्रहाने अंती होईल नाश । मधमाशी करी मधाचा संग्रह ।
न घे उपभोग । नेती कुणी दुसरे हिरूनी ।।

(श्लोक) नको रे यदू तू ऐकु ग्राम्यगीत ।
मृगासारखा होशि तू पाशबद्ध ।
हरीकीर्तनाची धरी आवडी तूं ।
तयानेचि होशील सुखासि हेतू ।।

(चाल–आरती) मीनासारीखे रसनालोलुप्त्व
असेल ज्यांसि तया सुख नात्यल्प
मीनापासुन हे मी शिकलो निश्चित
रसना जयेच जीव होई कृतार्थ –
येथे शंका न धरावी ।

(ओवी) वैराग्ये छेदिले आशापाश
पिंगळा वेश्या जाहली निराश
विषय वैराग्य उपजले तीस ।
आत्मरुपी ती झाली रममाण ।।

(ओवी) तिची कथा श्रीमद्भागवती
साक्षात् भगवंताच्या मुखी ।
ऐकोनि यदु आनंदला मनी ।
अवधूतासी नमीतसे ।।

(चौपाई) मधमाशी करि मधूसंग्रह ।
स्वये कधी भोगीना ती सुख ।
अंती नेती हिरुनी दुसरे ।
पश्चाताप अनुतापचि पावे ।
यदु रे ऐसे न करावे ।।

(ओवी) कुररी म्हणजे टिटवा । त्यासी लाभे कवळु बरवा ।
त्याने थोर उपजला झगडा । त्यागता त्यासी सुख झाले ।।

(श्लोक) यदू बालकासी नसे काही चिंता
स्वत:शीच खेळे सहजी निश्चिंता ।
मानापमाना नच तो ओळखी । सुखे क्रीडतु आत्मरती ।।

(ओवी) सर्प राहे तो एकाकी
त्यासी न साहे द्वैताची संगती ।
सदा राहे सावध वृत्ती । तयापासोनि शिकलो मी ।।
न शिणता, अप्रयासे । पर घरवास करी आनंदे ।
देह गेह अभिमान छंदे । आयुष्य व्यर्थ वेचू नये ।।

(ओवी) ऊर्णनाभि म्हणजे कातिणी । हृदय तंतू सुखे करूनी
विस्तारी बाहेर काढुनी । आपणचि क्रीडा करी ।।
अंती ग्रासूनि नेई हृदयकमळा
दाखवोनि अद्वैत कळा ।
कर्म करोनि कर्मविगळा । ऊर्णनाभि होतसे ।।

(ओवी) पेशकार भिंगुरटी
भिंगुरटी कीटकी ते धरी । कोंडी भिंती मागिले घरी
ते मरणभये ध्यान करी । तेणे भिंगुरटी स्वये होत ।।
काया वाचा आणि मन । एकाग्र करोनि केलिया ध्यान ।
त्या दृढ ध्याने जाण । तद्रूपता प्राप्त होतसे ।।

## उपसंहारात्मक

## (चाल -खेलति मम हृदये श्रीराम)

चोवीस गुरु केले यदु म्यां चोवीस गुरु केले ।।
पृथ्वीपासून शांति घेतली, अनासक्ति वायूने दिधली ।।
आकाशाची समता शुचिता, पाहुनि मन धाले ।।

उदकाची निर्मलकोमलता, अध:पतनिं ही परोपकारिता ।।
अग्नीची रे तेजस्वीता, अपणासम केले ।।
चंद्रकलांची वाढी मोडी, निजचंद्री नसते हे मजला कळले ।।
भानूने दातृत्व शिकवुनी, कर्मातीत केले ।।
कर्मी कर्मातित केले ।।
यदु म्या चोविस गुरु केले ।।

(ओवी) कंडणकाळी कुमारी । ध्वनी होईल हे जाणुनी ।
ठेवी कंकणे उतरवुनी । एकेक राखी ।।
एकपणी कांडिता । ध्वनी नुरेचि तत्त्वता ।
तो उपदेशु नृपनाथा । शिकलो मी तेथ ।।
एकाकी एकाग्रता । साधिल्या थोर लाभये हाता ।
ये च विषयी शरकर्ता । गुरु म्यां केला ।।
निशाणे, भेटी, वाजंतरे । इथे गज सैन्य संभारे ।
राजा गेला अति गरजे । नेणिजे शरकारे शरदृष्टी ।

***

पहिली माझी ओवी । आंब्याला आला मोहर
कोकिळा घाली साद । रामराया ।।
मोगरा फुलला ।सुगंध दर्वळे । मनान मी तळमळे । भेटीसाठी ।
जमीन तापली । उष्ण उष्ण वाहे वारा ।
डोळ्यात अश्रुधारा, सुकल्या कीं ।।

***